॥ श्री ॥

“ शिवरायाचें आठवावें रूप ।
शिवरायाचा आठवावा प्रताप ॥
शिवरायाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥ ”

आद्य शिवछत्रपतींनीं हिंदवी स्वराज्यसंस्थापनेस सुरुवात केली. नंतर त्या हिंदवी स्वराज्याचा पसारा अखिल भारतांत व्हावा या करितां ज्यांनीं आपलीं बहुमोल जीवितें कारणीं लावलीं त्या थोर राष्ट्र-पुरुषांपैकीं श्री. राणोजीराव महाराज शिंदेराव हे प्रख्यात् श्रेष्ठ पुरुष होत. या शिंदेराव घराण्यानें अखिल-भारत-क्षत्रिय एकत्र करून जनताजनार्दनाच्या कल्याणाकरितां आपलीं सर्वस्वें अर्पण केलीं. भारतांत हिंदवी-स्वराज्य श्री. महादजी महाराज शिंदेराव यांनीं कळसास पोहोंचविलें. ती परंपरा पूर्णांशानें नसली तरी बहुतांशानें अद्याप चालत आलेली आहे. भारतांत मराठे, राजपूत, गुरखे, शीख, इत्यादि हिंदु, व इस्लाम व खिश्चन असे प्रमुख क्षत्रियवर्ग आहेत त्यांचें संघटन करून भारतभूमाचा उद्धार करण्यास ज्या विभूति झटत आहेत त्यांत आमचे जनताप्रिय ग्वाल्हेरचे श्रीमन्महाराजाधिराज जीवाजीराव शिंदे सरकार व अखंड सौभाग्यवती श्रीमंत महाराणी विजयाराजेसाहिबा यांच्या दिव्य मधु-मीलना-स्तव ही श्री नाट्यरूप-शिंदेशाहीची प्रथम नाट्यकृति उभयतां दिव्य विभूतींच्या चरणारविंदी भक्तिभावानें व अत्यंत नम्रतेनें अर्पण करीत आहे.

| | |
|---|---|
| श्री. द्वितिय महाराजकुमारी साहिबा<br>नामकरणदिन.<br>तारीख ११ नोव्हेंबर १९४३. | अखिल जनताजनार्दनाचा दास,<br>रामराव सुभानराव बर्गे,<br>एम्. ए. |

॥ श्री ॥

# शिलेदार-ग्रंथमाला

## नाट्यरूप शिंदेशाही

प्रथम पुष्प

१

# मधु-मीलन




लेखक

श्रीयुत रामराव सुभानराव बर्गे, एम्. ए.,

प्रधानाध्यापक, जीवाजीराव विद्यालय, लष्कर-ग्वाल्हेर.



मुद्रक

आलीजाह दरबार प्रेस, ग्वाल्हेर.

---

१९४३

मूल्य सवा रुपया.

॥ श्री ॥

# मधु-मीलन



## पात्रें

पुरुषः—

१. राजे राणोजीराव शिंदेराव—नायक.

२. पिलाजीराव जाधवराव—दुय्यम सेनापति, शिंदेरावांचे मित्र.

३. राजा—बुंदेलखंडांतील दतियाचे राजाधिराज.

४. राजे छत्रसाल—बुंदेलखंडांतील सार्वभौम महाराज.

५. मामासाहेब निंबाळकर—श्री० मैनाबाई महाराणीसाहेबांचे बंधु.

६. पहिले बाजीराव—द्वितीय पेशवे.

७. बाळराजे—जयाजीराव ( वय १० ते १२ ) शिंदेरावांचे वडील चिरंजीव

८. गुरुदेव—श्रीप्राणनाथ प्रभु साधुमहाराजांचे शिष्य.

९. शिष्यवर—गुरुजींचे शिष्य.

१०. सेनापति—दतियाच्या राजांचे सेनाधिकारी.

११. पीरखान—मोंगल सरदार.

१२. बहाद्दर—मोंगल सरदाराचा हिंदु जातीचा मदतनीस.

स्त्रियाः—

१. राजकुमारी—नायिका ( श्री० चिमणाबाईसाहेब. )

२. श्री० मैनाबाईसाहेब—शिंदेरावांच्या पहिल्या महाराणीसाहेब.

३. उत्तमा—राजकुमारीची सखी.

४. राणी—दतियाच्या राजाधिराजांची राणी.

५. दासी—श्री० मैनाबाई महाराणीसाहेब यांची दासी.



श्रीमंत सरकार मेजर सर जीवाजीराव महाराजसाहेब शिंदे, जी. सी. आय्. ई., ग्वाल्हेर

# आशीर्वादाच्या निमित्तानें

चालू दुसऱ्या महायुद्धामुळें मराठी साहित्यांत कायापलट होण्याचा प्रसंग आला असतांना नाटककार श्री. रा. सु. बर्गे, एम्. ए., यांनीं माझ्या आशीर्वादाची अपेक्षा करावी हें पाहून यांची प्रतिभा अद्याप पहिल्या महायुद्धापूर्वीच्या वैचारिक युगांत विहार करीत असावी असें मला वाटलें. तशांत आशीर्वाद द्यायला मी कुणी प्रथितयश साहित्याचार्यही नाहीं. पण ग्वाल्हेर-सारख्या मराठीच्या एका दुसऱ्या केंद्रांत मराठी साहित्याच्या निर्मितीस उत्तेजन देणें मी माझें कर्तव्य समजत असल्यानें या कार्याला मी प्रवृत्त झालों आहे.

'मधुमीलन' हें एक ऐतिहासिक नाटक आहे. ऐतिहासिक नाटकांतून कथावस्तु व स्वभाव-परिपोष यांना अमर्याद वाव नसतो. कारण वस्तु व स्वभाव यांची स्थूल रूपरेखा इतिहासानें आधीच ठरवून दिलेली असते. त्यामुळें तिथें कल्पनेच्या स्वैर विहारापेक्षां प्रतिभेच्या नाजुक कलाचातुरीचीच अधिक अपेक्षा असते. काल्पनिक नाटकांहून ऐतिहासिक नाटकें यशस्वी करून दाखविणें हें म्हणूनच जास्त अवघड असतें. सुदैवानें शिंदेघराण्याच्या इतिहासांत नाट्यास उचित अशा प्रसंगांना मुळीच कमतरता नाहीं फक्त असे प्रसंग निवडून त्यांची परिणामकारक मांडणी करणारा कलावंतच हवा आहे. श्री. बर्गे यांनीं हें कार्य नुकतेंच हातीं घेतलें आहे. निर्मळ ऐतिहासिक सत्य मौल्यवान् असलें तरी तें वाचकांस रुचत नाहीं उलट त्या सत्यास कलेचा स्पर्श होतांच त्यांत सौंदर्य निर्माण झाल्यानें वाचकांस रसोत्पत्तीमुळें काव्यानंद प्राप्त होतो. शिंदेशाहीचा रमणीय, स्फूर्तीदायक व रोमांचकारी इतिहास नाट्यरूपानें वाचकांचे पुढें येणें अत्यंत जरूरीचें होतें. या शुभकार्याला प्रस्थान ठेवलें गेलें हें इष्टच झालें.

नाटककारानें या पहिल्या नाटकासाठीं निवडलेला प्रसंग 'मधुमीलन' हा सुन्दरच आहे. (विषयाच्या रमणीयत्वाबरोबरच नाटककारानें कालाचे औचित्य साधून घेतलेलें दिसतें) स्थलमानानें पाहतां लेखकाची भाषा साधी व सोपी आहे, कथानकाचा ओघ शांत व प्रसन्न आहे. वीररसास उचित असा मुग्धश्रृंगार मधून मधून विखुरल्यानें गांभिर्यास ढळ पोहोंचत नाहीं. पद्यरचना सुबोध आहे. नाटकांतील संवाद ऐतिहासिक घटना विशद करणारे आहेत. नाटकाचा प्रारंभ व शेंवट चांगला साधला आहे. मला वाटतें हा विषय रमणीय नाटिकेला अधिक खुलून दिसला असता. कालिदासाच्या मालविकाग्निमित्राचा अथवा श्रीहर्षाच्या रत्नावलीचा मागोवा घेत मांडणी, रसपरिपोश, प्रसंगनिष्ठ विनोद, विरोधसूचकता, संयम, चुरचुरीत संवाद यांचा उपयोग करून लेखकानें नाटिका निर्माण केली असती तर कथाविषय व रचनाचातुरी यांच्याही मधुमीलनाचा अपूर्व योग जुळून आला असता.

सर्वसामान्य वाचकांना हें नाटक वाचनीय वाटेल. यापुढील नाटकें उत्तरोत्तर अधिक सरस होत जावींत अशी मी इच्छा करतों. शिंदेशाहींतील महत्त्वाचे प्रसंग मराठी वाचकांच्या पुढें मांडले गेल्यानें मराठ्यांच्या कर्तबगारीलाही चालना मिळेल. हें महत्त्वाचें कार्य श्री. बर्गे यांनीं हातीं घेतल्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. रसिक व गुणग्राही वाचकांना अधिक वेळ तिष्ठत न ठेवतां आशीर्वादाच्या निमित्तानें प्रकट केलेल्या विचारांना इथेंच विराम देतों.

शुभं भवतु।

ले.—श्री. सरदार देवराव कृष्णराव जाधव, बी. ए.

# थोरांचें मनोगत

शिंदेशाहीच्या इतिहासांतील एका प्रसंगावर या नाटकाची भूमिका उभारलेली असून तद्वारां राजपूत व मराठे या विक्रमशाली क्षत्रियांत ऐक्यभाव उत्पन्न करणेच्या कल्पनेस राष्ट्रांत आनुकूल्य प्राप्त करून द्यावें हा प्रस्तुत नाटकाचा उद्देश दिसतो, तो सर्वस्वी स्तुत्य आहे.

मराठेशाही व त्यांतही शिंदेशाहीचे सत्तेच्या विशिष्ट घटनेचें चित्र नाटकरूपानें जनतेपुढें ठेऊन लोकशिक्षण व लोकानुरंजन हीं उभय कार्यें साधणेचा हा उपक्रम समर्थनीय तितकाच प्रशंसनीय आहे.

सदरहू नाटक, नाटकीय तंत्र व प्रयोगाचे दृष्टीनें कसें साधलें आहे, या बाबतींत मत देणें मी उचित समजत नाहीं. या संबंधीं उहापोह नाटककार व समालोचक योग्य रितीनें करूं शकतील; परंतु सदरील नाटकानें मराठी साहित्यांत भर पडली आहे हें निर्विवाद होय.

ऐतिहासिक नाटकरचनेंत सत्य व कल्पनेचें संमिश्रण कोणत्या प्रमाणांत असावें व त्यांची स्थानें कोणतीं या संबंधीं आतां साहित्यिकांत अनिश्चितपणा राहिलेला नाहीं. ज्या ऐतिहासिक प्रसंग अथवा घटनेचें चित्र लोकांपुढें मांडण्याचा हेतु असतो त्याची रूपरेखा ऐतिहासिक सत्याला धरून असली पाहिजे. तसेंच त्या चित्रास उठावदार व चित्ताकर्षक करणेंसाठीं कलेच्या दृष्टीनें जेथें जसा वा जेवढा रंग वगैरे देणेची अपेक्षा असेल त्या कार्याचा कल्पनेचे क्षेत्रांत समावेश होतो असा सर्वसंमत नियम आहे, व त्याकडे ग्रंथकर्त्याचें लक्ष आहे ही समाधानाची गोष्ट होय.

श्री. बर्वे हे जसे शिक्षणकार्यांत लौकिक पावले आहेत त्याप्रमाणें साहित्य-क्षेत्रांतही कसलेले कलाकार म्हणून प्रसिद्धीस येत आहेत, हें जसें त्यांना भूषणावह आहे तसें ग्वाल्हेरकरांनाही अभिमानास्पद आहे. त्यांचा हा उपक्रम पुढेंही चालू राहून तद्वारां लोकशिक्षण व लोकानुरंजनाचें कार्य उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणावर होत राहो, असें मी मनःपूर्वक इच्छितों.

रावबहादुर लक्ष्मण भास्कर मुळे, बी. ए.,

२९-७-४३. माजी-गृहमंत्री, ग्वाल्हेर.

# हृद्गत

महाराष्ट्र, महाराष्ट्र धर्म, मराठे व हिंदवीस्वराज्य या चौकडीबद्दल जेव्हां विचार येतात तेव्हां अंत:करणाच्या भावना उचंबळून आल्याशिवाय रहात नाहींत. श्रीशिवछत्रपतींनीं हिंदवी-स्वराज्याची मुहूर्तमेढ रोंवून महाराष्ट्रास धन्य केलें. श्रीशिवछत्रपतीनीं व श्रीसमर्थ रामदास, तुकाराम, वगैरे साधुसंतांनीं महाराष्ट्रधर्माचा विमलध्वज उभारून अखिल मराठी दुनिया संघटित केली. महाराष्ट्रांत जन्मलेला व महाराष्ट्रधर्माच्या संस्कृतींत वाढलेला प्रत्येक मनुष्य मराठी सिंहासनाचा सिंह होऊन "मराठा" नामाभिधान पावला. मराठी बाणा व मराठा मर्दुमकीची जीवाची तमा न धरितां केलेली लयलूट, 'हिंदवीस्वराज्य'रूपानें अखिल भारतांत निनादूं लागली. या हिंदवीस्वराज्याचे खंदे वीर कोणत्या घराण्यांत अधिक निर्माण झाले असतील तर ते एक "शिंदेशाही राजघराणें" होय. या शिंदेराव घराण्याचे मुख्य पुरुष वीरश्रेष्ठ श्री. राजे राणोजीराव व त्यांची तृतीय पत्नी श्री.चिमणाबाईसाहेबा यांच्या मधु-मीलनावर व श्री. महादजीमहाराज यांच्या जन्मकथेवर सदरहू 'मधु-मीलन' नाटक लिहिलें आहे.

शिंदेशाही इतिहासांत श्री. राजे राणोजीराव व श्री. चिमणाबाईसाहिबा यांना फार महत्त्वाचें स्थान आहे. त्यांनीं माळवा, बुंदेलखंड व राजपुताना इकडे हिंदवीस्वराज्याकरितां राजपूत-मराठा ऐक्य करून मोठें संघटन निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें ह्या तिन्ही प्रांतांत मोठी संघटित शक्ति निर्माण झाली व तिनें मोंगल बादशाही सत्ता फारच खिळखिळी केली. आजपर्यंतचे इतिहास-कार या मुद्यावर अगदीं मुग्ध असून "शिंदेशाहीराजपुरुषांकडे" तुच्छतेनें पहात आले. इतकेंच नव्हें तर त्यांनीं सर्वस्वी या राजघराण्याकडे मुद्दाम तुच्छतेनें दुर्लक्ष केलेलें आहे. त्यासाठीं नवीन शोध लावून त्यांचें प्रकाशन करणें, तसेंच शिंदेशाही इतिहासावर अनेक ग्रंथ निर्माण करून शिंदेशाही राजवटीचा खरा इतिहास प्रकट करून त्या घराण्याच्या कीर्तीस योग्य मान देणें हें सर्वांचेंच कर्तव्य आहे. या घराण्यांतील राजपुरुषांची इतिहासांत इतकी मोठी कामगिरी आहे कीं, मराठ्यांच्या किंवा हिंदुस्थानांतील इतर क्षत्रिय घराण्यांच्या, इतकेंच नव्हें तर जगांतील अखिल क्षात्रवृत्तीच्या घराण्यांच्या इतिहासांत "शिंदेशाहीराजपुरुषांचें" स्थान अत्यंत उच्च दर्जाचें आहे. राष्ट्रसेवे करितां प्रत्येक पुरुषानें त्यागपूर्वक बलिदान करून हिंदवीस्वराज्याचें राष्ट्रकार्य शिखरास पोहोंचविलें. अशा पुरु-षांच्या कारकिर्दीतील विशेष प्रसंग निवडून त्यावर एक एक नाटच लिहिण्याचा निश्चय करून मी "नाटचरूप शिंदेशाहीस" आरंभ केला आहे. "मधु-मीलन" हें त्यांतील प्रथम नाटचपुष्प आहे.

त्यासंबंधीं आशीर्वाद, प्रस्तावना व अभिप्राय सोबत छापले आहेत. म्हणून मी स्वतः त्याबद्दल मुग्ध राहणें हें श्रेयस्कर वाटतें. या ठिकाणीं ऐतिहासिक उतारे देऊन या ऐतिहासिक नाटचकथेस अधिक सुशोभित करतां आलें असतें पण विस्तार अधिक होईल याकरितां उतारे न देतां ही माझी प्रथम नाटचकृति जनताजनार्दनाच्या लोकशिक्षणाकरितां व माझी "राजभक्ती" प्रकट करण्या करितां प्रसिद्ध करीत आहे. से. नि. प्रा. कुळकर्णी, से. नि. प्रा. बोकील; प्रा. पराडकर, प्रा. बापट, प्रा. कु. चंपावतीताई व प्रा. प्रभावतीताई वगैरे विद्वान् मंडळी तसेच येथील प्रख्यात् कर्नल राजराजेन्द्र सरदार मालोजीराव शितोळेसाहेब व श्रीयुत कॅप्टन सरदार देवराव जाधवरावसाहेब यांनीं नेहमीं प्रेमळवृत्तीनें मदत केली याबद्दल मी त्यांचा फार फार आभारी आहे. आलीजाह दरबार प्रेसचे मॅनेजर रा. अ. खं. शिर्के व इतर प्रेसची कामगार मंडळी नेहमीं प्रकाशनकार्यांत मदत करीत आहेत याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. ह्या नाटचकृतीचा सक्रिय गौरव माझे परमपूज्य अन्नदाता श्रीमंत सरकार मेजर सर जीवाजीराव महाराजसाहेब शिंदे, जी. सी. आय. ई., आलीजाह बहादुर, श्री. अ. सौ. महाराणी विजयाराजेसाहिबा, व जनताजनार्दन करतील अशी मला बळकट आशा आहे. इतकें हृद्गत प्रकट करून मी विराम पावतों.

विजयादशमी,<br>संवत २०००<br>तारीख ८ आक्टोबर १९४३.

जनताजनार्दनाचा नम्र भक्त,<br>**रामराव सुभानराव बर्गे, एम्. ए.,**<br>प्रधानाध्यापक, जीवाजीराव विद्यालय, लश्कर-ग्वाल्हेर.



श्री० रामराव सुभानराव बर्गे, एम्. ए.

—श्री नाट्यरूप शिवशाहीचे नाटककार.

# प्रस्तावना

---

वाङ्मयांतील अनेक प्रकारांपैकीं नाट्य-वाङ्मय हा एकमेव प्रकार असा आहे कीं त्याला प्रस्तावनेची जरूर वाटूं नये. भिन्न भिन्न प्रकृतीच्या लोकांना एकाच वेळीं रुचावी अशी याची रचना असावी हा दंडक सर्वश्रुत आहे. तेव्हां एखादें नाटक सर्वांना आकलन होण्यासारखें असेल तर प्रस्तावना सहाजिकच अनावश्यक ठरेल व तें तसें नसेल तर प्रस्तावनेची आवश्यकता सिद्ध झाली तरी असें नाटकच नाटकासंबंधीं असणाऱ्या अपेक्षा पुऱ्या करण्यास असमर्थ आहे असें म्हणावें लागेल. 'मधु-मीलन' या नाटकास प्रस्तावना लिहिण्याचें मान्य करूनहि, ह्या गोष्टीच्या युक्तायुक्ततेसंबंधीं मनाचा निश्चय होत नाहीं. तथापि एक गोष्ट मात्र खरी कीं ही प्रस्तावना लिहितांना मला एक प्रकारचा आनंद होत आहे. आपल्या मित्राच्या अंगीकृत कार्यात जर थोडेसें साहाय्य करतां आलें तर जो एक प्रकारचा सात्त्विक आनंद होतो तसें याचें स्वरूप होय. परंतु दुसरें कारण नाहीं असें मात्र नव्हे. 'मधु-मीलन' या सुमधुर नांवानें अलंकृत झालेल्या श्री. रा. सु. बर्गे यांच्या ऐतिहासिक कलाकृतीचा आस्वाद इतर वाचकांच्या आधीं मला घेतां आला ही दर्पयुक्त भावनादेखील या आनंदाच्या मुळाशीं असावी असें मला वाटतें.

श्री. बर्गे यांनीं "नाट्यरूप शिंदेशाहीची योजना" आपल्या "शिलेदारांत" प्रसिद्ध केल्यापासून इतिहासप्रेमी जनांच्या मनांत एक प्रकारचें कुतूहल निर्माण झालें असल्यास नवल नाहीं. इतिहास हा रुक्ष सत्याचा पक्षपाती असला, तर नाट्य हें त्याला रमणीय करण्याचा अट्टाहास धरणारें. तेव्हां कल्पना-विलासाला स्थान मिळाल्यास नवल नाहीं. इतिहासाला सर्व प्रकारच्या घटनांचें व त्याच्या अनुक्रमाचें प्रेम, तर नाट्य हें सौंदर्यदृष्टीला पटेल व रुचेल तेवढ्याच घटना व त्या सुद्धां आपल्या सोयीप्रमाणें मागें पुढें करून कलाकृति निर्माण करणारें, इतिहासाला काल्पनिक पात्रांचें वावडें तर नाट्याला ऐतिहासिक स्त्री-पुरुषांना कल्पनेचा उजाळा देण्याचा सोस. तेव्हां नाटककार व इतिहासकार यांच्या दृष्टीकोणांत दोन ध्रुवांइतकें अंतर असल्यास नवल नाहीं. परंतु जर इतिहास कादंबरीप्रमाणें मनोरंजक करतां आला व कादंबरींत (किंवा नाटकांत) जर ऐतिहासिक सत्य गोवतां आलें तर तो प्रतिभेचा मोठा विजयच म्हणावा लागेल. असा विजय संपादन करणें "येरा-गबाळांचें काम नोहे" हें काय सांगावयास पाहिजे ?

महाराष्ट्रसारस्वताच्या भव्य प्रासादांतील नाटकाचें दालन उजाड झालें नसलें तरी प्राचीन-वस्तुसंशोधकाच्या कुतूहलाचा विषय लवकरच होईल अशी साधारण भीति वाटूं लागली आहे. मराठींतील नाटकांची परंपरा अशा रीतीनें खंडित व्हावी हें आमचें दुर्दैवच होय. परंतु त्याचबरोबर मराठी रंगभूमीला पुनरुज्जीवित करण्याचें जे प्रयत्न मधून मधून होत आहेत ते पाहिले म्हणजे आशा-वाद बळावतो. मराठी रंगभूमीचें सध्याचें दैन्य नाहीसें होऊन भावी काळ भूतकाळाइतकाच वैभवशाली कां होऊं नये असा उत्साहवर्धक प्रश्न मनांत येतो.

मराठी रंगभूमीचें भविष्य आज निरपेक्ष बुद्धीनें काम करणाऱ्या नाटककारांवर अवलंबून आहे. "मधु-मीलन" नाटकाचे कर्ते श्रीयुत् आबासाहेब बर्गे, एम्. ए., यांनीं ऐतिहासिक नाटक-निर्मितीला स्वतःच वाहून घेतलें आहे ही विशेष कौतुकाची गोष्ट आहे. अगोदर नाट्यवाङ्मयाला

मागणी नाहीं, त्यांत ऐतिहासिक नाटकांना नाहींच नाहीं. अशा परिस्थितींत ध्येयबुद्धीनें हें निष्काम कर्म त्यांनीं आचरिलें आहे तें 'सफल' होईल यांत मला तरी शंका वाटत नाहीं.

"मधु-मीलन" हें शिंदेशाहीवर त्यांनीं लिहिलेल्या नाटकांपैकीं पहिलें नाटक आहे. तें अनुक्रमानें पहिलें तसेंच गुणांनींही पहिलेंच राहील असें वाटतें. कारण या नाटकांत विश्ववंदनीय धीरोदात्ततेला, विश्वाला आनंद देणाऱ्या प्रणयमधुरतेची जोड मिळालेली आहे. हें नाटक "शिव-संभव" नाटकाप्रमाणें लोकादरास पात्र होईल यांत शंका नाहीं. शिवाय या मधुमीलनाचें पर्यवसान ज्यांना प्रेमानें इतिहास "महादजी बाबा" असें म्हणत त्या पुण्यश्लोक व्यक्तीच्या जन्मांत झालें ही गोष्ट इतिहासतज्ज्ञास तरी विदित आहे.

हें नाटक रंगभूमीवर येईल आणि तें केव्हां तरी येईल यांत शंका नाहीं. तेव्हां तें संक्षिप्त स्वरूपांत होईल हें उघड आहे व तें विषयामुळें व रचनेंमुळें लोक.दरास पात्र होईल. राजे राणोजीराव यांच्या ऐन उमेदीच्या काळांतील प्रेमाचा सुमधुर प्रसंग या नाटकांत रंगविलेला असून त्यांत विविध पात्रें आलेलीं आहेत. अनेक व्यक्तींना एका वेळीं आवडेल अशी नाटचरचनाच श्रेष्ठ प्रकारची होय. केवळ विनोदप्रिय वाचक किंवा प्रेक्षक सोडले तर हें नाटक इतरांना प्रिय होईल यांत शंका नाहीं. श्री. बर्गे यांच्याशीं विचारविनिमय करतांना त्यांच्या नाटकांत मराठा व राजपूत यांच्या एकीचें व हिंदवीस्वराज्याचें तत्त्व अनुस्यूत आहे हें स्पष्ट झालें, याबद्दलही त्यांचें अभिनंदन करणें प्राप्त आहे.

श्री. बर्गे यांचा हा प्रयत्न अत्यंत महत्वाकांक्षी असा आहे. व नाटचविषयाची निवड यथा-योग्य झाल्यामुळें तो पूर्णांशानें सफल होईल यांत शंका नाहीं. शिंदेकुल हें थोर, वीर पुरुषांना जन्म देणारें आहे ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. तेव्हां या धीरोदात्त विषयावर लिहितांना लेखकाची लेखणी अप्रतिहत चालली तर नवल काय? श्री. बर्गे यांनीं अल्पावधींत आपल्या संकलित नाटकांपैकीं मधु-मीलन सोडल्यास मुतालकी (श्री. जयाजीराव), रक्षाबंधन (कुंभेरीचा वेढा), बलिदान (नागोरचा वेढा), भीमबहाद्दर, इत्यादी नाटकें लिहून ते आपल्या मित्रमंडळींच्या कौतुकाचे विषय झाले आहेत. या नाटकांना ग्वाल्हेरच्या विद्याप्रेमी महाराजांच्या कृपेनें आज प्रत्यक्ष प्रसिद्धी मिळत आहे. श्रीमंतांची गुणग्राहकता सुप्रसिद्धच आहे व त्यामुळेंच श्री. बर्गे यांची नाटचरचना जगापुढें येत आहे. श्री. बर्गे यांनीं नेटानें आपलें संकल्पित कार्य पुरें करावें अशी त्यांना माझी आग्रहाची सूचना आहे. ऐतिहासिक नाटकें लिहितांना लेखकाला अनेक अडचणी येतील हें मी सांगण्याचें कारण नाहीं, परंतु श्री. बर्गे त्यांना दूर करून इष्ट हेतु साध्य करतील यांत शंका नाहीं. श्री. बर्गे यांना त्यांच्या नाटचरचनेच्या कार्यांत मी वर्धिष्णु यश प्राप्त होवो असें इच्छितों.

ना. व्या. पराडकर, एम्. ए.,
प्राध्यापक, व्हिक्टोरिया कॉलेज, लश्कर.

---

# विद्वानांचे अभिप्राय

शेक्सपियर किंवा कालिदास-भवभूति यांच्या नाट्यकृतींत व्यक्तिगत मनोविकार अथवा रसपरिपोष हे प्राधान्यानें चमकतात. बर्नार्ड शॉ यांच्या नाटकांत पात्रें नाटककाराचें हृद्‌गत आपल्या उक्तींतून व कृतींतून प्रकट करतात. रा. बर्गे यांचीं 'मधु-मीलन', 'मुतालकी', 'रक्षाबंधन' व 'बलिदान' हीं तीनही नाटकें एकत्र घेतलीं असतां लेखकास जें प्रस्थापित करावयाचें असतें त्यापुढें वरील उपांगें अगदीं फिकीं पडतात. 'मधु-मीलन' नाटकांत तर राजपूत व मराठे यांचे ऐक्य व हिंदुपदपादशाहीची स्थापना इतक्या जोरानें दुमदुमत आहेत कीं त्यापुढें समाजसुधारणा, किंबहुना दतियाच्या राजकुमारीचा अतिशय सुंदर व स्वाभाविक श्रृंगार हीं दुय्यम स्थान घेतात. राजकारणाच्या स्वारस्यामुळें नायिका नायकाची शिष्य होते व संकटांनीं भरलेल्या धाडसी प्रवासानंतर एका ध्येयाच्या दोन व्यक्तींचें 'मधु-मीलन' होतें. उत्तमा व पिराजीराव यांचा विनोदही श्री. गडकरी किंवा इतर सुप्रसिद्ध नाटककार यांच्या विनोदाप्रमाणें वाचकांना खूप हंसविणारा नाहीं.

इतिहासाच्या सर्व पुस्तकांतून वगळलेला सर्व हिंदूंनां, विशेषतः राजपूत-मराठे यांना एक करून टाकण्याचा धडा हें नाटक वाचतां वाचतां उत्तम रीतीनें पाठ होतो. कारण जो प्रवेश येतो त्यांत पात्रें 'साध्ये निश्चित्नमन्वयेन घटितं बिभ्रत्सपक्षे स्थितिम्' या विशाखदत्ताच्या न्यायानें आपलें स्वत्व विसरून सारखीं एकाच गोष्टीचें मंडन करण्यासाठीं बोधपर भाषेत बोलत असतात. या दृष्टीनें मुलांना नाटकरूपानें शिंदेशाहीचा इतिहास सोपा करून देण्याचें रा. बर्गे यांचे ध्येय उत्कृष्ट साधलें आहे असें म्हणावेंच लागतें.

राजे राणोजीराव यांचे गांभीर्य, स्वामिभक्ति, कार्यदक्षता, विनोदयुक्त औदार्य हे गुण फार उत्तम व ले आहेत. राजकारणापुढें त्यांनां संसारसुख अगदीं तुच्छ आहे असें दिसतें. राजकुमारीच्या मनाच्या सरळपणाची व उचंबळणाऱ्या प्रेमाची अगदीं शिकस्त झाली आहे. महाराणी मैनाबाईंच्या मनाचा धिम्मेपणा व भावी सवतीबद्दलचा भगिनीभाव नाजुक रीतीनें रेखाटला गेला आहे. विध्याटवींत पीरखानाच्या हल्ल्याच्या वेळीं उत्तमेनें सुचविलेली स्वार्थत्यागाची सूचना तिच्या राजकुमारीवरच्या निःसीम प्रेमाला साजेशीच आहे.

नाटकांतील कांहीं विधानें सर्वमान्य इतिहासाशीं विसंगत आहेत. परंतु कविकल्पनेच्या भरारींत तीं क्षम्य होतात. एकंदरींत श्राव्य काव्य या दृष्टीनें हें नाटक चांगलें वठलें आहे.

कु. प्रभावती कुलकर्णी, एम्. ए.,
प्रोफेसर ऑफ हिस्टरी, कमलाराजा कॉलेज, लश्कर.

---

श्री. नाथमाधव व श्री. हडप यांनीं स्वराज्य व पेशवाईचा इतिहास कादंबरीरूप करून जनता-जनार्दनचरणीं अर्पण केला तर श्री. बर्गे हे शिंदेशाहीचा इतिहास नाट्यरूपानें अर्पण करूं इच्छितात. "मधुमीलन" हें त्यांच्या इच्छेचें पहिलें दृश्य फल होय.

नाट्यरूप इतिहास म्हणजे सत्य व कल्पकता यांचें मधुमीलन. कांहीं मध्यवर्ती पात्रें व त्यांच्या जीवनांतील ठळक ठळक प्रसंग इतक्या गोष्टी ऐतिहासिक सत्याधिष्ठित असून बाकी सर्व कल्पनाधिष्ठित असल्या तरी चालतें. प्रस्तुत नाटकांत राजे राणोजीराव व त्यांचा राजपूत कन्येशीं विवाह हें सत्य कल्पकतेच्या मुळाशीं आहे.

नाटक हें दृष्यकाव्य खरें; परंतु आजच्या चित्रपटाच्या नव्या जगांत रंगभूमि अदृश्य झाली असल्या कारणानें नाटकाला ग्रंथाचेंच स्वरूप येत चाललें आहे. या दृष्टीनें श्री. बर्गे यांनीं आपलें नाटक प्रयोगक्षम करण्याचा प्रयत्न केला नाहीं हें ठीकच आहे. परंतु सामान्य वाचकाचा कल इतिहासवाचनाकडे नसून नाटकें-कादंबऱ्या:सारख्या मनोरंजक ललित लेखनप्रकाराकडे असतो हें ओळखून शिवेशाहीचा इतिहास, इतिहासरूपानें न लिहितां नाट्यरूपानें वाचकांच्या हातीं देण्याचा श्री. बर्गे यांचा हेतु जितका स्तुत्य तितकाच अनुकरणीय आहे.

कोणत्याहि कलाकृतीचें मूल्यमापन करण्यापूर्वी तिच्या निर्मात्याची मनोभूमिका सुस्पष्ट असेल तर मूल्यमापन करणें अधिक सोपें होतें. श्री. बर्गे यांचा हेतु व रंगभूमीची आजची स्थिति लक्षांत घेतां 'मधुमीलना'कडे एका वेगळयाच दृष्टीनें पहावें लागणार आहे. म्हणूनच नाटकांत उत्कट नाट्यप्रसंग, समरप्रसंग व पताकास्थानें यांची उणीव असली तरी तो विशेषसा दोष म्हणतां येत नाहीं. प्रस्तुत नाटक म्हणजे दतियाच्या राजकुमारी व राजे राणोजीराव यांची केवळ एक प्रणयकथा नसून, हिंदवीस्वराज्य, राजपूतमराठा ऐक्य, हिंदु संघटना—एकीकरण, वगैरे सारख्या उदात्त ध्येयानें प्रेरित झालेल्या, तें साधण्याकरितां अहोरात्र तळमळणाऱ्या व प्रसंगीं जीव धोक्यांत घालणाऱ्या दोन निष्ठावन्त जीवांचें 'मधु-मीलन' आहे. राजपूत-मराठा ऐक्य हें सूत्रच नाटकांत अथपासून इतिपर्यंत अनुस्यूत आहे. हें ऐक्य दृढ करण्याकरितांच विवाह हें साधन आहे. या दृष्टीनें विचार करतां 'परिणामाची एकमेवता' हें जें नाट्यतंत्राचें प्रमुख सूत्र तें या नाटकांत बऱ्याच प्रमाणांत साध्य झालेलें दिसतें.

नाटकांतील स्वकृत संगीतावर कांहीं ठिकाणीं नाट्याचार्य खाडिलकरांची छाप पडलेली दिसते; तरी विरहव्याकूळ राजकुमारीनें मन रमविण्याकरितां सखीकडून गावविलेलें गीत, स्वतः गायिलेलें मीराबाईचें गीत, किंवा पुरुषवेषधारी तरुणींचें खास राजांशींच काय एवढें गुप्त राजकारण आहे याचा उलगडा न झाल्यानें संशयचित्त झाल्यानें उद्विग्न व विमनस्क स्थितींत राणी मैनावतीनें गायिलेला तुकारामाचा अभंग, किंवा मठांत गुरुदेवांनीं गायिलेलीं मिराबाईचीं भजनें; हीं सर्व समयोचित, रसानुकूल व रसपरिपोषक अशींच आहेत.

संवाद म्हणजे नाटकाचा आत्मा. त्याचे अत्यंत आवश्यक गुण जे सुटसुटितपणा व चटकदारपणा हे दोन्हीहि नाटकांत दिसत नसले तरीहि ध्येयनिष्ठांच्या तळमळत्या अन्तःकरणांतून निघालेले व उदात्त विचार व उच्च तत्वांनीं भरलेले असे ते संवाद असल्यानें वाचतांना कंटाळवाणें होत नाहींत.

हें नाटक म्हणजे श्री. बर्गे यांचा नाटकलेखनांतील 'श्रीगणेशा'च आहे. ही पहिलीच पुस्ती नवशिका लेखक काढीत असल्यानें त्यांत नीरसपणा, सुबकपणा व सफाई थोडी कमी असली तरी ती क्षम्यच आहे. यापुढील पुस्त्या एकापेक्षां एक कसलेल्या हातानें काढल्या जातील व उत्तरोत्तर नाट्यगुणांचा विकास दृष्टोत्पत्तीस येईल अशी या पहिल्या पुस्तीवरून खात्री वाटते.

लेखकाच्या उदात्त हेतूकडे दुर्लक्ष करून जे कोणी या नाटकाची अवगणना करतील त्यांना एवढेंच सांगावें कीं—

'ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्तु ते किमपि तान्प्रति नैष यत्नः।
उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा।
कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी ॥'

कु. चंपावती केतकर, एम्. ए.,
लेक्चरर इन मराठी, कमलाराजा कॉलेज, ग्वाल्हेर.

१६ ऑगस्ट १९४३.

'मधुमीलन' हें श्रीयुत् रा. मु. बर्गे, एम्. ए., यांच्या शिंदेशाहीवरील संकल्पित ऐतिहासिक नाटकमालिकेंतील प्रथम पुष्प असून त्याची रचना पुण्यश्लोक श्रीमंत महादजी महाराजांच्या जन्म कथेवर आधारलेली आहे. शिंदेशाहीचा नाट्यरूपानें इतिहास लिहिण्याची कल्पना जितकी भव्योदात्त व रमणीय तितकीच उपयुक्तहि आहे. नाटक हें दृश्यकाव्य असल्यामुळें दुसऱ्या कुठल्याही अन्य वाङ्मयप्रकारापेक्षां त्याचा वाचक-प्रेक्षकांच्या मनावर प्रबलतर ठसा उमटून चिरकालीन परिणाम होतो. या दृष्टीनें शिंदेकुलांतील प्रतापी वीरपुरुषांच्या उदात्त चरित्रावर नाट्यरचना होणें जितकें साहाजिक तितकेंच आवश्यकहि होतें. या थोर पुरुषांच्या जीवनचरित्रांइतकी उदात्तता व नाट्यमयता दुसऱ्या एकाद्या घराण्यांतील पुरुषांच्या जीवनेतिहासांत क्वचितच आढळेल. म्हणूनच या पुरुषांच्या जीवनावर नाट्यरचना होणें मराठींतील ऐतिहासिक नाटकांच्या विकासक्रमास एकंदरीनें उपोद्बलक होणारेंच आहे. म्हणून शिंदेकुलांतील थोर पुरुषांच्या जीवनावर नाट्यमालिका गुंफण्याची कल्पना काढून ती मूर्तरूपांत आणण्यास श्रीयुत् बर्गे यांनीं सुरुवातही केली याबद्दल कोणीही रसिक श्री. बर्गे यांचें साभिनंदन गौरवच करील यांत शंका नाहीं.

अर्थातच हीं नाटकें वाचतांना किंवा पाहतांना त्यास केवळ ऐतिहासिक प्रामाण्याची कसोटी लावण्याचा प्रयत्न करणें चुकीचेंच होईल. ऐतिहासिक नाटक म्हणजे इतिहास नव्हे. इतिहास व ऐतिहासिक ललितवाङ्मय यांमधील फरक ऐतिहासिक नाटक किंवा कादंबरी यांचें परीक्षण करतांना नेहमींच चित्तांत वागविला पाहिजे. पुष्कळवेळां उच्चतर ऐतिहासिक सत्याकरितां म्हणजे त्या त्या ऐतिहासिक काळाचें, विशिष्ट घटनेचें वा व्यक्तिविशेषाचें यथार्थरूप प्रकट व्हावें म्हणून जाणूनबुजूनच एकाद्या अनैतिहासिक घटनेचा व प्रसंगाचा आपल्या कलाकृतींत समावेश करणें श्रेष्ठ दर्जाच्या कलावंतासहि भाग पडतें. पण हा त्याचा दोष न मानला जातां उलट त्याच्या कलादृष्टीचा एक तऱ्हेनें गौरवच समजला जातो. श्रेष्ठ कलावंतांनीं अनुसरलेल्या या मार्गाचा भरपूर फायदा श्री. बर्गे यांनीं घेतला असल्यास नवल नाहीं. म्हणून केवळ ऐतिहासिक दृष्टीनें या नाटकाचें परीक्षण केलें, तर त्यांतील प्रत्येक घटनांचा वा प्रसंगांचा ऐतिहासिक प्रामाण्याच्या दृष्टीनें निर्वाळा देतां न आला तरी ह्या नाटकांत मराठ्यांच्या 'स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर झालें'. त्या काळाच्या कांहींशा अंधेऱ्या व अस्पष्ट, गडबडीच्या तशाच अद्भुतरम्य आणि कल्पनारम्य, वातावरणाचें बव्हंशीं यथार्थरमणीय दर्शन लेखकानें आपणांस घडविलें आहे. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नाट्यकलेच्या दृष्टीनें पाहिलें तर कांहीं दृष्टींनीं श्री. बर्गे यांनीं स्पृहणीय यश संपादन केलें आहे असें दिसून येईल. श्रीमंत राणोजीरावांचा दिलदार व शूर आणि पराक्रमी, सत्वशील व ध्येयनिष्ठ स्वभाव, त्याप्रमाणेंच राजकुमारीचें राजपूत वीरांगनेस शोभेसें शौर्यशाली, पण तितकेंच कल्पनेंत रमणारें प्रणयकातर मन याचें मोठें भावमधुर चित्र श्री. बर्गे यांनीं रेखाटलें आहे. ग्रंथकाराची भाषा ओघवती आहे पण छापण्यापूर्वी आणखी एकदां लेखकाचा सफाईचा हात तिच्यावरून फिरला असतां तर बरें झालें असतें. तसेंच प्रयोग परिणामकारक व यशस्वी होण्याच्या दृष्टीनेंही नाटकांत कांहीं सुधारणा करणें आवश्यक होतें त्या न झाल्याकारणानें या नाटकास कांहींसें केवळ वाचिक नाटकाचें (Literary drama) स्वरूप प्राप्त झालें आहे. श्री. बर्गे यांनीं या नाटकाच्याद्वारें शिंदेशाहीवर नाट्यरचना करण्याची आपली कल्पना मूर्त स्वरूपांत आणण्यास सुरुवात केली, याबद्दल मी पुन्हां एकवार त्यांचें अभिनंदन करतों.

प्र. वा. बापट, एम्. ए, बी. टी.,
मराठीचे प्राध्यापक, व्हिक्टोरिया कॉलेज, लश्कर.

१९-७-४३.

श्रीयुत् बर्गे, एम. ए., यांचें 'मधुमीलन' हें शिंदेशाहीवरील पहिलें नाटक मी वाचिलें. ललित वाङ्मयांत, नाटचकृति ही सर्वश्रेष्ठ, तशीच अतिशय अवघड अशी कलाकृती आहे. त्यांतून एखाद्या ऐतिहासिक विषयावर ती आधारलेली असली म्हणजे मग नाटककाराला स्थल व काल व परिस्थितीची अवजड बंधनें अपरिहार्यतेनें स्वीकारावी लागतात. बखरकारांच्या प्रेमळ सानिध्यांतून मुक्त करून ऐतिहासिक सत्याला कल्पनेच्या भडक रंगाचे मालिन्य न येऊं देतां स्वतंत्र ललितकलेच्या विविध आवरणांनीं सजवावें लागतें. तें ऐतिहासिक सत्य दृष्टीसमोर ठेवितांना प्रस्तुत नाटककार.ने अभिनंदनीय परिश्रम घेतलेले दिसतात. भाषा साधी, सोपी व ओघवती असल्यानें कथानकाचा परिपोष उत्तमरीतीनें होत गेला आहे.

राजकन्येवर 'सिहूर' येथेंच संकट येणें 'राजे शिंदेराव' यांचा उज्जयिनी येथें मुक्काम व त्यांच्या दक्षिणेंतील प्रस्थानामुळें त्यांच्या गैरहजेरींत राजकन्येचें झालेलें आदरातिथ्य, वंचनेच्या भीतीनें अस्वस्थ असलेलें स्त्री-हृदय, या घटना चांगल्या साधल्या आहेत. कल्पनेचा वास्तवाशीं युक्त संयोग झाल्यास कमलपत्रावर पडलेल्या जलबिंदूंना, मौक्तिकशोभा यावी तसा तो सुंदर दिसतो व हाच ललितकलेचा सर्वोच्च गुण!

श्रीयुत् बर्गे यांनीं नाटचमय शिंदेशाही लिहिण्याचा संकल्प केला आहे व 'मधुमीलन' हें त्या ग्रंथमालेंतील पहिलें पुष्प होय. यानंतर आणखी चार नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. ललितकलेवर मुक्त हस्तांनीं सदैव वृष्टी करावी असले असंख्य दीप्तिमान कथापुंजक या पराक्रमी राजशाहींत आहेत; ते दाखविण्याचें व विषद करून सांगण्याचें काम प्रतिभावंत कलाकारांचें आहे तें श्रीयुत बर्गे यांनीं स्वेच्छेनें स्वीकारिलें याबद्दल कुणीही त्यांचें अभिनंदन करील.

एस्. बी. राणे, बी. ए., एल्‌एल्. बी.




श्रीमन्त राजे राणोजीराव शिंदेराव, शिंदेशाहीचे आद्यसंस्थापक
उत्तरे कडील हिंदवी स्वराज्याचे प्रथम मुतालीक.

संगीत

# मधु-मीलन.

## अंक १.

### प्रवेश पहिला.

( देखावा:—दतियाजवळील दाट अरण्य. स्थळ:—झांशीजवळचे जंगल. प्रथम बंदुकीचा आवाज होतो. वाघाची मोठी आरोळी ऐकूं येते. फिरून बंदुकीचा आवाज येतो. शिकारीच्या पुरुषवेषांत राजकुमारी व तिची सखी उत्तमा घाईने प्रवेश करितात ).

**राजकुमारी**:—उत्तमा, मला वाटतं वाघाला गोळी तर नेमकी लागली. किती बिकट प्रसंग तो ! गोळी लागतांच आरोळी ठोकून तो क्रूर प्राणी माझ्यावर झेंप टाकीत येत होता. इतक्यांत कोणा बहाद्दरानं गोळी झाडली व त्याचा मोहरा लागलीच फिरविला. तो घायाळ स्थितींतच या शेजारच्या दाट जाळीकडं पळाला. त्या बहाद्दर शिकाऱ्याचाही पत्ता लागला नाहीं व आपली शिकारही अद्याप मिळाली नाहीं.

**उत्तमा**:—होय सरकार, आपणा दोघांच्याही गोळ्या खावून वाघ पुरता जखमी झाला आहे. या शेजारच्या गर्द जाळीकडं तो पळाला. तिथंच तो पडला असावा. कदाचित् तो जिवंत असला तर दबा धरून बसला असेल. म्हणून त्याला जरा जपूनच हुडकला पाहिजे.

**राजकुमारी**:—होय तसंच केलं पाहिजे. ऐक. कोणाची तरी चाहूल लागते आहे व माणसांचं बोलणंही अस्पष्ट ऐकूं येऊं लागलं आहे. उत्तमा, चल बाई. आपण इकडं थोडं आडबाजूला उभ्या राहूं. नाहींतर भलत्याच माणसांची गांठ पडायची व उगीच आणखी नवीन संकट यावयाचं.

**उत्तमा**:—खरंच सरकार, आपण म्हणतां तें अगदीं खरं. या शेजारच्या जाळी-आड होऊं या. मात्र पहा बरं, जखमी वाघ तिथं तर दबा धरून बसला नाहीं ना ? नाहीं तर येथून सुटूं, व त्याच्या तडाक्यांत सांपडूं. ( दोघी एका बाजूस जाऊन आड उभ्या रहातात. दुसऱ्या बाजूनें राजे राणोजीराव व पिलाजीराव बोलत प्रवेश करितात ).

**राजे राणोजीराव**:—जाधवराव, कांहीं म्हणा; वाघास गोळी तर लागली असावी! बंदुकीचा आवाज झाल्याबरोबर त्यानें आरोळी ठोकली. त्याबरोबरच तो कोणाच्या तरी अंगावर झेंप घालीत होता. त्या वेळीं माणसाचा घात करील या साठीं गोळी झाडावी लागली. वाघ व शिकारी या दोघांचाही ठिकाण लागत नाहीं. किती दाट जंगल आहे हें! अगदीं शेजारचें सुद्धां दिसत नाहीं.

**पिलाजीराव**:—आपण म्हणतां तें बरोबर आहे. या रानांत दुसरेही शिकारी खास असावे. बरं प्रथम आपली शिकार धुंडूं या. बेसावधपणानें बोलत उभे राहिलों, तर एखादे वेळीं त्याचीच शिकार आपण होऊं. थोडें सावधगिरीनें पाहिल्यावांचून शिकार हातीं लागणार नाहीं. ( धुंडूं लागतात. ). अरे पण हे इथं कोण आहेत? हे कोणी शिकारीच दिसतात! या कीं राव पुढें. असे बायकांसारखे कां लपून राहिलात त्या जाळीआड! या पुढें. ( राजकुमारी व उत्तमा पुढें येऊन राजांना लवून राम राम करितात ).

**उत्तमा**:—सरदारसाहेब, आम्हीं लपलों नव्हतों. आम्हीं आपली शिकार धुडीत होतों. सरकारांची गोळी वाघाला नेमकी लागली. पण जनावर बरंच धिप्पाड असल्यानं तें गोळी खाऊन या झाडींत नाहींसं झालं.

**पिलाजीराव**:—अस्सं! मग मघां आवाज झाला तो आपल्या मित्राच्या गोळीचाच वाटतें! शिंदेराव पाहिलेत कां, हेच ते शिकारी! ( जाळीकडे न्याहाळून पहात ) अहो, वाघ तर या जाळींत मरून पडला आहे! (शेंपटी धरून बाहेर ओढून काढतात.). काय भयंकर जनावर आहे हें! शिंदेराव, आजची शिकार फारच धिप्पाड आहे. सरदारसाहेब आपण राजपूत दिसतां!

**उत्तमा**:—( थोडें गोंधळून ) होय, आम्हीं राजपूत आहोंत. आम्हीं दतियाचे सरदार असून जीवश्चकंठश्च स्नेही आहोंत. थोड्याशा लवाजम्यासह या अरण्यांत शिकारीकरितां आलों आहोंत. आपल्यापैकीं कोणत्या महाभागांनीं गोळी झाडून आमच्या सरदारसाहेबांना त्या वाघाच्या दाढेंतून वांचविलं?

**राजे राणोजीराव**:—( राजकुमारीस ) आपणच पहिली गोळी झाडली ना? खरोखर आपले प्राण फार धोक्यांत होते! सहज आम्हीं इकडे आलों व वाघाची आरोळी ऐकून त्यावर गोळी टाकली.

**राजकुमारी**:—तुमचे आभार मानू कीं, तुमच्यावर रागावूं हेंच मला समजत नाहीं! आपण गोळी झाडली नसती तर माझी शिकार मला मिळाली असती! आपण

माझा खरा बहुमान केल्यासारखं झालं असतं ! माझी दुसरी गोळी अगदीं तयार होती. तोंच आपण मध्यें घुसून माझा अपमान केला आहे. कोणालाही हातची शिकार दुसऱ्यांनीं उडविली तर फार चीड येते. पण जाऊं द्या. आपण न कळत व प्राण वांचविण्याच्या शुद्ध हेतूनं चूक केली असल्यानं मी रागावणार नाहीं. आपण शूर आहांत म्हणून मला आदर वाटत आहे. आम्हीं, दतियाचे सरदार, आपलं अंतःकरणपूर्वक अभिनंदन करितों.

**राजे राणोजीरावः**—यांत अभिनंदन करण्यासारखें काय आहे ? झालेल्या चुकीबद्दल आपण आमचा राग करीत नाहीं यांत आम्हांस सर्व कांहीं लाभलें. या, ही आपली शिकार स्वीकारा. आम्हांला आमच्या चुकीची दुरुस्ती करूं द्या. ( राजकुमारी लाजत वाघाजवळ जाते व त्यावर पाय ठेवून उभी राहते ). आपण दतियाचे सरदार आहांत. त्यामुळें उद्यांच तुम्हीं आमचे शत्रु असें आम्हांस समजावें लागेल. खंडणी देण्याचें नाकारून आपल्या राजेसाहेबांनीं आमच्या मराठासत्तेशीं एक प्रकारें युद्ध पुकारलें आहे. राजेसाहेबांनीं मराठ्यांचा मोठा अपमान केला आहे. महाराज छत्रसालांसारख्या बुंदेलखंडांतील सार्वभौम सत्ताधाऱ्यांनीं आम्हांस मदत करावी, आणि या दतियाच्या लहानशा राजांनीं आम्हांवर मात करूं पहावें, हें जरा नवलच नव्हे कां ? मराठे असला खोडकरपणा केव्हांही सहन करीत नसतात ! विरोध करणाऱ्यांशीं युद्ध पुकारून त्यांस दातीं तृण धरावयास लावितात.

**राजकुमारीः**—( रागानें ) एवढी धमकी कोणासमोर देत आहांत, याचं भान तरी आहे कां ? आम्हीं दतियाचे सरदार असून राजपूत आहोंत. मातृभूमीचा अपमान आम्हीं केव्हांही सहन करून घेत नाहीं. मराठे असलां तरी इथं कोणी तुम्हांला भिणार नाहीं ! राजपूत आपल्या अपमानाचा जाब नेहमीं तरवारीनंच विचारतो ! आम्हीं स्वतंत्र आहोंत. खंडणी मागून तुम्हीं आमचं स्वातंत्र्य हिरावण्याचा प्रयत्न करीत आहांत. मांडलीकत्व स्वीकारा असं सांगणं म्हणजे भयंकर अपमान करणं आहे ! कोणता शहाणा मातृभक्त, आपल्या मातृभूमीस परकीयापुढं शिर नमविण्यास लावील ?

**राजे राणोजीरावः**—शाबास सरदारसाहेब ! बहाद्दर आहांत. आपलें तेज, आपली हिंमत, आम्हांला फारच आवडली. पण महाभारतांतील उत्तराप्रमाणें ती नुसती बडबड ठरूं नये. दतियावर मोर्चा लावण्याकरितां आम्हीं आलों आहोंत. त्या पलीकडच्या अफाट करारी तलावाच्या कांठीं आम्हीं छावणी टाकली आहे. आज किंवा उद्यां वकील पाठवून तुमच्या राजेसाहेबांस समजावयाचा प्रयत्न करूं. समजूत न झाली तर युद्धाचें

रणशिंग फुंकूं. तुमचे आमचे दोन हात होण्याची वेळ फार दूर नाहीं. त्या वेळीं आपला पराक्रम दिसेलच. बाकी आपण बरेच तेजस्वी दिसतां ! कां खरं कीं नाहीं जाधवराव ?

**पिलाजीराव**:—स्वारी जरा तिखट दिसते खरी. पण अजून ओंठ पिळले तर दूध निघेल, इतकी नाजुक आहे. हे आपल्यासारख्या कसलेल्या मर्दाबरोबर कसे लढूं शकतील ? सरदारसाहेब, शिंदेराव म्हणजे सामान्य शिपाई गडी नव्हेत ! आजवर त्यांनीं अनेक लढाया मारल्या आहेत. अनेक मदोन्मत्त शत्रूंना त्यांनीं चुटकीसरसें लोळवलें आहे. म्हणून म्हटलें, युद्धाच्या भानगडींत तुम्हीं किंवा तुमच्या राजेसाहेबांनीं पडूं नये. तुमचें नुसतें मनगट धरलें तर चीची कराल. अहो, कुठें शिंदेरावासारखे जवानमर्द लढवय्ये, आणि कुठें तुम्हीं कोंवळे, लुसलुसीत, गोंडस, पण ठसकेबाज राजपूत सरदार-साहेब ? हं, पुरे करा आतां तुमच्या लढाईच्या गप्पा. थोड्या आपल्या शिकारीच्या मौजेच्या गोष्टी करा व आपल्या वाटेनें जा. आम्हींही आपल्या छावणीकडे जाऊं. उद्यांचें भांडण आज इथें नको.

**उत्तमा**:—सरदारसाहेब म्हणतात तेंच खरं. उगीच अटीतटीच्या गोष्टी करून वर्दळीवर कशाला येतां ? मराठेही पराक्रमी व राजपूतही पराक्रमी. वेळ येईल तेव्हां पहातां येईल.

**राजकुमारी**:—मराठ्यांनीं उगीच राजपुतांच्या खोड्या काढून त्यांना हिणवणं हें आम्हांला केव्हांही आवडणार नाहीं. जिकडं पहावं, तिकडं मराठे ! सुळसुळाट झाला आहे त्यांचा जणू काय ? ह्यांच्या राज्यावर परक्यांनीं स्वारी करून अपमान केला तर हे तरी करतील कां सहन ! मग आम्हां राजपुतांवर स्वाऱ्या करून त्यांनीं वरचेवर असा त्रास कां द्यावा ? त्यांना राजपुतांचीं मुळीं राज्यंच ठेवावयाचीं नाहींत, हेंच खरं.

**राजे राणोजीराव**:—असें रागावूं नका सरदारसाहेब. आपण राजपूत असून शिवाय सुंदर, तरुण व शूरही आहांत. थोडें शांतपणानें आपण आमच्या बोलण्याचा विचार केलात, तर आम्हीं करीत आहों तें कांहीं वावगें नाहीं असेंच आपलें देखील मत होईल. मग आपणच आम्हांस मदत करण्यास तयार व्हाल. आपला स्वाभिमान व तेजस्विता पाहून खरोखर आमच्या मनाला समाधान वाटलें ! आपल्यासारखे शूर, वीर व कळकळीचे मातृभक्त आम्हांस सहाय्यक झाल्यावर आमचें ध्येय गांठा-वयास काय वेळ आहे ? जाधवराव, मराठ्यांची व राजपुतांची आजची ही तरुण पिढी

एकोप्यानें व जोमानें स्वराज्याच्या सेवेस पुढें आली तर मोठी बहार होणार आहे! सरदारसाहेब, कर्मधर्मसंयोगानें तुमची आमची भेट झाली आहे. हें युद्ध टाळलें तर आमचें मोठें काम केल्यासारखें होणार आहे.

**राजकुमारीः**—राजपुतांचा जेणेंकरून अपमान होणार नाहीं, त्यांना स्वतंत्र राहतां येईल, अशी एखादी गोष्ट जर आपण सुचविली, तर आम्हीं आपणांस जरूर मदत करूं. पण प्रथम आपणांस आमचा असा सवाल आहे कीं, मराठे लोकांनीं उत्तरेकडे स्वाऱ्या करून राजपुतांचा कोंडमारा कां चालविला आहे? दक्षिण देश त्यांना पुरत कां नाहीं? तिकडं त्यांनीं खुशाल राज्य करावं.

**उत्तमाः**—उत्तरेकडं राजपूत वास करितात, म्हणून इकडं राजपुतांचा हक्क आहे. या देशाचं संरक्षण करण्यासाठीं हजारों वर्षें ते झगडले आहेत. परकीयांनीं सारख्या स्वाऱ्याकरून त्यांना सतावलं आहे. शिकंदरासारखे महाशिकंदर येऊन गेले! गझनी, घोरी, गुलाम वगैरे पठाणांनीं त्यांना बेजार केलं! बाबरासारख्यांनीं त्यांना गुलामगिरीच्या शृंखलेंत जखडून टाकलं! अकबरासारख्यांनीं धर्मैक्याच्या गोड गोड थापांनीं भुरळ पाडली व त्यांच्या लेकी-बहिणी जनान्यांत ओढून नेल्या! अवरंगजेबासारख्यांनीं हिंदुधर्म भ्रष्ट केला व देवळांच्या मशिदी बनविल्या. अशा अनेक आपत्तींशीं झगडत झगडत राजपूत आपलं स्वत्त्व कायम राखीत असतां स्वकीय म्हणविणाऱ्या मराठ्यांनीं दक्षिणेंतून येऊन बगलेंत खंजीर खुपसण्यास सुरुवात करावी हें नवल नव्हें कां?

**राजे राणोजीरावः**—राजपूत वीरांनो, आपण चांगला प्रश्न केला. उत्तरेकडे राज-पुतांनींच पुढाकार घ्यावा असें मराठ्यांचेंही म्हणणें आहे. राजपूत व मराठे भाऊ भाऊ आहेत. त्यांनीं एक होऊन सहकार्यानें आपल्या शत्रूंना चीत करावें. उगीच आपसांत कलह करीत बसूं नये. याच हेतूनें आम्हीं राजपूत राजांशीं मैत्री संपादन करीत आहोंत.

**राजकुमारीः**—मैत्री संपादन करीत आहांत कीं, त्यांना जिंकून आपले मांडलीक बनवीत आहांत? आम्हांला वाटतं, स्वकीय असोत किंवा परकीय असोत, मराठे सर्वांवरूनच वरवंटा फिरवीत असून त्यांना अगदीं पिसून काढीत आहेत. मोंगलांशीं उघड उघड झुंज घेणारे आमचे बुंदेलखंडचे सार्वभौम राजाधिराज महाराज छत्रसाल आम्हांला स्वतंत्र राखण्यासाठीं रक्ताचं पाणी पाणी करीत आहेत! त्यांनीं आपलं सर्व आयुष्य या कार्यास समर्पण केलं आहे. आतां तुम्हीं या बुंदेलखंडांत येऊन आमचं स्वातंत्र्य हरण करीत आहांत? काय म्हणावं तुम्हाला?

**राजे राणोजीराव**:—सरदारसाहेब, मराठ्यांसंबंधीं आपला थोडा गैरसमज आहे. ते नेहमीं आप्त किंवा स्वकीय जाणतात ! त्यांना परकीय यवनांपेक्षां राजपूत केव्हांही अगदीं जवळचे आहेत. आम्हीं सर्व हिंदूंचें संघटन करण्याची खटपट करीत आहोंत. जयपूर, जोधपुर व उदेपुर येथील महाराण्यांशीं आम्हीं मैत्री केली असून महाराज छत्रसाल तर आमचे पूर्ण पक्षपाती आहेत. आपल्यासारखे इतर राजपूत, शीख, वगैरे सर्व हिंदूंत ऐक्य व्हावें व एकीचें बळ निर्माण करावें अशी आमची रात्र-दिवस खटपट चालू आहे.

**राजकुमारी**:—म्हणतां मात्र स्वकीय, पण त्यांच्यावर स्वाऱ्या करून खंडणी वसूल करण्याची शिकस्त करितां, ही कोणती आपुलकी ? आम्हांला याचा अर्थच कळत नाहीं. वास्तविक उदेपुरचे महाराणाजी राजपुतान्यांत पूज्य मानले जातात. सर्व राजपुतांनीं त्यांच्या निशाणाखालीं एकत्र व्हावं किंवा बुंदेलखंडांतील सार्वभौम महाराज छत्रसाल ह्यांच्या निशाणाखालीं सर्वांनीं एकत्र व्हावं. उगीच मराठ्यांनीं मध्येंच आपलं घोडं पुढं कां दौडावं ?

**राजे राणोजीराव**:—वीरा, तूं म्हणतोस तें योग्य आहे. उत्तर हिंदुस्थानांत हिंदुपद-पातशाह होण्याचें भाग्य उदेपुरच्या महाराणाजींचें आहे. राजपुतांतील हें जातिवंत घराणें असून त्या मानाला ते सर्वस्वी अधिकारी आहेत. मराठ्यांना त्या घराण्याबद्दल पूर्ण अभिमान व आदर आहे. हिंदुपदपातशाह मराठ्यांचाच व्हावा असा आमचा अट्टाहास नाहीं. मुसलमानांच्याऐवजीं हिंदूंचा बादशाह होऊन अखिल भारतवर्षांत स्वराज्य नांदावें हाच आमचा हेतु. आमचें व राजपुतांचें ध्येय एकच. आपल्याप्रमाणेंच इतर राजपुतांचाही गैरसमज आहे. वास्तविक राजपूत व मराठे सख्खे बंधू आहेत. आपण सर्व पूर्वींच्या आर्यक्षत्रियांचे वंशज आहोंत. प्रांतभेदामुळें राजपूत व मराठे असा भेद झाला आहे. आमच्या क्षत्रिय कुलावतंस श्रीशिवछत्रपतींचें भोंसले घराणें उदेपुरच्या महाराण्यांच्या वंशांतीलच होय. दक्षिणेंत जेवढीं म्हणून मराठा घराणीं आहेत तीं सर्व वंशानें राजपूत आहेत. मराठ्यांच्या शहाण्णव कुळीं व राजपुतांच्या छत्तीस कुळीं या एकाच आर्यक्षत्रिय वृक्षाच्या शाखा आहेत. आमची हिंदवीस्वराज्याची कल्पना ही कीं, सर्व हिंदूंचें ऐक्य करावें. मुसलमानी राजसत्ता नाहींशा कराव्यात व भारतवर्षांत स्वराज्यस्थापना करावी. या ध्येयापेक्षां स्तुत्य ध्येय दुसरें कोणतें असेल बरें ?

**राजकुमारी**:—अस्सं ! एकूण मराठेही मुसलमानांचाच उच्छेद करूं इच्छितात तर ! जें मराठ्यांचं ध्येच आहे तेंच राजपुतांचंही आहे. बुंदेलखंडांत राजे चंपतराय यांनीं

मुसलमानी राजसत्तेस विरोध करण्यास सुरुवात केली. त्यांचेच सुपुत्र महाराज छत्रसाल यांनीं बुंदेलखंडापुरतं तरी स्वराज्य यशस्वी केलं आहे. जयपूर व जोधपूर येथील महाराणे आतां जागे होऊन त्यांनीं मोंगल राजसत्ता पोंखरण्यास सुरुवात केली आहे. राजपूत राजांनीं अशा शपथा घेतल्या आहेत कीं, आपल्या मुली किंवा बहिणी मुसलमानांस द्यावयाच्या नाहींत. मुसलमान झालेल्या राजपूत स्त्रियांची इच्छा असल्यास त्यांना शुद्ध करून घेण्याचीही व्यवस्था करण्यांत आली आहे. राजकन्या इंद्रकुमारी नुकतीच शुद्ध करून घेतली आहे. अजून माझी एक शंका दूर झाली नाहीं. मराठ्यांनीं राजपुतांवर आक्रमण कां करावं ! तुम्हीं आमचे स्वकीय म्हणवितां मग आमच्यावर स्वारी कां करितां !

**राजे राणोजीराव**:—जे मित्र झाले त्यांना आम्हीं जिवापलीकडे जपतों. जे विरुद्ध जातात त्यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगण्याकरितां आम्हांला हें स्वारी करण्याचें कटु काम करावें लागतें.

**पिलाजीराव**:— शिंदेराव, सरदारसाहेब मोठे हुशार, माहीतगार व शूर दिसतात. अहो, महाराज छत्रसाल म्हणजे आमच्या श्रीशिवप्रभूचे पट्ट शिष्य !

**उत्तमा**:—सरदारसाहेब, आमच्या सरकारांना राजपुतांबद्दल मोठा अभिमान असून मुसलमानांबद्दल तीव्र तिरस्कार आहे. महाराज छत्रसाल त्यांच्या दरबारीं यांचं बाळपण गेल्यामुळं यांचा राजकारणाचा अभ्यास बराच झाला आहे. दतियामध्यें स्वराज्य रहावं व ही रियासत स्वतंत्र रहावी अशी यांची फार इच्छा आहे. महाराजसाहेबांचाही यांच्यावर फार भरंवसा आहे. बुंदेलखंडांतील बारा रियासती एक होऊन महाराज छत्रसालांना पुढारी मानून त्यांच्या निशाणाखालीं मुसलमानी सत्तेशीं आज टक्कर देत आहेत.

**राजे राणोजीराव**:—बुंदेली बारा राज्यें म्हणजे आमच्या इकडील बारा मावळेच होत. शिवछत्रपतींनीं प्रथम हींच एकत्र केलीं व स्वराज्यस्थापनेची मुहूर्तमेढ रोंविली. महाराज छत्रसाल व आमचे शिवप्रभु यांचे प्रयत्न अगदीं सारखे आहेत. जें ध्येय त्यांनीं आंखलें त्या दिशेनेंच आम्हीं वागत आहोंत. आजपर्यंतच्या मराठा वीर पुरुषांनीं त्याच ध्येयासाठीं अनेक कष्ट केलेले आहेत. छत्रपति संभाजी व राजाराम, महाराणी ताराबाईसाहेब, इत्यादि विभूतींनीं स्वराज्यवृक्षाची जोपासना अनेक हालअपेष्टा सोसून केली आहे. थोरल्या आबासाहेबांचें ध्येय म्हणजे जणूं काय भगवान् श्रीकृष्णाचा महामंत्रच ! तोच महामंत्र शिवप्रभूचे अवतार छत्रपति शाहू आज जपत आहेत !

आम्हीं त्यांचे पाईक आहोंत. आमच्या रोमारोमांतून हिंदवी स्वराज्याच्या उच्च भावना थरारून नाचत आहेत! त्याच ध्येयपूर्तीकरितां अनेक देश पालथे घालून आम्हीं आमच्या जिवाचें चीज करीत आहोंत. दक्षिण देश जिंकून मराठ्यांनीं श्रीशाहू-छत्रपतींना हिंदुपदपातशाह बनवलें आहे. उत्तरेकडील प्रयत्न आम्हीं त्यांच दृष्टीनें करीत आहोंत. आमच्या छत्रपतींची इच्छा आहे कीं, उदेपूरच्या महाराण्यांनीं दिल्लीपति व्हावें. कारण हें घराणें सर्व हिंदूंना परमपूज्य आहे. त्यांची राजकारणाची आंखणी अशी आहे कीं, उत्तरेस उदेपूरचे महाराणे; नागपूर, बिहार व बंगालकडे रघोजी भोंसले; महाराष्ट्रांत सातारचे विद्यमान छत्रपति; मोंगलाईंत अक्कलकोटकर राजे फत्तेसिह; कर्नाटकांत करवीराधिपति छत्रपति संभाजी, व तेलंगणांत तंजावरकर छत्रपति; अशा प्रकारें सर्व भोंसले घराण्यांनीं एकतंत्रानें वागून हिंदवी स्वराज्याचा झेंडा अटकेपार फडकवावा. सध्यां सातारकर छत्रपतींनीं पुढारपण घेतलें आहे. ते व त्यांचे अनुयायी आम्हीं, राजपुतांशीं ऐक्य करण्याकरितां रात्रंदिवस धडपडत आहोंत. सर्वांनाच ध्येयप्राप्तीची तळमळ अतिशय लागली आहे.

**राजकुमारीः**—(विचारी मुद्रेनें) आंता आलं माझ्या ध्यानांत. किती उदात्त आहे तुम्हां मराठ्यांचं ध्येय! जर राजपूत व मराठे एक होतील तर या भारतभूमींत मुसलमानांचं नांव देखील उरायचं नाहीं! महाराज, तुमचं ध्येय श्रेष्ठ आहे! तुमचं अंतःकरण उदार आहे! खरोखर आपण धैर्यशाली पुरुष आहांत! बरं आम्हीं राजपूत म्हणून आम्हांला तुम्हीं जर स्वकीय समजत असाल तर कृपा करून या आमच्या लहानशा राज्यावर हल्ला करूं नका. आम्हीं मोठ्या प्रेमानं सलोखा घडवून आणण्याचा प्रयत्न करूं.

**पिलाजीरावः**—लढाई करावयाची आम्हांला हौस कां आहे? महाराज छत्रसालांशीं नाहीं का आमचा स्नेह! त्यांना त्रास देण्याऐवजीं ते आज्ञा देतील तेव्हां दुसऱ्यांकडून होणारा त्रास दूर करण्याकरितां असेल तसे आम्हीं धांवून येतो. तुमचे राजेसाहेब त्यांचे मांडलिक असूनही आमच्याशीं योग्य सल्ला करीत नाहींत. चौथाई, सरदेशमुखी, किंवा खंडणी दिली म्हणजे आम्हीं मित्र झालोंच. तुमच्या राजेसाहेबांनीं खंडणी देण्याचें नाकारिलें म्हणून हें प्रकरण इतकें हातघाईवर आलें आहे. बुंदेलखंडांत सर्वत्र शांतता नांदावी, एकतंत्री राजसत्ता प्रस्थापित व्हावी, मुसलमानांची पीडा नाहींशी व्हावी, राजपुतांनीं नुसती खंडणीची रक्कम द्यावी, व हिंदवी स्वराज्य प्रस्थापित करण्यास मदत करावी. एकतंत्री किंवा एकसूत्री राज्यसत्तेला मान देऊन इतर राजेमहाराजांनीं आपआपल्या ठिकाणीं खुशाल रामराज्यें करावीं. आपल्या राजे-

साहेबांसारखी कांहीं मंडळीं ह्या ध्येयाच्या विरुद्ध जातात त्यामुळें आम्हां मराठ्यांना अशी घोडदौड करावी लागते.

**उत्तमा**:—आमचे सरकार या बाबतींत जरूर खटपट करतील. आमच्या महाराजांचा विचार घेऊन आम्हीं आपणांस ताबडतोब कळवूं.

**राजे राणोजीराव**:—मग तर फारच छान. तुम्हीं आमचें मोठें कामच केल्यासारखें होईल. काय राजश्री, आपला काय विचार आहे ?

**राजकुमारी**:—आपलं सर्व धोरण माझ्या लक्षांत आलं आहे. त्या दृष्टीनं आमच्या महाराजांशीं मी वाटाघाट करीन. आतां युध्द तरी खास होऊं देणार नाहीं. अटी ठरवतांना आपण जरा उदार मनानं वागावं, अशी आमची आपणांस नम्र विनंती आहे.

**राजे राणोजीराव**:—ठीक आहे. आम्हीं आपल्या बाहेर जाणार नाहीं. आपण उद्यां आमच्या छावणींत जरूर या. आपले राजेसाहेबांची इच्छा आम्हांला कळवा. तिथें वावरण्याकरितां परवल म्हणून ही आमची मुद्रा आपण घ्यावी. ही दाखविल्यावर आमच्यापर्यंत येण्यास आपणांस अटकाव होणार नाहीं. आपणही आपल्यातर्फें वचन म्हणून कांहीं खूण द्यावी. ( मुद्रा देऊं लागतात तोंच हस्तस्पर्श होतो. )

**राजकुमारी**:—( मुद्रिका घेते. पण हस्तस्पर्श होतांच बिचकते. थोडी लाजून खालीं पहाते. ) मीही वचन म्हणून माझी मुद्रिका आपणांस देतों. ती आपण अगदीं जिवापलीकडे जपावी. ( पहात व लाजत देते. )

**राजे राणोजीराव**:—( स्पर्शसुखानें आश्चर्यचकित होऊन, पहात ) काय ! मी स्वप्नांत तर नाहीं ? सरदारसाहेब, आपले हात किती कोमल आहेत ! ते गुलाबाप्रमाणें लाल व लुसलुसीत आहेत ! कंठ किती मधुर आहे ! वागणूक किती आदरशील आहे ! सौंदर्यानें प्रत्येक गात्र कसें फुलून दिसत आहे ! ( निरखून पाहून ) माझी फसवणूक तर होत नाहीं ना ! जाधवराव, जरा न्याहाळून पहा बरं ! मी कोठें चुकत तर नाहीं ना ! वीर पुरुषा, असे लाजतां काय ? काय गौडबंगाल आहे हें !

**पिलाजीराव**:—खरेंच शिंदेराव, हें कोडेंच दिसत आहे. पण आतां तें इथें सोडवीत न बसतां उद्यां छावणींतच तें आपण सोडवूं. हं चला, आतां इथें अधिक वेळ थांबणें योग्य होणार नाहीं.

**राजे राणोजीराव**:—खरेंच जाधवराव ! सरदारसाहेब, आम्ही आतां आपली परवानगी घेतों. उद्यां मात्र न चुकतां छावणींत यावयाचें हं ! आम्हीं आपली वाट अगत्यपूर्वक पाहूं. चला जाधवराव. रामराम. ( शिंदेराव व जाधवराव जातात ).

**राजकुमारी**:—( लाजून सारखी टक लावून पहात असते ) काय हें रूप! काय हें शौर्य! कसलं हें सर्वश्रेष्ठ राजकारण! राजे फार थोर आहेत!

**उत्तमा**:—( हंसत ) चलायचं म्हटलं छोटे सरकार! कां उभ्या कां? कसला विचार चालला आहे! कांहींतरी विशेष घडल्यासारखं दिसतं? शिंदेरावांनीं कांहीं जादू-टोणा केला वाटतं! राजवैद्यानें राजकारणाच्या नाडीबरोबर तुमच्या हृदयाच्या ताराही छेडल्या वाटतं? कारण आपल्या चेहऱ्यावर प्रेमाचं संगीत स्पष्टपणं उमटलेलं दिसत आहे! आज वाघाची शिकार मिळण्याच्याऐवजी तुम्हींच त्या पुरुषव्याघ्राच्या शिकार झालात असं दिसतं!

**राजकुमारी**:—( लाजत ) उत्तमे, असं कांहीं झालं खरं! ते पुरुषव्याघ्र नसून नरसिंह आहेत! केवढं त्यांचं उदात्त ध्येय! केवढं त्यांचं शौर्य! केवढं त्यांचं उदार अंतःकरण! राजपूत-मराठ्यांचं ऐक्य! किती गोड गोड मंत्र आहे हा! तो साध्य झाला तर, उत्तमे, हिंदुपदपातशाही स्थापन होण्यास वेळ लागणार नाहीं! या ध्येयाची पूर्तता ह्याच पुरुषश्रेष्ठाच्या हातून खास होईल, असं माझं हृदय मला सांगत आहे.

**पद १**

( चाल—सखि गीत सिखाऊं सुनो री। —संतसखू )

बघ राव सखे ग गुणराशी ॥
मम मानसहंस सुखवासी ॥
रुजलें मन हिंदवि राज्यासीं ॥
साहाय्य करूं ग, अर्पुनि भक्तिभाव चरणासीं ॥
करित ते पूर्ति ध्येयाची, शिव छत्रपती कार्याची ॥
यवनपाश तोडायाची ॥ १ ॥

या पुरुषानं थोड्याशा वेळांत आपल्या गोड सहवासानं आज माझं सगळं जीवन बदललं असं वाटतं! ते मला गुरूजनांसारखे पूज्य झाले आहेत! हिंदवी स्वराज्याचा नूतन संदेश त्यांनीं मला दिला! त्या गुरुमंत्राचीं पारायणं करून राजपूतमराठा ऐक्य घडवून आणावयाचं हेंच ध्येय माझंही निश्चित झालं आहे. उत्तमे, तूही स्वराज्याचा, स्वातंत्र्याचा, संघटनेचा, व ऐक्याचा मंत्र जपत मजबरोबर राष्ट्रसेवेचं व्रत घे.

**उत्तमा**:—सरकार, आज हें एक नवीनच वेड आपल्या डोक्यांत शिरलं म्हणावयाचं! चला वेळ फार झाली: सगळे शिकारी तिकडं आपणांस धुंडीत असतील.

**राजकुमारी**:—चल, उत्तमे.

( जातात. )

## अंक पहिला.

### प्रवेश दुसरा.

(दतियाच्या किल्यांतील राजवाड्यांतील दिवाणखाना. महाराज आसनावर बसले आहेत. सेनापति हात जोडून उभे आहेत.)

**राजाः**—सेनापति, मराठ्यांच्या फौजा झांशीजवळ येऊन तळ देऊन राहिल्या म्हणतां! मग आतां तुम्हीं काय करणार आहांत? आपली सर्व फौज तयार आहे ना? काय करावें या मराठ्यांना! एखाद्या सैतानासारखे हे बिलकुल स्वैरसंचारी आहेत. वाटेल तशी खंडणी मागणें, व लुटालूट करणें, या शिवाय यांना कांहीं सुचत नाहीं. आज सर्व बुंदेले राजे, आपलें स्वातंत्र्य राखण्याकरितां मुसलमानांशीं झगडत असतां हे उपटसुंभ आणखी आम्हांला त्रास देत आहेत. कांहीं हरकत नाहीं. आपलें सर्व सैन्य सज्य करा. आघाडीवर जंगलामध्यें बरेंचसें सैन्य ठेवून मराठे इकडे चालून येतांच जंगलांतच त्यांचा फन्ना उडवून आमच्याकडील खाशी फौज राजधानीच्या आसपास राहूं द्या. तुमची फौज व आमची फौज यांच्या कात्रींत मराठ्यांची फौज धरली पाहिजे, त्यांना कोंडूनच कोंडमारा करणें सोपें होईल. त्यांची फसगत केल्यावांचून आम्हांला खात्रीलायक यश मिळणार नाहीं.

**सेनापतिः**—महाराज, आपली सेना जय्यत तयार आहे. पण मराठ्यांच्या अफाट सेनासागरापुढें ती एखाद्या लहानशा ओहोळाप्रमाणें आहे. मात्र ती कडवी व पराक्रमी आहे. तिच्यामध्यें एक प्रकारचा जिवंतपणा आहे, म्हणून मला नेहमीं तिच्याबद्दल मोठी उम्मेद वाटते. पण त्या असंख्य फौजेपुढें आपला टिकाव कसा लागावा! त्यांचें शिलेदारी घोडदळ तर फार प्रख्यात आहे. त्यापुढें टिकाव धरणें फार कठीण होईल. मराठ्यांशीं युद्ध सुरू करण्याच्या अगोदर थोडा विचार करूनच पाऊल टाकावें असें मला वाटतें.

**राजाः**—तुम्ही सेनानीच प्रथमारंभीं असे हातपाय गाळूं लागला तर मग युद्धांत यश कसें लाभावें! मराठे म्हणजे कांहीं अस्मान फोडून खालीं आले नाहींत, किंवा पाताळांतून वर उगवले नाहींत! तींही आमच्यासारखीं माणसेंच आहेत! मला कळलें आहे कीं, त्यांच्या सैन्यांत बाजारबुणगेच फार असतात. त्यांच्या मोठ्या संख्येला भिण्याचें मुळींच कारण नाहीं. राजपूत नेहमीं मरणाला तयार असतो. शत्रूला पाठ दाखविणें हें त्याचें ब्रीद नव्हें. या असिधाराव्रतामुळेंच शत्रूचा निःपात होतो व विजयमाला त्याच्या गळ्यांत पडते. मराठे नेहमींच पळपुटे! पळण्यांतच त्यांचें कौशल्य

पाहून घ्यावें ! सेनापति, वाटेल ते करा मराठी सैन्याचा मोहरा मागें फिरलाच पाहिजे. मारूं किंवा मरूं पण आम्हीं बुंदेले वीर, भुरट्या मराठ्यांना शरण जाणार नाहीं. हाच आमचा संदेश सर्व सैन्याला कळवा, व लागलीच युद्धावर जाण्याची तयारी करा. झांशी व दतिया यांमधील अरण्याचा फायदा घेऊन तिथेंच मराठ्यांना गारद करा. आमची आज्ञा हीच कीं युद्धाचें रणशिंग फुंकून अरण्यांत जा. मराठे आमचे शत्रु असून आम्हीं त्यांचें पारिपत्य ताबडतोब केलेंच पाहिजे.

( राजकुमारी व उत्तमा प्रवेश करितात. )

**राजकुमारीः**—( मोठ्या आर्जवानें ) बाबा, मराठे शत्रु नाहींत. ते मित्र आहेत. ते राजपुतांचे बांधव आहेत ! ते आर्यक्षत्रियांचे वंशज असून भारतभूचा उद्धार करणारे आहेत !

**राजाः**—कुवर, काय म्हणतां तुम्ही ? मराठे आपले शत्रु नाहींत ? तुम्हांला भ्रम तर झालेला नाहीं ? तुम्हांला कुणीं भुरळ तर पाडली नाहीं ? जिकडे पहावें तिकडे त्यांनीं धुमाकूळ मांडला आहे. माळव्यांत, मारवाडांत, बुंदेलखंडांत, सर्व ठिकाणीं सारख्या स्वाऱ्या करून ते राजपुतांचीं हाडें भरडून काढीत आहेत. त्यांना तुम्हीं शत्रु समजत नाहीं, उलट मित्र समजतां हें आश्चर्य नव्हें कां ? आज, ते दतियावर चाल करून आले आहेत ते मित्र म्हणूनच वाटतें ? सेनापति, मी आज्ञा केल्याप्रमाणें ताबडतोब सैन्य घेऊन त्यांचा बंदोबस्त करा. हयगय करण्याची ही वेळ नाहीं.

**सेनापतिः**—जी हुजूर, बंदा सेवेला तयार आहे. पण राजकुवर म्हणतात त्याचा थोडा विचार करावा.

**राजकुमारीः**—बाबा, आपण अगदीं ठीक बोललांत. ते राजपुतांवर स्वाऱ्या करतात, त्यांच्याकडून चौथाई, सरदेशमुखी, वगैरे खंडणी वसूल करितात. वेळीं-अवेळीं राजपुतांचीं राज्यंही खालसा करतात. पण हें ते कशाकरितां करतात, याचा थोडा विचार केला पाहिजे. त्यांना हिंदवी स्वराज्य स्थापन करावयाचं आहे ! त्यांना हिंदुपदपातशाही चिरस्थायी करावयाची आहे ! ते मुसलमानांच्या मगर-मिठींतून या भूमीला मुक्त करूं इच्छित आहेत ! त्यांना शत्रु म्हणण्यापेक्षां आपले मित्र म्हणा. राष्ट्राचा उद्धार करण्याकरितां तुम्हीं त्यांच्या मदतीस धांवून जा. त्यांनीं दक्षिणेकडे स्वराज्य स्थापन केलं असून, उत्तरेकडेही मोंगल सत्तेस पायबंद देऊन तिला जखडीत आणली आहे. मराठ्यांना आद्य श्रीशिवछत्रपतींनीं स्वराज्य स्थापन

करून देव, धर्म व देश यांच्या सेवेचं बाळकडू पाजलं. आहे ! त्यांचेच अवतारी नातू श्रीशाहूछत्रपति हिंदवी स्वराज्याचं लोण उत्तरेकडं पोहोंचवीत आहेत. आपले बाबाजी, महाराज छत्रसाल त्या शिवप्रभूचे पट्ट शिष्य असून, हल्लींच्या छत्रपतींचे जिवलग मित्र आहेत. दोघांचीं ध्येयं एकच आहेत व प्रयत्नही एकमतानं चालू आहेत. सध्यां शिंदेराव व जाधवराव ह्या दोन सेनापतींना त्यांनीं बुंदेलखंडच्या मोहिमेवर पाठविलं आहे. दोन्ही सेनापति फार सज्जन आहेत. मित्रास ते सचोटीनं साहाय्य करितात. पण शत्रूंचे ते कर्दनकाळ आहेत. म्हणून त्यांच्याशीं आपण तह करावा असं माझं स्पष्ट मत आहे.

**राजा**:—कुवर, तुम्हीं म्हणतां तें खरं कसं समजावें ? सर्व ठिकाणीं त्यांनीं लुटालूट व जाळपोळ चालविली आहे. तेव्हां ते हिंदु असले तरी आमचे शत्रु आहेत. मोंगलसत्तेशीं त्यांनीं वाटेल तसें झुंजावें. पण आम्हां स्वकीयांशीं द्रोह कां करावा ? राजपूतही दिल्लीपतीची सत्ता नष्ट व्हावी असा प्रयत्न करीत आहेत. हिंदुपदपातशहा होण्याचा मान राजपुतांचा, मराठ्यांचा नव्हे ! तो हक्क मराठ्यांना प्राप्त होत नसून उलट त्यांनीं उत्तरेकडे पाऊल ठेवितां उपयोगी नाहीं.

**राजकुमारी**:--मराठ्यांची इच्छा हीच आहे कीं, राजपुतांनीं धडाक्यानें पुढें येऊन हिंदुपदपातशाहीचे वारसदार व्हावें. मराठे त्यांना मदत करावयास एका पायावर तयार आहेत माळवा, जयपूर, जोधपूर, उदेपूर व पन्ना येथील महाराजांना त्यांनीं आजवर अनुकूल करून घेतलें असून त्यांना नेहमीं ते मदत करावयास तयार आहेत. त्यांना अशी उमेद आहे कीं, सर्वांचं ऐक्य करून उदेपूरच्या महाराण्यांना दिल्लीपति बनवावं. हक्कानं व मनानं तेच हिंदुपदपातशहा होऊं शकतात. बुंदेलखंडांतही महाराज छत्रसालबाबांची सत्ता त्यांना मान्य असून बुंदेलखंड स्वतंत्र ठेवण्याचा प्रयत्न ते करीत आहेत. सर्व राजे त्यांना अनुकूल आहेत. आपणच मात्र त्यांच्याशीं द्रोह करून खंडणी नाकारली आहे. बाबा, सर्व राजकारण ध्यानीं आणा व त्यांना खंडणी देऊन मैत्री संपादन करा. चालू परिस्थिति ओळखून त्याप्रमाणं वागणं हेंच थोर पुरुषास भूषणावह आहे. कृपा करा; आपला हट्ट सोडा.

**सेनापति**:—छोटे सरकार, अगदीं योग्य सल्ला देत आहेत. जर सर्व हिंदुमात्र एक होऊन मुसलमानी सत्ता झुगारण्यास सज्ज झाले आहेत, तर आपणही तेंच धोरण स्वीकारून मैत्री जोडणेंच योग्य होईल. स्वराज्याकरितां थोडी खंडणी देण्यास हरकत नाहीं. तसें केल्यास उगीच हट्टाला पेटून राज्य गमावण्याची पाळी येणार नाहीं.

राजाः— सेनापति, तुम्हींही असेंच म्हणतां ! तुम्हीं लोक असा अविचारी सल्ला कसा देतां ! आम्हीं खंडणी भरून मराठ्यांची गुलामगिरी पतकरावी काय ? आमची राज्यें राखण्याकरितां, स्वातंत्र्य सांभाळण्याकरितां पिढ्यान्‌पिढ्या लाखों प्राणांच्या आहुती दिल्या आहेत. तें स्वातंत्र्य, तें आमचें सर्वस्व, आम्हीं मराठ्यांस मुकावें व आणखी वर खंडणीरूपानें दक्षिणाही द्यावी ! खासा न्याय आहे ! उत्तमे, तुला काय वाटतें ?

उत्तमाः— महाराज, मराठे कोणी परके नाहींत दोघांचे वंश, कुळ वगैरे एकच आहेत. ते आपले बंधू असून शिवाय बलवान् आहेत. सर्वांचें ते संघटन करूं इच्छितात. वडील व सामर्थ्यवान् बंधूंच्या सल्यानें वागल्यानें स्वातंत्र्यनाश होत नाहीं. उलट विराटस्वरूपी राष्ट्रसेवेस आपली ती खंडणी सादर होणार आहे. त्या योगानें बुंदेलखंडावर होणारं मोंगल सुभेदारांचं आक्रमण वांचणार आहे. बुंदेलखंड मुसलमानांच्या ग्रहणांतून कायमचा मुक्त होणार आहे !

राजकुमारीः—बाबा, आपणांस मोंगल जवळचे कीं मराठे जवळचे ? मी थोडं कठोर बोललें तर आपण माझ्यावर रागावाल व लहान तोंडीं मोठा घांस घेते म्हणाल. राजपुतांनीं कांहीं एवढा अभिमान बाळगावयास नको ! स्वतःचं स्वातंत्र्यच नव्हें तर लेकी-बहिणीदेखील त्यांनीं मोगलांच्या चरणीं अर्पण केल्या ! मराठ्यांना नुसती खंडणी देण्यानें तुमचीं मनें नाराज होतात, व तुम्हीं युद्धास तयार होतां ? बाबा, ती खंडणी राष्ट्रकार्याकरितांच खर्च होत असते. हें राष्ट्रकार्य नव्हे देवकार्य ! याची किंमत आपणांस कशी कळत नाहीं ! हिंदभूमीला स्वतंत्र करावी ही उदात्त भावना आपणांत कशी उदित होत नाहीं ? एकमेकांचीं नाहक रक्तं सांडण्यांत कोणता फायदा आहे ? आपली शक्ति शत्रूंवर खर्च करण्याऐवजीं स्वकीयांवर घाव घालण्यांत खर्च करण्यांत आपण कोणतं सत्कृत्य साधणार आहांत ?

राजाः—( विचारी मुद्रेनें ) कुवर, तुम्हीं आमचे चांगले डोळे उघडले ! आपली सल्ला आम्हांला पटली. मुसलमानांपेक्षां मराठे आम्हांला जवळ आहेत. आम्हीं दोघेही हिंदु आहोंत. हिंदूंचें संघटन म्हणजे भारतभूचा प्राण ! पन्ना महाराजांप्रमाणें आम्हींही मराठ्यांशीं मैत्री करणेंच योग्य समजतों. मराठ्यांना खंडणी देऊन तह करण्यास आम्हीं तयार आहों. बरें ही वाटाघाट कोणामार्फत करावी ? वकील पाठवावा किंवा कसें ?

उत्तमाः—महाराज, हें काम दुसऱ्या कोणावरच सोंपविण्याची आवश्यकता नाहीं. छोटे सरकार या कामांत यश मिळवितील. चिंता करण्याचं कारण नाहीं.

आपण आपल्या अटी त्यांना समजावून द्या. त्याप्रमाणें त्या तह घडवून आणतील.

**राजा:**—( आश्चर्यानें ) आमच्या कुवर हें काम करतील ? हें कसें शक्य आहे ! राजकारण पार पाडणें म्हणजे परसांतलीं फुलें तोडणें नव्हें ! कुवर अजून लहान असून शिवाय स्त्री आहेत. परकीयांच्या गोटांत जाऊन निर्धास्तपणें तहाचें बोलणें करणें हें काम सोपें नव्हें !

**राजकुमारी:**—होय बाबा, मी हें कार्य खात्रीनें करूं शकेन. बाबाजी, आपण व आई ह्या सर्वांच्या कृपाप्रसादानं व आशीर्वादानं मला आतां राजकारण थोडं थोडं कळूं लागलं आहे. तहाचं राजकारण मी अगदीं बिनचूक पुरं करीन असं मला वाटतं त्याची काळजी नको.

**उत्तमा:**—खरं सांगावयाचं म्हणजे आम्ही शिकारीस गेलों असतां मराठा सेनापतींची व आमची अचानक भेट झाली. ओळखदेख होऊन तहासंबंधीं थोडं बोलणं झालं. आपण आज्ञा द्याल तर छोट्या सरकार स्वतः जाऊन तहाच्या अटी ठरवून येतील.

**राजा:**—शिकारीच्या वेळीं सहजीं भेट होणें वेगळें व शत्रूच्या छावणींत जाऊन तहासंबंधीं बोलाचाली करणें वेगळें. मला वाटतें कुवरसारख्या स्त्रीनें शत्रूच्या गोटांत जाणें भयंकर धाडसाचें होणार आहे.

**राजकुमारी:**—बाबा, आपलं म्हणणं खरं आहे. पण माणसांची पारख एका क्षणांत होत असते. शिंदेराव विश्वासू, शूर, दिलदार व शब्दाचे पक्के दिसतात. त्यांच्यावर विश्वास ठेवण्यास मुळींच हरकत नाहीं. आतां आपण म्हणत असाल तर आपले सेनापति व थोडा लवाजमा आम्हीं बरोबर नेऊं. शिवाय आम्हीं स्त्रीवेषांत न जातां दतियाचे सरदार बनून जाणार आहोंत. म्हणून धास्ती बाळगण्याचं मुळींच कारण नाहीं. ते मोंगलांसारखे विश्वासघातकी किंवा दुष्ट नाहींत हें खास !

**राजा:**— कुवर, काम फार अवघड आहे. तें आपल्या हांतून होणार नाहीं असें वाटतें. पण नाइलाज म्हणून तुमचें म्हणणें आम्हीं मानतों. बरें सेनापति, तुम्हीं थोडा लवाजमा घेऊन कुवरबरोबर जा. जी योग्य खंडणी मराठे मागतील ती कबूल करा व मराठ्यांशीं दृढमैत्री साध्य करा. तुम्हीं सर्वजण आतां उद्यांच्या तयारीला लागा. जासूद पाठवून मराठा सेनापतींना उद्यां तुम्हीं येत आहांत असें पहिलेंच कळवून ठेवा. चला सेनापति, या बाबतींत थोडा अधिक विचार केला पाहिजे.

( राजा व सेनापति जातात नंतर राजकुमारी उत्तमेस कडकडून भेटते )

**राजकुमारीः**—( आनंदानें ) सखे, आतां आपलं काम खास फत्ते होईल. कधीं न वळणारे माझे बाबा आज वळले ! ईश्वर आपणांस अनुकूल दिसतो. राजपूत-मराठ्यांचं सख्य झालं तर हळुहळू सर्व राजेमहाराजे एकवटून हिंदुपदपातशाही साध्य होण्यास काय वेळ लागणार आहे ! उत्तमा, सेनापतींना निरोप पाठवून आपली उद्यां छावणींत जाण्याची वेळ कळवून दे ! मोठ्या पहाटेस सरदारी पोषाखांत तूं मजकडे ये लव्याजम्याची सर्व तयारी सेनापति करतीलच.

**उत्तमाः**— ठीक आहे सरकार. उद्यां थोडं दूर राहूनच सर्व कार्य उरकावं ! नाहीं-तर आणखी कांहीं घोंटाळा कराल. लाजाल, गोरेमोरे व्हाल, गाल लाल होतील, व मग सर्वच सोंग बाहेर पडेल. म्हटलं छोट्या सरकारांनीं थोडं सावधच रहावं.

**राजकुमारीः**— होय उत्तमा, अगदीं सावधच राहिलं पाहिजे. जेव्हां शिंदेरावांचा हस्तस्पर्श झाला, तेव्हां मी थोडी बावरले व घाबरलेही. पण किती चतुर ते ! त्यांनीं माझी स्थिती ओळखली. मित्रालाही माझ्या स्थितीची ओळख दिली, व किती तरी घाईनं निरोप घेतला ! मी एक तरुणी आहे, असं उमगल्यानं त्यांच्या वृत्तींत एकदम किती फरक झाला ! त्यांची नजर अधिक प्रेमळ व स्निग्ध झाली ! मला वाटतं माझ्या प्रमाणं तेही प्रेमबधनांत गुरफटूं लागले असावेत ! त्यांच्या नयनजादूनं माझी हृदय-नौका अधिक कातरतेनं डोलूं लागली ! बावरलेल्या स्थितींत असल्यानं मी कुठं वाहवलें याचं भान मला राहिलं नाहीं !

**उत्तमाः**—आपणा दोघांची त्या वेळची स्थिति पाहून मलाही अतिशय नवल वाटलं. म्हटलं, सरकार करतात तरी काय हें ! आपण राजपूत व ते मराठे. अशा स्थितींत, उगीच असं प्रेमवेडं होणं कितपत बरं आहे ? राजपूतमराठ्यांचं ऐक्य म्हणतां म्हणतां मला, हा निराळाच प्रीतिसंगम होतो कीं काय, असं वाटूं लागलं. आहे.

**राजकुमारीः**—चल, वेडी कुठली ! भलतंच कांहींतरी बोलतेस ! एवढं खरं कीं, त्यांनीं राजपूतमराठ्यांच्या ऐक्याचा जो सदुपदेश केला तो मला पटला. मी हिंदवी स्वराज्यस्थापनेच्या परमश्रेष्ठ ध्येयांत त्यांना गुरू केलं. या दृष्टीनं त्यांनीं माझ्या हृदयावर मोठा परिणाम केला, असं वाटलं तर म्हण ! (लाजून) पण दुसरा कसलाही विचार मनांत येऊं देऊं नको. तुझं काय, सर्वांच्या पुढं असंच बोलशील व मला मात्र उगीच फजीत करशील !

**उत्तमाः**—तसं नव्हें सरकार, म्हणतात कीं, प्रेम आंधळं असतं. तें सर्व प्रकारचीं बंधनं तोडून आपलं उद्दिष्ट गांठींत असतं. राजकारण साध्य करण्याकरितां

एखादे वेळीं बेटीव्यवहाराचं समाजकारणही आपण साध्य करतां कीं काय, असं माझ्यासारखीला वाटणं साहजीक आहे !

**राजकुमारी**:— उत्तमे, किती अघाडी मारलीस तूं ! अगदीं विचारपरंपरेचा शेंवट गांठलास कीं ! तुझी कल्पना मात्र मनोहर व अगदीं नाविन्यप्रद आहे.

### पद २

(चालः—सीस हमारा चरण निहारे ।— संतसखू )

भावभक्तिनें पुजुनि सदाही ।
ध्येय गांठु ग मधु-मिलनाहीं ॥
मांगल्य वसे ग प्रेमविवाहीं ।
जनपदसेवा ही नवलाई ॥

उत्तमे, हें सगळं स्वप्न आहे. याच्या विचारांत गुरफटल्यानं मन जरा अस्वस्थ होऊं लागलं आहे ! मनाला शांतता लाभण्याकरितां भगवंताचं दर्शन करावयास पाहिजे.

**उत्तमा**:—हो अशा वेळीं तें पाहिजेच. तरच हृदयांत माजलेला कोलाहल थोडा कमी होईल.

( दोघी जातात. )

## अंक पहिला.

### प्रवेश तिसरा.

( दतिच्या किल्याच्या पायथ्याशीं असलेल्या प्रेमसागर तलावाकांठच्या बागेंत राजकुमारी व उत्तमा फिरत आहेत. )

**राजकुमारी**:—( सूर्यनारायणास नमस्कार करून ) अखिल विश्वाच्या नियंत्या, रविराया, तुझी कोमल किरणं या जगावर अवतरतांच जग कसं फुलल्यासारखं विलसतं आहे ! रात्रीच्या काळ्याकुट्ट अंधारामुळं त्रस्त होऊन थकून गेलेल्या वनस्पतींना आपल्या सुकरांचा स्पर्श होतांच त्यांना उत्साह वाटून नव्या नवलायीच्या टवटवीत अशा आनंदानं त्या डुलत आहेत ! तुमची अरुण पताका उदयाचलावर फडकूं लागल्याबरोबर पक्षीगण गोड गोड स्वरांत गाऊं लागतात, व आपल्या चिमुकल्या जीवांच्या चारापाण्याची सोय करण्यांत चूर होऊन जातात. जनावरं चरण्याकरितां जंगलाकडं जाऊं लागतात. व गुराखी आपल्या मधुर बासरीनं ऐकणाऱ्यांचं मन मोहित करतात ! मनुष्यप्राणी अनेक व्यवसायांत मग्न होऊन त्यांना फलप्राप्तीची

उमेद मोठी असते. सूर्यनारायणा, आपल्या उदयाबरोबर सर्व जगच आजच्या दिवसाचं नवजीवन आरंभीत असतं.

**उत्तमा**:—सरकार, आपण भक्तिभावानं केलेले प्रणाम केव्हांही वाया जाणार नाहींत. देव नेहमीं भावाचा भुकेला असतो. शास्त्रांत सांगितलं आहे कीं, सूर्य-नमस्कारांनीं आरोग्य, संतति, संपत्ति, व सुख सदैव लाभतं. ईश्वराच्या कृपेनं आपलं नेहमीं भलंच होईल. सरकार, किती भक्तियुक्त हृदय आहे आपलं ?

**राजकुमारी**:—उत्तमा, ईश्वरानं हा दुर्मीळ असा मनुष्यजन्म दिला ! त्याचं जर आम्हीं सार्थक केलं नाहीं तर आपल्या हांतून केवढी मोठी चूक होणार आहे ! चौऱ्यायशी लक्ष जन्मांचा फेरा चुकवावयाचा असेल, तर आपण स्वकर्तव्य उत्तम रीतीनं बजवावं, व मनुष्यजन्म कारणीं लावावा ! संत तुलसीदास, मीराबाई, वगैरे साधुसंतांनीं ईश्वरभक्ति केली म्हणून ते ईशस्वरूप झाले ! आज देव, स्वधर्म व स्वदेश यांची सेवा मनोभावानं करणं हेंच आमचं परम श्रेष्ठ कर्तव्य आहे. तें योग्य प्रकारानं करीत राहिल्यास भवाचीं हीं अवजड बंधनं तटातट तुटून मनुष्य सद्गतीस जाईल ! मनुष्य-धर्म किंवा माणुसकी ती हीच होय. म्हणून मी आपलं जीवित राष्ट्रदेवावरून कुरवंडून टाकण्याचं ठरविलं आहे !

**उत्तमा**:—अगबाई, छोटे सरकार, अगदीं वेदांतच बो. लागले कीं ! तसं नको गडे ! अशानं आपलं व्यवहारावरचं सगळं लक्ष उडून जाईल. म्हटलं, जरा व्यवहारच पहात राहिल्यास संन्यासिनी होण्याची धास्ती राहणार नाहीं ! आपला हा बिकट वेदांत ऐकून मी तरी घाबरलें बाई !

**राजकुमारी**:—उत्तमा, वेदांत व व्यवहार हे कांहीं वेगळे नाहींत. व्यवहार उत्तम केला, आपलं कर्तव्यकर्म उत्तम रीतीनं बजाविलं कीं, वेदांत साध्य झालाच. वेदांत म्हणजे ध्येय, व व्यवहार म्हणजेच ध्येयपूर्तीकरितां केलेलं कर्म. म्हणून दोन्ही वेगळे होऊं शकत नाहींत. भगवद्गीतेंत भगवंतांनीं कर्मयोगाची शिकवण दिली ती याच प्रकारची आहे. देव, स्वधर्म, स्वदेश यांची प्रेमपूर्वक सेवा करणें हाच वेदांत व हाच व्यवहार होय ! जगन्नियंता परमेश्वर सर्व जगाला विशेष कर्तव्यं लावून देतो, तीं आपण व्यवस्थित पार पाडलीं म्हणजे देवकार्य होतं ! दुष्टांना शासन करून दीनदुबळ्यांना सुखी करणं हीच स्वधर्मसेवा ! देशाला परकीयांच्या गुलामगिरींतून मुक्त करणं हीच स्वदेशसेवा होय ! परधर्मियांपासून स्वधर्मास वांचविणं हें आपलं अधिकोत्तम श्रेष्ठ कर्तव्य आहे ! काशी-प्रयागासारखीं तीर्थक्षेत्रं आज यवनांच्या ताब्यांत आहेत,

व वाटेल ते अत्याचार तिथं ते करीत आहेत! आम्हीं मात्र उघड्या डोळ्यांनीं आमच्या धर्माची विटंबना पहात आहोंत! आमच्या मातृभूमीची दुर्दशा, आम्हीं खालीं माना घालून सहन करीत आहोंत! उत्तमा, या विराट पुरुषाची सेवा, हिंच्या ऐक्याशिवाय होणार नाहीं. प्रथम सर्व क्षत्रियवर्गाचं ऐक्य घडून आलं पाहिजे. त्याचा श्रीगणेशा आम्हीं राजपूतमराठ्यांच्या ऐक्यानं करणार आहोंत. या ऐक्याचं सुफल म्हणजेच हिंदवी स्वराज्याची परिपूर्णता! हिंदवी स्वराज्यस्थापनेनंच सर्व दैन्य दूर होणार आहे! सर्वांचा मूलमंत्र ऐक्य आहे; तें साध्य झालंच पाहिजे. त्यावांचून गत्यंतर नाहीं.

**उत्तमाः**— सरकार, पूरे करा. आपल्याला माझी दृष्ट लागेल! किती प्रौढ विचार आहेत आपले हे! राजपूतमराठ्यांचं, ऐक्य, म्हणण्यापेक्षां मीलन, हेंच गोड ध्येय आपण डोळ्यापुढं ठेवलेलं दिसतं! किती मधुर स्वप्न आहे हें! हें जर सत्य-सृष्टींत येईल तर काय बहार होईल! या मीलनानं इकडचं जग तिकडं होईल! म्हटलं आहे कीं, साहसांतच लक्ष्मी वास करिते. राजपूत किंवा मराठे हे एकएकटेच कलिकाळाला भारी आहेत. मग दोघे एक झाल्यावर इथं यवनांचं नांव शपथेला देखील राहावयाचं नाहीं.

**राजकुमारीः**—उत्तमा, तूं म्हणतेस तें बरोबर आहे. ऐक्य म्हण, किंवा मधु-मीलन म्हण, तें घडून यावं असं सारखं मला वाटत आहे! अगदीं चैन नाहीं या जिवाला! राजपूतमराठ्यांचा मिलाफ किंवा प्रीति-संगम होऊन जी अलोट शक्ति निर्माण होईल ती अमर्याद पराक्रम करील व जगाला दिपवून सोडील! पण असा योग येईल कां? हें मधुमीलन फलदायी होईल कां? कार्य बरंच बिकट आहे व बाबांचा स्वभावही भारी तापट आहे. त्यामुळं थोडी काळजी वाटते. मनही भीतीनं थोडं कचरतं आहे! पण शुभकार्य असल्यानं ईश्वर आपणांस खास यश देईल!

**उत्तमाः**—सरकार, आपण इतक्या मनोभावानं श्रम करीत आहांत, म्हणून आपणास खात्रीनं यश मिळेल. आपण अगदीं निश्चिंत असा.

**राजकुमारीः**—मी कार्यासंबंधीं निष्ठावंत आहे. बाबांचं माझ्यावर अप्रतीम प्रेम आहे, व कार्याची महती विशेष प्रकारची आहे. अशा अनेक कारणांनीं तें तडीस जाईल असं माझं मन मला ग्वाही देत आहे. प्रातःकाळची वेळ कार्यास शुभ असते. 'शुभस्य शीघ्रं' या न्यायानं प्रथम आपण उद्यांच्या तयारीस लागू या.

**उत्तमाः**—चलावं सरकार. (दोघी जातात)

---

## अंक पहिला.

### प्रवेश चवथा.

(दतिया किल्ल्यांतील राजवाड्यांतील दिवाणखाना. राजा व सेनापति बोलत बसले आहेत.)

**राजाः**—सेनापति, खंडणी देऊन तह करणें योग्य नाहीं, असें मला वाटूं लागलं आहे. जाणूनबुजून गुलामगिरी पतकरणें कितपत श्रेयस्कर आहे ? राजकुवरनां मी वचन दिलें हें बरें झालें नाहीं. मराठ्यांवर बिलकुल विश्वास बसत नाहीं. त्यांचें काय, आज म्हणावयाचे कीं नुसती खंडणी आणि उद्यांच राज्य खालसा करावयाचे ! ते गनिमीकाव्यांत अगदीं प्रवीण आहेत, केव्हां घात करतील याचा नेम नाहीं. खंडणी देऊन गुलामगिरी पतकरण्यापेक्षां लढून धारातीर्थीं मरण पतकरणें काय वाईट ? सेनापति, मी म्हणतों तें खरें ना ?

**सेनापतिः**—क्षत्रियधर्म तरी असेंच सांगतो. मरावें पण युद्धांत पाठ दाखवूं नये. हाच क्षत्रियाचा बाणा. महाराज, युद्धपराङ्मुख व्हा असं कोणता क्षत्रिय आपणांस सांगेल ?

**राजाः**—मग सकाळीं तहाबद्दलचा उतावळी सल्ला तुम्हीं मला कसा दिलात ? त्या वेळीं माझ्या म्हणण्याला कां दुजोरा दिला नाहीं ? आतां युद्ध पुकारणें म्हणजे राजकुंवरला फसविल्यासारखें नाहीं कां होणार ? तुम्हीं सर्वांनीं माझी दिशाभूल केलीत. आतां युद्धाचा निश्चयच कायम करावयाचा ! कुवरना कसेंही समजावतां येईल. मारूं किंवा मरूं हेंच धोरण या वेळीं योग्य आहे. एकदां या मराठ्यांना चांगला हात दाखविलाच पाहिजे, म्हणजे ते दक्षिणचा रस्ता लवकर सुधारतील !

**सेनापतिः**—महाराज, रागावूं नका. आपल्या इच्छेप्रमाणें आम्हीं सर्व युद्धास तयार आहोंत. पण छोटे सरकारांच्या म्हणण्यांत पुष्कळ तथ्य आहे. मराठ्यांचे सेनापति शब्दाचे पक्के असल्यानें विश्वसनीय आहेत. विश्वासानेंच विश्वास वाढत असतो. आपण त्यांच्यावर विश्वास ठेविला पाहिजे. छोटे सरकारांचें म्हणणें आपण जरूर मानावें व त्यांना निराश करूं नये. अशानें दोन्हीं पक्षाकडील मनुष्यसंहार व द्रव्यहानी वांचेल.

**राजाः**—किती भ्याड व नादान बनलात तुम्ही सेनापति ! राजपुतांचें स्वातंत्र्य अशानें कायम राहील कां ? बुंदेला वीर मनुष्य हानीला भिऊन कधींही माघार घेत नसतो. लक्ष्मी चंचल असते; तिचा काय विचार करावयाचा ! ती आज आहे तर उद्यां नाहींशी होईल. नाहींशी झालेली दौलत पुनः स्वपराक्रमानें घरीं मोठ्या डौलानें परत

आणतां येईल. पण मळलेली कीर्ति, झालेला अपमान, नष्ट झालेलें स्वातंत्र्य मिळविण्यास फार, फार श्रम पडतात! सेनापति, अपयशापेक्षां राजपूत वीर जोहार पतकरतात. तुम्हांला यशाची आशा वाटत नसेल तर जोहार करून केशरी पोषाख घाल्या व उगवत्या सूर्यनारायणाबरोबर मराठा सैन्यावर तुटून पडू या. पण हा नादानपणाचा तह आम्हांला पसंत नाहीं.

**सेनापतिः**— महाराज, पुनः विचार करा. छोटे सरकारांना दिलेलं वचन मोडूं नका. तेंच करणें आपल्या हिताचें होईल. आम्हीं हुकुमाचे बंदे नोकर; आज्ञेप्रमाणें वागूं. माझी विनंति आहे कीं, कृपा करून आपण युद्धाचा विचार सोडा. राजपूत-मराठ्यांच्या मैत्रीमध्येंच राष्ट्राचें खरें सौख्य आहे. ऐक्य नेहमीं हितकारक असतें!

**राजाः**— तें कांहीं नाहीं युद्ध करणें हा आमचा निश्चय. वेळ पडला तर जोहार करावयास सर्वांनीं तयार असावें असें किल्यांतील सर्वांना कळवा. युद्धाचीं रणवाद्यें, उद्यां वाजलींच पाहिजेत. रणवाद्यांच्या गजरानें व वीरांच्या उत्साही आरोळ्यांनीं भोंवतालचें जंगल निनादित झालें पाहिजे. जंगलाच्या आश्रयानें मराठ्यांची छावणी कापून काढली पाहिजे. हुजुरातीच्या निवडक सैन्यासह आम्हीही तयार रहातों. मदतीची आवश्यकता वाटतांच ताबडतोब आम्हांला कळवा. ध्या एकलिंगजीचें नांव व रणमर्दायीनें लावा मराठ्यांना पिटाळून! जा आतां थोडेंसुद्धां थांबू नका व भागुबाईसारखें रडगाणें गावूं नका. (राजा रागानें निघून जातो).

**सेनापतिः**—काय करावं महाराजांना? ताईसाहेबांचा सल्ला किती सुंदर होता! त्यामुळें मोठा फायदा झाला असता! पण आतां सर्वनाश होणार! वाईट वेळ आली म्हणजे अशी दुर्बुद्धि सुचते. महाराजांचें मन पुनः कसं फिरेल? उत्तमेलाच ही गोष्ट कळविली पाहिजे. ती ताईसाहेबांना भेटून ही आपत्ति टाळण्याचा प्रयत्न करील. अरे, पण ही इकडे कोण येत आहे? (न्याहाळून पाहून) हो उत्तमाच ही. कशी ऐटींत इकडे येत आहे? (उत्तमा येते.) प्रणाम उत्तमाबाई.

**उत्तमाः**— प्रणाम सेनापति. केलीत कां सर्व उद्यांची तयारी? अगदीं पहाटेच निघावयाचं आहे?

**सेनापतिः**—कसली तयारी करणार! तह करण्यास जाण्याच्या ऐवजीं आम्हांला युद्धाची तयारी करण्याचा हुकूम झाला आहे. बाई, तुम्हीं कांहीं करा, व ताईसाहेबांना कळवून हें युद्ध बंद करा.

**उत्तमाः**—पुनः महाराजसाहेबांचा बेत फिरला वाटतं. मग सगळंच मुसळ केरांत गेलं. राजपूतमराठा ऐक्याची सुंदर सुवर्णसंधि साधत असतां, महाराज ती दवडीत आहेत ! पुरुषांचा स्वभाव किती चंचल असतो; नुकताच केलेला निश्चय त्यांनीं बदलला. ही गोष्ट ताईसाहेबांना कळविलीच पाहिजे. त्या कांहींतरी उपायानें महाराजांचें मत पुनः वळवितील. सेनापति, तुमचं मत तरी आहे कां आमच्यासारखं नाहींतर वेळेवर तुम्हींही उलट बोलावयाचे !

**सेनापतिः**—छे, छे, माझ्याबद्दल आपण बिलकुल शंका घेऊं नका. तुम्हांला मी वचन देतों. आम्ही पडलों नोकर माणसें. महाराजांच्या हुकुमापुढें आम्हांला जातां येत नाहीं. तुम्हीं कसेंही करा व त्यांची समजूत घाला.

**उत्तमाः**—होय सेनापति. मी सर्व व्यवस्था करतें. आपण मात्र युद्धाच्या ऐवजीं तहाकरितां जाण्याची तयारी ठेवा. बरं झालं तुमची व माझी भेट अगदीं ऐन वेळीं झाली. या आतां तुम्हीं. मात्र युद्धाची बिलकुल घाई करूं नका बर !

**सेनापतिः**—भलतंच. मला हौस कां आहे अशा सर्वनाशी युद्धाची ? मजसंबंधीं तुम्ही मुळींच काळजी करूं नका.

**उत्तमाः**—माझंही काम मी चोख बजावतें तुम्हीं निरोपाची वाट पहात रहा. बरं या. ( दोघेही एकमेकांस प्रणाम करून दोन्हीं बाजूंनीं जातात. )

## अंक पहिला.

### प्रवेश पांचवा.

(दतियाच्या किल्यावरील राजवाडा. राणी तुलसीदासजींचें रामायण वाचीत आहे. राजकुमारी जवळ बसली आहे.)

**राणीः**—कुवर, ऐकलीस रामाची कथा तूं ? किती रसाळ व उपदेशपर आहे ही ! तुलसीदासजी म्हणजे अभिजात कवि ! त्यांचीं रामायणांतील वर्णनं अतिशय सुंदर असून सर्व शब्दांतून भक्तिरस कसा ओथंबून भरलेला आहे !

**राजकुमारीः**—आई, रामायणाच्या काव्यसौंदर्यापेक्षां श्रीरामचंद्राच्या पराक्रमाचें अधिक कौतुक वाटतं वानरासारखे जंगली अनार्य हातीं धरून त्यांनीं रावणाचं चौदा चौकडीचं राज्य सपशेल उलथून टाकलं ! केवढा पराक्रम केला त्यानीं ! त्यांनाच पुरुषश्रेष्ठ हें नांव शोभतं. आम्हीं राजपुतांनीं रामप्रभूच्या चरित्रापासून थोडं तरी शिकलं पाहिजे. सीतामाईला जसं रामचंद्रांनीं परदास्यांतुन मुक्त केलं तसंच आम्हीं




राणी.—कुंवर, ऐकलीस रामाची कथा तूं ? किती रसाळ व उपदेशपर आहे ही ! तुलसीदासजी म्हणजे अभिजात कवि !

आमच्या मातृभूमीला या रावणी मुसलमानांच्या गुलामगिरींतून मुक्त करावयास पाहिजे. रामायणाची ही सर्वश्रेष्ठ शिकवण ध्यानीं ठेवून सर्वांनीं भारतभूचा उद्धार करावयास पाहिजे

**राणीः**—बाई कुवर, जरा थांब. फार बोलूं नकोस, कोणी ऐकेल तर म्हणेल कीं, तूं मोठ्या पंडितेसारखी बोलत आहेस. तसेंच लहान तोंडीं मोठा घास घेतल्याप्रमाणंही होईल. नेहमीं रामायण धार्मिक बुद्धीनं वांचावं. राजकारण काढून त्याचे धागे चालू परिस्थितीशीं जोडूं नयेत. नाहींतर विपर्यास करून लोक म्हणूं लागतील कीं, आतां बायकासुद्धां राजकारण बोलूं लागल्या. बाई, तूं म्हणतेस त्याचं सार मला कळलं. पण अशा विषयावर विचार करितांना आम्हां स्त्रियांना पाहून विचारवंत पुरुषांच्या कपाळावरदेखील आठ्या थैमान करूं लागतील.

**राजकुमारीः**—आई, आतां बायकांनींसुद्धां राजकारण पहाण्याची वेळ आली आहे. आम्हीं जर आमच्या पुरुषांना योग्य वळण लावणार नाहीं तर ते वाट चुकतील व फसून संकटांत पडतील. त्यांना सावध करण्याचं काम आम्हां बायकांचं आहे पुरुषांच्या अर्धांगी म्हणून शोभावयाचं असल्यास आम्हीं पूर्णपणं राजकारणी बनलं पाहिजे. स्त्रियांचं तर हें परम पवित्र कर्तव्य आहे.

**राणीः**—माझी कुवर आतां फार शहाणी झाली हो! तूं महाराजांची राजकन्या शोभतेस. अशाच रीतीनं राजकारणाचा अभ्यास ठेवून आपल्या वडिलांना सदैव मदत करीत जा. हा अनुभव तुला सासरींही उपयोगी पडेल.

**राजकुमारीः**—आई, तूं म्हणतेस तें खरं आहे. सर्व कांहीं केल्यानंच होतं. आळसानं काय होणार आहे. पाण्यांत पडल्यावांचून पोहतां कोठून येणार? बरं पण आई, आज एक बातमी तुला सांगावयाची आहे. दतियाच्या राज्यावर स्वारी करण्याकरितां येथून जवळच मराठे छावणी टाकून बसले आहेत. त्यांच्याशीं तह घडवून आणण्याची कामगिरी बाबांनीं मजवर सोंपविली आहे.

( उत्तमा घाईनें प्रवेश करिते )

**उत्तमाः**—छोटे सरकार, महाराजांनीं आपला बेत बदलला. उद्यां तहाच्या ऐवजीं मराठ्यांशीं युद्ध करावयाचं त्यांनीं ठरविलं व तशी सेनापतींना त्यांनीं आज्ञा पण दिली.

**राजकुमारीः**—काय म्हणतेस? बाबांनीं बेत बदलला? काय म्हणावं त्यांना! असें घडीघडी जर ते आपलं मन बदलूं लागले तर राजकारण कसं साधावं? आई,

बाबांनीं पुनः युद्धाचा हुकूम दिला ! मनुष्यसंहार, जाळपोळ, लुटालूट, इत्यादि अनेक आपत्ति या चिमुकल्या राज्यावर येणार ! आई, तुझ्यावांचून सध्यांचें संकटनिवारण होणार नाहीं. तूंच बाबांना दोन समजुतीच्या गोष्टी सांग.

**राणीः**—नेहमीं राज्यांत शांतता नांदावी. म्हणजे जनता सुखी राहते. युद्धापेक्षां तह श्रेयस्कर आहे महाराजांनीं असा विपरीत निश्चय कसा केला ? मराठे तरी हिंदूच आहेत ना !

**राजकुमारीः**—आई, मराठे आर्य-क्षत्रियांचे वंशज आहेत. ते हिंदवी स्वराज्याची जोपासना करीत आहेत. मुसलमानांच्या अत्याचाराची कल्पना तुला आहेच. देव, धर्म व देश यांची सेवा हाच त्यांचा महाराष्ट्र धर्म. मुसलमानांच्या अत्याचाराची पराकाष्ठा झाल्यामुळं त्यांच्या आद्य शिवछत्रपतींनीं श्रीरामचंद्राप्रमाणं मावळच्या अनाडी मराठ्यांच्या सहाय्यानं स्वराज्याची मुहूर्तमेढ उभारली. आजचे छत्रपति हिंदुपदपातशाहीची टोलेजंग इमारत उभी करीत आहेत. सर्वांचं ऐक्य घडवून स्वराज्यस्वप्न मूर्त स्वरूपांत आणीत आहेत. राजपुतांनीं सहाय्य करावं अशी त्यांची फार फार इच्छा आहे.

**राणीः**—मग तर युद्धापेक्षां तहाची आवश्यकता अधिक आहे ! स्वकीयांशीं युद्ध करणें महा पाप आहे. ज्या राजपुतांनीं त्या ध्येयाकरितां पिढ्यान्‌पिढ्या यवनाशीं टक्कर दिली, त्यांनीं या शुभ कार्याच्या उलट जाऊं नये. पृथ्वीराजांनीं पानिपतावर, राणा संग्रामसिंहांनीं शिक्रीला, राणा प्रतापसिंहांनीं हळदीघाटांत, राणी दुर्गावतींनीं आपल्या किल्ल्यावर, आपलं सर्व सामर्थ्य खर्चून शत्रूला विरोध केला. आजवरच्या राजपुतांनीं स्वातंत्र्य हें काय असतं याचं स्पष्टीकरण जगाला पटवून दिलं. राजपुतांचा इतिहास अनेक हृदयस्पर्शी कथांनीं खचून भरला आहे. आपणही आपलें स्वातंत्र्य आजवर जतन करीत आलों आहों. महाराज चंपतराय व छत्रसाल या बापलेकांचीं उदाहरणं अगदीं ताजीं आहेत.

**राजकुमारीः**—आई, तीच स्थिति मराठ्यांची आहे. राजे शहाजींनीं मराठ्यांच्या अंगच्या गुणांची त्यांना जाणीव करून दिली. शिवरायांनीं त्यांच्यांत देशाभिमानाची जागती ज्योत निर्माण केली. शंभूरायांनीं स्वधर्माभिमानाचें मोल जगाला पटविलं. राजाराम प्रभूंनीं आपल्या घोडदौडीनें आकाश पाताळ एक केलं. आजचे श्रीशाहू छत्रपति दक्षिणचा मनसुबा उरकून त्यांनीं उत्तरेकडील कार्य हातीं घेतलं आहे. ते स्वकीय असून त्यांचं व आपलं ध्येय एक आहे. म्हणून त्यांना आम्हीं मदत केली पाहिजे.

**राणी**:—होय कुवर, आपण त्यांना मदतच केली पाहिजे. (राजा प्रवेश करतो. राणी व राजकुमारी उठून उभ्या राहतात ) मीही त्यांना मराठ्यांशीं मैत्री करा अशी विनंति करीन.

**राजा**:—मराठ्यांशीं मैत्री ? आमच्या शत्रूशीं मैत्री ? ही गोष्ट आम्हांला पसंत नाहीं. राणीसाहेब, आपणही कुवरच्याच मताच्या आहांत ? मुसलमानांशीं झुंज खेळणाऱ्या आम्हीं, मराठ्यांपुढें हात जोडावे ? अशी मानहानी आम्हांस पसंत नाहीं. उद्यांच तहाच्याऐवजीं युद्धाचें रणशिंग फुंकलें जाणार आहे.

**राणी**:—महाराज, थोडा शांतपणानं विचार करा. मराठे स्वकीय आहेत. खंडणी देऊन त्यांना मदत करणं वाईट नाहीं. स्वराज्य रक्षणाकरितां ज्या फौजा ठेवाव्या लागतात त्याकडेच तिचा व्यय होतो ना ? स्वतंत्रपणं प्रयत्न करण्याऐवजीं जर सर्वांनीं एक जुटीनं प्रयत्न केला तर मातृभूमीचा उद्धार लवकर नाहीं कां होणार ? महाराज, माझी आपणांला विनंति आहे कीं, मराठ्यांशीं युद्ध करूं नका.

**राजा**:—मराठ्यांशीं सख्य करून कोणतं यश पदरीं पडेल ? मुसलमानांच्या ऐवजीं त्यांचे गुलाम होऊं व पुनः आम्हांस डोकेंही उचलतां येणार नाहीं. गुलामगिरी ती गुलामगिरी ! मग ती स्वकीयांची असो, कीं परकीयांची असो !

**राणी**:—महाराज, प्रत्येकानं जर आपला सवतासुभा सजविला तर साम्राज्याची कल्पना फोल ठरेल ! देशांत सर्वत्र यादवी माजेल ! 'बळी तो कान पिळी' अशी अवस्था माजून जाईल. आपण विचार करा व मराठ्यांची एकतंत्री राजसत्ता मान्य करा, हात आवरा. मारण्यास उगारलेला हात मैत्रीकरितां प्रेमानं पुढं करा. मराठ्यांची व राजपुतांचीं हृदय प्रेमबद्ध करून स्वराज्याचा जयजयकार करा.

**राजा**:—( विचार करीत ) राणीसाहेब, ठीक आहे. आपणा सर्वांचीच इच्छा आहे तर माझेंही कांहीं म्हणणें नाहीं. माझें मन बदलेलें होतें. पण जाऊं द्या. कुवर, तुमचें काम तुम्ही यशस्वी करा. सेनापतींना मी फेर हुकूम देतों कीं, युद्ध न करतां संधीच करावयाचा ! मग तर तुम्हां सर्वांना आनंद होईल ना !

**राजकुमारी**:—किती चांगले आहेत आमचे बाबा ! आई, तूं विनवल्याबरोबर ऐकलं कीं नाहीं त्यांनीं ! विचारवंतांनाच चांगला विचार पटतो. बाबा, आतां मात्र बेत बदलूं नका बरं ?

**उत्तमा**:— महाराज, मी कळवूं कां सेनापतींना आपला हुकूम ? ते वाटच पहात असतील आपल्या आज्ञेची !

**राजा**:—होय उत्तमा, त्यांना जाऊन सांग कीं, माझी सकाळची तहासंबंधींची आज्ञा कायम आहे. युद्धाऐवजी तहच बरा. कुवर, जा आतां तुम्हीं आपल्या सकाळच्या तयारीस लागा.

**राजकुमारीः**—होय बाबा ! आपण बिलकुल काळजी करूं नका ! उत्तमा, चल बाई उद्यांच्या उद्योगास लागलं पाहिजे.

**उत्तमाः**—चलावं सरकार. (दोघी राजाराणीस नमस्कार करून जातात.)

**राणीः**—पाहिलंत, माझी बाळ किती शहाणी झाली आहे ती ! हाच जर मुलगा असता तर आपल्या शिरावरील केवढा तरी भार त्यानं हलका केला असता. पण स्त्री असल्यानं तिच्या अंगच्या सर्व गुणांचं चीज होत नाहीं.

**राजा**:—महाराणीसाहेब, असं म्हणूं नका. स्त्री ही विश्वाची माता आहे. तिची योग्यता सामान्य नाहीं. जी स्त्री आमच्या कुवरप्रमाणें सद्‌गुणी असते ती असा पुत्र प्रसवते कीं, जो अखिल विश्व आपल्या यशोगंधानें दरवळून सोडतो. जगांत जेवढे जयशाली पुरुष जन्मले त्यांच्या माताही तशाच महायोग्यतावान् होत्या. आपल्या अंगच्या अमोल गुणांची अंगाई करून रात्रंदिवस त्या आपल्या पुत्रांना सुशिक्षण देतात, व सद्‌गुणांचे सजीव देव बनवितात ! म्हणूनच म्हटलं आहे कीं, 'जिच्या हातीं पाळण्याची दोरी ती विश्वाला उद्धरी' !

**राणीः**—आपल्यासारख्या विचारी पुरुषांना हें पटतं. पण असे अनेक पुरुष असतात कीं, जे जगांत स्त्रियांची अनेक प्रकारं कुचंबणा करतात. म्हणून नेहमीं विचार येतात कीं, कुवर मुलगा असती तर बरं झालं असतं !

**राजा**:—बरं जाऊं द्या तो विषय आतां. कुवर उद्यां शत्रूकडे जाणार म्हणून काळजी वाटत आहे. तिला योग्य तो उपदेश करून धीर द्या. सावधान राहण्याबद्दल सुचवून धीटपणानें वागण्यास सांगा. उद्यां जातेवेळीं मला जें काय सांगावयाचें तें मीही सांगेनच. मुलगी असल्यानें आपण दोघांनींही तिला धीर दिला पाहिजे.

**राणीः**—तशी ती जात्या धीट आहे. पुरुषासारखं लष्करी शिक्षण मिळालं असल्यामुळं ती निधड्या छातीच्या बाबतींत एखाद्या पराक्रमी पुरुषासही मागं टाकील. ती जरी छावणींत निवडक लोकांसह गेली, तरी तिच्या संरक्षणाकरितां आपलं बाकीचं सैन्य जवळ आसपास राहूं द्या. कांहीं दगाफटका दिसल्यास तावडतोब सैन्यानं एकदम चाल करून तिला सोडवून आणावं. बाकी मराठे विश्वासास पात्र आहेत ! दगा खास होणार नाहीं !

**राजाः**—ती सर्व व्यवस्था मी करतों. आज एकुलती एक राजकन्या शत्रूच्या गोटांत पाठवावयाची म्हणून मन अगदीं अस्वस्थ झालें आहे !

**राणीः**—आपण दोघांनीं तिला आर्शीवाद देऊन तिच्या यशप्राप्तीकरितां मनोभावें भगवान् एकलिंगजीची प्रार्थना करावी. म्हणजे तिचं कार्य सुलभ होईल !

**राजाः**—ठीक आहे.

( दोघेही देवास नमस्कार करून जातात. )

---

## अंक पहिला.

### प्रवेश सहावा.

(झांशीजवळील करारी तलावाच्या कांठावरील मराठयांची छावणी—एका बाजूनें राजकुमारी व उत्तमा (दरबारी पुरुष वेषांत) व सेनापति येतात. दुसऱ्या बाजूनें स्वागताच्या तयारीनें शिंदेराव व जाधवराव येतात.)

**राजे राणोजीरावः**—( स्वागत करीत ) यावें सरदारसाहेब राम राम ! आपण याल अशी आम्हांस उमेद नव्हती ! पण आशा अमर असते ! आम्हीं आपली वाट पहातच उभे होतों. काय ठरलें आपल्या महाराजांचें ? ते खंडणी देऊन तह करावयाला आहेत कां तयार ? आपणाबरोबर काय निरोप दिला आहे ?

**राजकुमारीः**—(थोडें लाजत पहात) महाराजांनीं सेनापतींना तह करण्याकरितांच आम्हांबरोबर पाठविलं आहे. महाराज खंडणी देतील पण आतां आहेत तसेच ते स्वतंत्र राहिले पाहिजेत. तुमच्या हिंदवी स्वराज्यास लागेल तें द्रव्य व मनुष्यबळ आम्हीं देऊं पण आम्हीं मराठ्यांचेदेखील मांडलिक म्हणून राहणार नाहीं असं त्यांचं म्हणणं आहे.

**राजे राणोजीरावः**—मग महाराजांनीं मोठा पेंचच टाकला म्हणावयाचा ! आम्हीं चौथाई व सरदेशमुखी वसूल करतों, व त्या मुलुखाच्या संरक्षणाची जबाबदारी आम्हांवर घेतों. त्यामुळें दुसऱ्या शत्रूपासून धास्ती न राहतां राज्यकारभार एकतंत्री राहतो. तुम्हीं कोणाचे मांडलिक न झाल्यास उद्यां मुसलमानांस, आमच्या शत्रूस, तुम्हीं मदत कराल व आम्हांसच घातक व्हाल. ह्याबद्दलची खातर जमा होणें अवश्य आहे.

**राजकुमारीः**—आमच्यावर आपण भरंवसा ठेवा. जे तुमचे शत्रु ते आमचे पिढ्यान् पिढ्यांचे शत्रु आहेत. म्हणून त्यांना आम्हीं केव्हांही मिळणं शक्य नाहीं. आपल्या तहाच्या अटी आम्हांस सांगा. म्हणजे त्यावर आम्हीं आपला विचार कळवूं.

**राजे राणोजीरावः**—(हंसत) आपण सांगाल त्या अटी आम्हांस मान्य आहेत. खंडणी जी द्याल ती घेऊं. आमच्या राजसत्तेचे मांडलिक आपण फक्त खंडणीपुरते रहाल. मराठ्यांच्या शत्रूशीं कसल्याही प्रकारचा संबंध ठेवावयाचा नाहीं. बाकी आपण स्वतंत्र आहांत. हिंदुपदपातशाहींतील एक घटक म्हणून आपली गणना होईल. सर्व घटकांवर एकतंत्र असावें म्हणून खंडणीची उपाधि ठेवावी लागते. दुसरी कोणतीही मानहानी करण्याचा हेतु नसतो.

**राजकुमारीः**—आपल्या अटी आम्हांला मान्य आहेत खंडणीची रक्कम उभयतांच्या विचारानं ठरवूं. आतां तुम्हां-आम्हांमध्यें सलोखा झाला आहे. आपण व आपले प्रमुख सरदार यांना महाराज साहेबांकडून राजवाड्यांत उद्यां भोजनाचं आमंत्रण आहे. तेथंच तहनाम्यावर सह्या व मुद्रा होतील. कृपा करून शिंदेरावांनीं महाराजसाहेबांच्या विनंतीस मान द्यावा व भोजनास यावें.

**राजे राणोजीरावः**—ठीक आहे, सरदारसाहेब. आम्हीं व जाधवराव उद्यां राजवाड्यांत भोजनास येऊं असें महाराजसाहेबांना कळवा. आतां आमची विनंति अशी कीं, आपण आलेल्या सर्व मंडळींनीं आमच्या स्वागताचा जरूर स्वीकार करावा. भोजन, पोषाख, अत्तरपान, वगैरे झाल्यानंतर मग आपण राजवाड्याकडे परतावें. जाधवराव, मंडळींच्या स्वागताची तयारी खास डेऱ्यांत करा. सर्व व्यवस्थेची कल्पना आपणांस आहेच ! सेनापति, आपल्या मंडळींसह शेजारच्या डेऱ्यांत आपणही विश्रांति घ्या.

**जाधवरावः**—शिंदेराव, सर्व तयारी यथोचित आहे. शिवाय कांहीं कमीअधिक असल्यास पहातों. (हंसत) शिंदेराव, आपणही लवकरच या. चला, सेनापतीसाहेब.

**सेनापतिः**—अहो सरदारसाहेब, तहाचे आतां जवळ जवळ नक्की झालें आहे. राजवाड्याकडे लवकर परतावें हें बरें. नाहींतर⋯⋯हो, वेळ गमावतां कामा नये. महाराजसाहेब तिकडे आपली सारखी वाट पहात असतील. त्यांना विशेष आतुरता आहे हें आपण जाणतांच. मी अधिक कांहीं सुचवीत नाहीं. लवकर आटोपतें घ्यावें हें बरें. चला जाधवराव. ( जाधवराव व सेनापति जातात ).

**राजकुमारीः**—( लाजत ) रावांनीं एवढी स्वागताची तयारी उगीचच केली. आपण आमचे पाहुणे. मग पाहुण्यांनीं इतकी तसदी कशाला घ्यावयाची ? म्हटलं आम्हांला आतां निरोप दिला असता तर बरं झालं असतं !

**राजे राणोजीरावः**—वा ! असं कसं ! आमच्या छावणींत आपण पाहुणेच आहां ! आमचा बेत तर फार मोठा होता. भोजनानंतर पोवाडे, शिकार व दुसरे लष्करी खेळ

वगैरे आपल्या स्वागताकरितां ठेविले होते. पण आपली जाण्याची उत्सुकता अधिक दिसते म्हणून अगदीं थोडा कार्यक्रम ठेविला आहे. आपला परिचय व स्नेह अधिक व्हावा असें आम्हांला वाटतें. आपण आमची बहुमोल कामगिरी केली आहे. लढाई-शिवाय सख्य झालें व आपल्यासारखे मित्र मिळाले ! आनंदी आनंद झाला !

**राजकुमारीः**—( लाजत ) आपण फारच थोर आहांत ! आपली बरोबरी आम्हीं कशी करूं शकणार ? कसं झालं तरी आम्हीं सामान्य सरदार ! उत्तरेकडील कामगिरी-वर आलेले, श्रीछत्रपतींचे आपण सेनापति व सुभेदार ! आपलं सौजन्य फार मोठं आहे. भीमसिंह मी म्हणतों तें खरं कीं नाहीं ?

**उत्तमाः**—होय सरकार. आपण म्हणतां तें खरं. माळवा, मारवाड, बुंदेलखंड, इत्यादि मोठमोठ्या देशांचं राजकारण चालविणारे त्यांच्यासारखे सामान्य कसे असतील. आमच्यासारखे अनेक राजेमहाराजे रावांच्या नुसत्या इषाऱ्यावर नाचत आहेत. म्हणून अनेक रावांचे राव, व महाराजांचे महाराज, शिंदेराव आहेत ! आपण कोठून ह्यांची बरोबरी करूं शकतों ? ते आपणांस इतका मान देतात हें त्यांचं मोठेंपण व सौजन्य आहे. बरं सेनापतींनीं केलेली विनंति लक्षांत आहे ना ! म्हटलं जरा आटोपतं घ्यावं.

**राजे राणोजीराव**—( हंसत ) काय राव, इतकी काय घाई आहे ! अजून जेवणाची तयारी होण्यास अवधि आहे. आतां भोजन, आराम, वगैरे करूनच मग नगराकडे जावयाचें. आपण असेंच बोलत रहावें असें मला वाटतें. सरदारसाहेब, आपण थकला तर नाहीं ना ?

**राजकुमारीः**—( स्वगत ) मला जी गोष्ट पाहिजे होती तीच रावांनीं सुचविली. ( उघड ) तशी कांहीं घाई नाहीं पण महाराजसाहेब थोडी अधिक काळजी करतील ! शिवाय आम्हांसही ही आनंदाची बातमी त्यांना सांगण्याची उत्सुकता लागली आहे.

**राजे राणोजीरावः**—भीमसिंह, महाराजसाहेब आपल्या साहेबांच्याबद्दल इतकी काळजी कां करतील, हें जाणण्याची आम्हांला फार उत्सुकता वाटत आहे.

**उत्तमाः**—आमच्या महाराजसाहेबांना पुत्र नाहीं. एक तरुण राजकन्या मात्र आहेत. ( राजकुमारी लाजत शिंदेरावांकडे पहाते ) म्हणून आमचे महाराजसाहेब ह्या आमच्या तरुण सरदारसाहेबांवर जीवाच्या पलीकडे प्रेम करतात. महाराणीसाहेबांचे हे फार फार आवडते आहेत. म्हणूनच आमच्या या छोट्या सरकारांचं तहासंबंधींचं म्हणणं त्यांनीं ऐकलं. ( राजकुमारी तिच्याकडे हळुच पहाते ) हो समजलें. आपणही

संकोच न धरतां आपली हकीकत थोडक्यांत सांगावी. ती ऐकण्यास आमच्या सरकारांचे कान कसे आतुर झाले आहेत !

**राजे राणोजीराव**:—दक्षिणेंत मराठ्यांचीं जीं प्रसिद्ध क्षत्रियकुळें आहेत त्यांत शिंद्याचें कुळही विख्यात् आहे. कण्हेरखेडची पाटिलकी आमच्या घराण्यांत होती. पण स्वपराक्रमानें विजापूर इत्यादि बहामनी राज्यांत व मोंगल दरबारीं आमची शिंदे मंडळी मनसबदार म्हणून प्रसिद्धीस आली. सातारच्या श्री छत्रपतींच्या घराण्याशीं पूर्वापार आमचा संबंध आहे. आमच्या राजे नेमाजी शिंदेरावांची मुलगी हल्लींच्या शाहू छत्रपतींना दिली होती दुर्दैवानें ती स्वर्गस्थ झाली. मूळचे आम्हीं शिलेदार, स्वपराक्रमानें सरदार बनलों व आज माळव्याचे सुभेदार व सेनापति आहोंत. उत्तरेकडील मराठी सैन्याची हुकूमत आमच्याकडेच आहे. जोडीला जाधवराव दुय्यम सेनापति म्हणून आहेत. शिवाय सुभेदार होळकरही मदतनीस म्हणून आहेत. पण आतांच्या स्वारींत ते आम्हांबरोबर नाहींत. उत्तरेकडील सर्व मनसुबे आम्हींच उरकावयाचे असतात ! आम्हीं छत्रपतींचे मुतालीक आहोंत.

**राजकुमारी**:—आपण क्षत्रिय आहांत ! राजपूत आहांत !

**राजे राणोजीराव**:—मी क्षत्रिय आहे. सेंद्रक नांवाच्या राजपूत वंशापासून आमचें कुळ निर्माण झालें. पूर्वकाळीं आमच्यामध्यें व राजपुतांमध्यें बेटी व्यवहार चालू होता. तो अलीकडे विशेष नाहीं. राजपूतमराठ्यांच्या ऐक्याच्या दृष्टीनें तो पुनः सुरू व्हावयास पाहिजे. विवाह होऊं लागल्यावर आपलेपणा वाढून ऐक्यभावना अधिक दृढ होतील. यांत संशय नाहीं. (हंसत) सरदारसाहेब, आपणांस काय वाटतें ? मी म्हणतों तें बरोबर आहे कीं नाहीं ?

**राजकुमारी**:—(लाजत पण आनंदानें) राव म्हणतात तें खरं आहे. असे सुयोग आले तर फार चांगलं होईल ! पण मला नाहीं वाटत असे विवाह करण्यास राजपूत तयार होतील.

**उत्तमा**:—मला वाटतं राजपूतमराठ्यांत दळणवळण अधिक झालं, परिचय अधिक झाला, तर असे सुयोग खास येतील. पण जुन्या लोकांना या गोष्टी पटणं जरा कठीण आहे. 'जुनं तें सोनं' अशी म्हणण्याची प्रवृत्ति या जुन्या लोकांची असते.

**राजे राणोजीराव**:—राजपूतमराठे एक असल्याबद्दल जुने आधार दाखविल्या-वरही जुनीं मंडळी चूप राहतील. आतां आमचा संबंध छत्रपतींकडून उदेपूरच्या महाराजांशीं आहे हें आम्हीं सिद्ध करूं. आज कोणता राजपूत उदेपूरकरांना नांवें ठेवूं

शकतो ? उदेपूरकरांप्रमाणेंच मराठे कुलवान् आहेत. त्यांनीं आपल्या मुली किंवा बहिणी केव्हांही मुसलमानांस दिल्या नाहींत. मराठे तर राजपुतांप्रमाणेंच क्षत्रिय आहेत. राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें त्यांच्या मधु-मीलनाची आवश्यकता विशेष आहे. परमेश्वर अशा सुवेळा लवकर अनेक आणो.

**राजकुमारीः**—राजकीय ऐक्याच्या दृष्टीनं अशा विवाहांची खास आवश्यकता आहे. जुन्या पिढीला रूढीप्रियतेमुळं या गोष्टी लवकर पटणार नाहींत. आपले विचार नाविन्यप्रद असून आदरणीय आहेत. यावरून ऐक्यासाठीं आपण वाटेल तें करावयास तयार आहांत असं दिसतं. यावरून आपल्या हृदयाची तळमळ व्यक्त होत आहे.

**राजे राणोजीरावः**—सर्वांच्या शुभ कामनेनें हिंदुपदपातशाहीचें अपुरें कार्य पूर्ण करणारी विभूति निर्माण होवो. बरं चला. आतां थोडी विश्रांति घेऊन भोजन करा. मग आपणांस आम्हीं निरोप देऊं.

**राजकुमारीः**—आणि उद्यां अगदीं न चुकतां राजवाड्यांतील मेजवानीकरितां येऊं असंच कीं, नाहीं ? (एकमेकांकडे पहातात व गालांत हंसतात).

**राजे राणोजीरावः**—वा ! सरदारसाहेब विनोदीही आहेत ! आपणांस पाहून आमची तब्बेत फारच खूष होऊन जाते. असें वाटतें कीं, सतत आपल्याच संगतींत रहावें. महाराज साहेबांनीं परवानगी दिली तर म्हटलं जाधवरावांच्या जोडीला आपलेंही पथक ठेवितां येईल. मग आपल्या सहवासाचा आनंद आम्हांस नेहमींच लुटतां येईल.

**उत्तमाः**—अंहं ! असं कांहीं होणार नाहीं ! आमचे महाराज ह्यांना केव्हांही सोडणार नाहींत. आतां सर्व भार त्यांच्यावरच रहाणार ! मराठी सैन्यांत पथकांवर काम करण्यास महाराज परवानगी देणार नाहींत, कारण त्यांनाही अशीं तरुण, शूर, जिव्हाळ्याची माणसं जवळ पाहिजेतच. शिवाय महाराज ह्यांना जीव कीं प्राण जपतात. तेव्हां ही गोष्ट अशक्य व असंभवनीय आहे.

**राजकुमारी**—(लाजते) कदाचित् कांहीं योगायोग असल्यास महाराज परवानगी देतीलही. पण मलाच आपलं म्हणणं मान्य करतां येणार नाहीं. कारण माझ्या ह्या मातृभूमीची सेवा मला करावयाची आहे.

**राजे राणोजीरावः**—अगदीं योग्य बोलला सरदारसाहेब ! प्रत्येकानें आपल्या मातृभूमीचें ऋण फेडण्यास तळ हातावर शिर घ्यावयास पाहिजे. आम्हींसुद्धां भारत-भूच्या उद्धाराकरितां ऊन म्हणत नाहीं, पाऊस म्हणत नाहीं, वादळ म्हणत नाहीं, डोंगर म्हणत नाहीं, जंगल म्हणत नाहीं ! खायलाप्यायला असो वा नसो, झोंप

घ्यायला मिळो वा न मिळो, ह्या हिंदुपदपातशाहीच्या जोपासनेकरितां हजारों कोस भूमि रात्रंदिवस पालथी घालत आहोंत. सरदारसाहेब, कोणती हृदयाची तळमळ आम्हांस इतकी कार्यप्रवृत्त करीत असेल बरें ? आमच्या मातृभूमीचें ऋण, आमच्या श्री शाहू छत्रपतींची वंदनीय आज्ञा, आमच्या कार्यकुशल पेशव्यांची सल्ला, ही सर्व दगदग अंगिकारावयास लावीत आहे. आमची महाराष्ट्रापुरतीच संकुचित भावना नसून आमच्यापुढें अखिल भारतखंड आहे.

**राजकुमारी**—राव, माझी भावना दतियापुरती होती. ती भावना आज वाढविली. आम्हींसुद्धां आपल्याप्रमाणं अखिल भरतखंडाचा विचार करावयास पाहिजे. आपण माझे गुरु झालांत. गुरुराया, राजपूतमराठ्यांच्या ऐक्याचा गुरुमंत्र मी आपणापासूनच घेतला आहे. मातृभूमीचं ऋण आपण जें समजतां तेंच मी समजेन. आपला उपदेश किती अमोल आहे ! आपलं ध्येय किती उन्नत आहे ! आपला पराक्रम किती विशाल आहे ! आपलं राजकारण किती सर्वव्यापी आहे ! आपल्या गुणांची बरोबरी करणारा पुरुष विरळा. गुरुराया, मी आपणांस शरण आहे. या आपल्या प्रिय शिष्यास प्रेमपूर्वक आशीर्वाद द्या. ( प्रणाम करते. दोन्हीं हात धरून उठवितात, ती बिचकून दूर जाऊन उभी राहते ).

**राजे राणोजीराव**:—( गडबडून ) माफ करा सरदारसाहेब, आपण शिष्य वगैरे होणाच्या भानगडींत पडूं नये ! हें मोठें सतीचें वाण आहे. सुख, आराम, चैन, वगैरे सर्वांनांच बिलकुल फांटा द्यावा लागेल ! कांदाभाकरी किंवा नुसते चणे यावरच दिवस काढावे लागतील ! तें आम्हीं मराठेच करूं शकतों ! आपणासारख्यास अगदीं बादशाही थाट पाहिजे. नाहींतर तब्बेत तेव्हांच हैराण व्हावयाची ! ( आनंदानें ) या सर्व गोष्टी सहन करण्यास स्वारी तयार असेल, तर आम्हीं शिष्य करून घेऊं. गुरु बनायला काय हरकत आहे ! उपदेशाचें असिधाराव्रत मात्र शिष्यानें पाळलें पाहिजे. कारण त्यांत खडतरपणा फार आहे.

**राजकुमारी**:—राजे, आपण म्हणतां तें खरं आहे. भावनेच्या भरांत आपल्या उपदेशाचा तिखटपणा व खडतरपणा माझ्या लक्षांत आला नाहीं तरीही मी शक्यतोंवर खटपट करावयाची असा निश्चय केला आहे. आपला आशीर्वाद असावा, एवढीच नम्र विनंति आहे.

**राजे राणोजीराव**:—तथास्तु ! आज आमच्या पंथास एक अलौकिक व्यक्ति लाभली म्हणून मला अत्यानंद होत आहे. राजपूत मराठ्यांचें ऐक्य हें या राष्ट्रीय

संस्थेचें ध्येय आहे. आपण आमच्या कार्यास लाभला त्यामुळें खरोखर अपरिमित आनंद आम्हांला होत आहे. चलावें आतां डेऱ्यांत. तेथें भोजन वगैरे उरकून थोडा आराम करावा.

**राजकुमारी**:—चलावं ! भीमसिंह, एखादा जासूद पाठवून तहाची आनंदाची बातमी प्रथम महाराजांना कळवा. तसंच उद्यां खाशा स्वाऱ्यांच्या स्वागताची सर्व तयारी ठेवण्यास सांगा

**उत्तमा**:—होय सरकार, ती सर्व व्यवस्था मी करतों. काळजी करूं नये.

( सर्वजण जातात ).

---

## अंक पहिला

### प्रवेश सातवा.

( स्थळः —दतियाच्या किल्याच्या पायथ्याचा बाग—पुरुषवेषधारी उत्तमा बागेत हिंडत आहे. )

**उत्तमा**:—( हिंडत ) शिंदेराव व जाधवराव येण्याची वेळ तर झाली. सरकार अजून तयार नाहींत. बिचाऱ्या सारख्या विचारांत मग्न झालेल्या आहेत. पुरुषवेष घालून सज्य होऊन येण्याच्या ऐवजीं त्या सारख्या वाटेकडे डोळे लावून उभ्या आहेत. स्वाऱ्या जर एकदम आल्या तर यांची फजिती नाहीं कां होणार ? त्यांच्या मनाची स्थिति इतकी अधीर झाली आहे कीं, तिचें वर्णन करवत नाहीं शिवाय—

पद ३

( चाल—जायें देव नगरिया जाये, —संतसखू ).

शोभा सुंदर वनदेवीची । फुलवेलींच्या रम्य सुमांची ॥
मंदमंद ही लहर वायुची । हरित ताप जलवीचि साची ॥

त्यांना अशा स्थितींत ठेवून उपयोगी नाहीं ! सरकार, अहो सरकार. ( राजकुमारी प्रवेश करते. )

**राजकुमारी**:—काय म्हणतेस उत्तमे ? राव येण्याची वेळ होऊन गेली ! ते अद्याप कसे आले नाहींत कोण जाणं ? त्यांचा बेत तर बाबांच्याप्रमाणं बदलणार नाहीं ना ? छे असं तर खास होणार नाहीं. रावांच्या दर्शनाकरितां मन किती उतावळं झालं आहे ! खरोखर किती आनंदाची वेळ ! युद्धाच्या ऐवजीं शांतता, सौख्य, आनंद !

राष्ट्र कसं टवटवीत व हरभरं भासत आहे ! प्रजाजन आपआपल्या उद्योगांत मग्न असून प्रत्येक जण आपल्या संसारतंद्रींत मग्न झालेला आहे. युद्ध सुरू झालं असतं तर जिकडं तिकडं हाणामार, जाळपोळ, लुटालूट व मनुष्यसंहार होऊन अगदीं कल्लोळ माजला असता. तसली राक्षसी वेळ टळल्यामुळं मन कसं प्रसन्न झालं आहे ! उत्तमे स्वाऱ्या यावयाची वेळ झाली आहे. तूं बागेच्या दरवाजाजवळ स्वागताकरितां उभी रहा. स्वाऱ्या येतांच मला वर्दी दे.

**उत्तमाः**—आज्ञा सरकार. ( उत्तमा जाते ).

**राजकुमारीः**—आजवर माझ्या मनांत कितीतरी आकुंचित भावना होत्या. दतिया किंवा बुंदेलखंड ह्यापलीकडे आमची दृष्टि जात नव्हती. आमची कूपमंडूक वृत्ति आतां आम्हांला उमगली. बुंदेलखंडापेक्षांही भरतखंड विराट व विशाल आहे. ही भारत-भूमि, आर्यभूमि, आम्हां सर्व हिंदूंची मातृभूमि होय. ह्या माउलीस स्वतंत्र करण्याचं महा-कार्य सर्वांचं आहे. भारतखंडांतील अखिल क्षत्रियवर्ग एक होईल तर ही आर्यभूमि सर्व जगाला भारी होईल ! पण सर्व क्षत्रियांच्या ऐक्याचा हा योग साधावा कसा? (समोर कपोत पक्षांचीं जोडपीं खेळत असलेलीं पाहून) हे कपोत पक्षीच पहा ! सर्व मिळून घोळक्यानं चरावयास जातात. पण प्रत्येकाची जोडी फुटत नाहीं! संसारांत अशाच जोडीची आवश्यकता असते ! पहा एकमेकांच्या सहवासांत तीं कशीं मस्त आहेत ! जगाची त्यांना कांहींतरी पर्वा आहे कां ? असे व्यवहार सर्व क्षत्रियांत होतील व दळणवळण वाढेल तर अशीं अनेक जोडपीं एकत्र होतील. त्यांच्यामध्यें आपुलकी वाढेल. ऐक्याकरितां बेटीव्यवहार, रोटीव्यवहार आवश्यक आहेत. रक्तमांसानं किंवा हाडानं एक झाल्यावांचून खरी आपुलकी कशी निर्माण व्हावी ? मला असेच विचार येतात. वाटतं करावा जिवाचा धडा ! काय करावं, सर्व अगदीं परस्वाधीन ! पाहू काय होतं तें ! भगवान् एकलिंगजी ! तूं मात्र या आपल्या असहाय्य कन्येला साहाय्य हो. उत्तमेला जाऊन बराच वेळ झाला. ती अजून कां बरं येत नाहीं ! स्वाऱ्या आल्या नाहींत वाटतं ? ( उत्तमा घाईनें येते ).

**उत्तमाः**—सरकार, खाशा स्वाऱ्या आल्या. सर्व मंडळी याच बाजूला येत आहेत. हं जा, लवकर तयार व्हा. मी त्यांना तिकडंच घेऊन येते.

**राजकुमारीः**—अगबाई मी तर स्त्रीवेषांत ! आतां काय करावं ! दुसऱ्या बाजूनं जाऊन चटकन पोषाख बदलला पाहिजे. उत्तमा, तूं त्यांचं स्वागत कर. जरा बोलण्यांत थोडा वेळ घालव, व दूरच्या रस्त्यानं त्यांना घेऊन ये. तोंपर्यंत मी जाऊन

चटकन कपडे बदलते व किल्यावर बाबांनाही निरोप पाठविते. ( जाऊं लागते तों समोरूनच राजे राणोजीराव व पिलाजीराव येतात. राजकुमारी व राजे राणोजीराव एकमेकांकडे डोळे भरून पाहून हंसतात व ओळख पटल्यावर राजकुमारी पदर घेऊन तावडतोब निघून जाते ).

**राजे राणोजीराव**:—( हंसत ) सरदारसाहेब, राग येणार नसेल तर प्रश्न विचारूं कां ? आतां तिकडे चटकन् निघून गेलेल्या लावण्यवती कोण ? राजकन्या तर नव्हत ? आम्हीं त्यांना मुजरा केला नाहीं, त्यामुळें त्या रागावून तर गेल्या नाहींत ?

**उत्तमा**:—राजे, होय त्या राजकन्याच होत्या. आपण एकदमच पुढं आल्यानं परकेपणामुळं गडबडून त्या पदर घेऊन निघून गेल्या. त्या फार सज्जन आहेत. आपणांवर मुळींच रागावणार नाहींत. तह झाला ही बातमी कळल्यामुळं त्यांना अतिशय आनंद झाला असून त्या आपण येण्याचीच वाट पहात होत्या. आपलं स्वागत करण्यांत कोणतीही उणीव होऊं नये म्हणून त्या स्वतः सर्वप्रकारं काळजी घेत आहेत. गोषा असल्यानं आपल्याशीं त्या न बोलतां निघून गेल्या; याबद्दल आपण मात्र रागावूं नये. त्यांना क्षमा करावी.

**राजे राणोजीराव**:— छे, आम्हीं मुळींच रागावणार नाहीं. जनानी स्वाऱ्या इकडे असतील ही कल्पना नसल्यामुळें आम्हींच रस्ता चुकलों असें आम्हांला वाटूं लागलें ! मार्ग दाखविणाऱ्या मंडळींनीं आम्हांस ह्या बागेंत आणून सोडलें.

**उत्तमा**:- महाराजांची तशीच आज्ञा होती. मी आपल्या स्वागताकरितां इथं रहावं व ताईसाहेबांनीं स्वतः व्यवस्था पहावी असं ठरल्यामुळं इकडं दुसरीं कोणी माणसं ठेवलीं नाहींत. आमचे बडे सरदारसाहेब, आपले पट्ट शिष्य, तिकडे जल-पानाच्या व्यवस्थेवर आहेत. या पलीकडच्या कुंजांत जलपानाची व्यवस्था आहे. तेथं थोडी विश्रांति घेऊन नंतर किल्यावरील राजवाड्यांत जावयाचं आहे.

**राजे राणोजीराव**: -आपल्या राजकन्या फार रूपवान् आहेत ! रूपाप्रमाणें त्यांच्या अंगचे गुणही उत्कृष्ट असलेच पाहिजेत ! रूपगुणसंपन्न अशा आपल्या राज-कन्येचें दर्शन भाग्यवशात् झालें ! धन्य झालों आम्हीं !

**उत्तमा**:—राजे, राजकन्या अगदीं बत्तीस लक्षणी आहेत. जसं रूप तसेच गुण. रूपापेक्षां गुणांचं पारडं अधिक खालीं जाईल. आमच्या राजकन्येची स्तुति आम्हीं करायची हें कदाचित् अंधप्रेमाचं ठरावयाचं ! अशी राजकन्या आपणांस बुंदेले

राजघराण्यांत एकही आढळणार नाहीं. जेव्हां आपला खास परिचय होईल तेव्हां माझ्या म्हणण्याची सत्यता पटेल.

**राजे राणोजीराव**:—जाधवराव, आपण पुष्कळ सुंदर राजकन्या पाहिल्या पण या कांहीं विशेषच आहेत. ह्यांना पाहून आमचें मन प्रसन्न झालें आहे.

**पिलाजीराव**:—शिंदेराव, मन प्रसन्न कां होणार नाहीं ? रूप, गुण, संपत्तियुक्त ललना नेहमींच मनमोहक असते. शिकारीच्या वेळीं पडलेलें कोडें थोडें थोडें सुटत चाललें आहे ! माझें म्हणणें खरें आहे कीं नाहीं शिंदेराव ? जरा सावधच रहा. बुंदेलखंड आहे हा ! येथें बंगाल्याप्रमाणेंच फार जादू चालते म्हणतात. कुठल्याही प्रकारची जादुगिरी आपणांवर होऊं नये एवढी सावधगिरी ठेवलीच पाहिजे. नाहींतर एखाद्या पिंजऱ्यांत पोपट होऊन रहावें लागेल !

**राजे राणोजीराव**:—जाधवराव, आपण तर कांहीं पोपट बनून राहणार नाहीं. आतां तसाच एखादा योगायोग आल्यास राजपूतमराठ्यांच्या ऐक्याच्या दृष्टीनें कदाचित्······पण जाऊं द्या. असा विषय इथं कशाला ? सरदारसाहेब, जाधवरावांचा स्वभाव जरा विनोदी आहे. त्यांच्या थोड्याश्या ग्राम्य विनोदानें आपणांस विचित्र वाटेल. पण आपण तें लक्षांत घेऊं नका.

**उत्तमा**:—राजे, असा कांहीं न आवडण्यासारखा विनोद नव्हता. अहो चालायचंच. जरा समवयस्क मंडळी जमली कीं, थट्टाविनोद चालावयाचाच ! चालूं द्यां मलाही त्यांत मौज वाटते आहे.

**पिलाजीराव**:—सरदारसाहेब, एथील तरुणी जरा अधिक मोहक असतात असें म्हणतात, हें खरें ना ! मागसें फारच प्रेमळ, त्यांच्या प्रेमपाशांतून सुटणें जरा अवघड असतें. पण जाऊं द्या. आम्हीं पडलों रंगेल मराठे गडी ! उगोच अधिकउणें बोलूं व शिष्टाचाराचा भंग व्हावयाचा. चला शिंदेराव, जलपानकुंजाकडेच जाऊं या. उकाड्यानें जीव कसा कासावीस होत आहे !

**उत्तमा**:—चला. कुंज येथून जवळच आहे. आपणांस अगदीं थोडं चालावं लागेल. ( सर्वजण पडद्यांत जातात. पहिला पडदा उघडतो. राजकुमारी पुरुषवेषांत एका नोकरासह जलपानाची तयारी ठेवून उभी आहे. राजे राणोजीराव, पिलाजीराव व उत्तमा प्रवेश करतात.)

**राजकुमारीः**—राम राम जाधवराव. यावं इथं, थोडं जलपान करून विश्रांति घ्यावी. घोड्यावरचा दगदगीचा प्रवास असल्या उन्हांत थोडा तापदायक झालाच असेल. शिवाय अजून किल्यावरील राजवाड्यांत जावयाचं आहे, म्हणजे आणखी थकवा येईल.

**राजे राणोजीरावः**—(आश्चर्यानें व आनंदानें) राम राम सरदारसाहेब. तुमचें दर्शन झालें फार आनंद झाला आम्हांला. आपणांला पाहून आमची तहान व श्रम पार नाहींसे झाले. ( राजकुमारी लाजते ) छे छे, तसें लाजण्याचें किंवा संकोच मानण्याचें मुळींच कारण नाहीं. आपणांस भेटण्यास आम्ही फार उत्सुक होतो महाराजसाहेबांना आपल्या अटी पसंत पडल्या काय ? ते आम्हांवर प्रसन्न आहेत ना ?

**राजकुमारीः**—आपण फार थकले आहांत. थोडी विश्रांति घ्या. बसा जाधवराव. ( सर्व आसनावर बसतात ) महाराजांना आपलं म्हणणं पूर्ण पटलं आहे. ते म्हणतात, लागेल ती खंडणी देऊं व वाटल्यास आपल्या मदतीकरितां दतियाचं एक पथक सतत आपल्या हिंदवी स्वराज्याच्या कार्यास मदत करण्यास देवूं. बुंदेले वीरही पराक्रमांत मराठ्यांची बरोबरी करतील. महाराजांना आपली हिंदवी स्वराज्याची कल्पना पूर्णपणें पटली आहे !

**राजे राणोजीरावः**—हें सर्व श्रेय आपल्यासारख्या आमच्या मित्रास आहे. नाहींतर असलें बिकट काम होणें मुष्किल होतें. जाधवराव, मी म्हणतों तें खरें कीं, नाहीं ?

**पिलाजीरावः**—शिंदेराव, आपण म्हणतां तें अगदीं खरें आहे. ह्या आपल्या दोघा मित्रांनीं फार मोठी कामगिरी बजावली आहे. ( विनोदानें ) शिंदेराव, कांहीं करा पण या वीरांना महाराजांना विनंति करून मागून घ्या. म्हणजे यांचें पथक उत्तम होऊन आपणांस यांचा सहवास नेहमींच लाभेल ! पट्ट शिष्य गुरूची सेवा अगदीं मनोभावानें व प्रेमपूर्वक करतील !

**राजकुमारीः**—खरं म्हणतात जाधवराव. असा अनुग्रह झाला तर आमचं भाग्यच असं आम्हीं समजूं. महाराज या गोष्टीस तयार होणार नाहींत म्हणून नाइलाज आहे. बाकी आम्हीं आपल्या सहवासांत राहण्यास फार उत्सुक आहोंत !

**राजे राणोजीरावः**—(आनंदानें) ठीक आहे तर. आम्हीं आपल्याबद्दल महाराजांच्याकडे मागणी करूं. मात्र ते तयार व्हावेत व शिष्य महाशयांनीं आयत्या वेळीं

कांकूं करावें, असें मात्र होऊं नये. मोकळ्या मनानें पुन: एकदां आपण सांगा. आपली तयारी आहे कां ?

**राजकुमारी:**—(लाजून) आपला माझा परिचय आतां झाला आहे. आपल्या सहवासांत मला आनंद होतो. तसंच (हंसत) आपणांसही माझ्या सहवासांत होतो. मग नाहीं म्हणण्याचं कांहींच कारण नाहीं. वडील माणसांची मात्र अनुमति मिळावयास हवी. मग हा आपला शिष्य आपल्याबरोबर यावयाला एका पायावर तयार आहे. (हंसत) तो आपल्या सेवेंत मुळींच चुकारपणा करणार नाहीं. हं आतां जलपान करावं. (सर्वजण जलपान करतात).

**राजे राणोजीराव:**—(स्वगत) किती गोड हास्य हें ! किती मधुर संभाषण ! माझें हृदय प्रेमबद्ध झालें ! राजकन्याच काय ? माझें मन माझ्या ताब्यांत राहीलें नाहीं. (उघड) सरदारसाहेब विश्रांति झाली, जलपानही झालें. आतां आम्हीं महाराजांच्या दर्शनाकरितां उत्सुक आहोंत. आपली अनुमति असेल तर किल्यावर चलावें.

**राजकुमारी:**—चलावं राजे, तिकडेही सर्व तयारी आहे. पहा तीं किल्यावरील निशाणं ! आपल्या स्वागताकरितां मोठ्या डौलानं फडकत आहेत. चलावं जाधवराव.

**पिलाजीराव:**—(विनोदानें) आमच्यासारख्यास अशा स्वागताचें कांहींच कारण नव्हतें. महाराज आम्हांला इतका मोठेंपणा देतात, धन्यता वाटते आम्हांला ! जिथें शिंदेराव तिथें आम्हीं. आपण त्यांची मर्जी संभाळा; नाहींतर गुरुराज एखादे-वेळीं खप्पा व्हावयाचे !

**उत्तमा:**—राजांच्याबरोबर आपणही पाहुणे आहांत. तेव्हां आपलीही मर्जी संभाळलीच पाहिजे. राजांना तेवढं खूष ठेवावं व आपल्याकडं दुर्लक्ष करावं हें योग्य होईल कां ?

**पिलाजीराव:**—(हंसत) मग असं करा. तुम्हीं व्हा आमचे शिष्य. दोघे शिष्य महाशय, या आपल्या अतिथि-गुरूंचा खूप चांगला समाचार घ्या! चलावं शिष्यश्रेष्ठ! आजपासून आम्हीं गुरु व तुम्हीं शिष्य ! जगांत अशाच गुरु-शिष्यांच्या जोड्या जमल्या तर खूप मौज येईल. चला.

(राजे-राजकुमारी व जाधवराव-उत्तमा जोडीनें एका मागून एक जातात.)

( पडदा पडतो. )

# अंक पहिला.

## प्रवेश आठवा.

( दतिया-किल्ल्याच्या राजवाड्यांतील दिवाणखाना. भोजन, पोषाख, अत्तरपान वगैरें झालें असून तहाच्या अटी मंजूर होऊन उभय पक्षांच्या सह्या तहनाम्यावर झाल्या आहेत, राजा निरोप देण्यास तयार आहे, असा देखावा. )

**राजा:**—बरें झालें! कुवरच्या श्रमाचें चीज झालें! मला वाटत होतें कीं मराठ्यांशीं युद्ध करून आपलें स्वातंत्र्य राखावें लागेल. पण आमच्या कुवरनीं मोठ्या शहाणपणानें तह घडवून आणला. स्वागतसमारंभ उत्तम पार पडला असून आतां मंडळी जाण्याकरितां निघणार आहेत. (उठून.) वा आलीच कीं मंडळी. या शिंदेराव. या जाधवराव. (शिंदेराव व जाधवराव, राजकुमारी व उत्तमा सरदारी वेषांत प्रवेश करतात.)

**राजे राणोजीराव:**—महाराज, आपण फारच आमच्याकरितां कष्ट उचललेत! आम्हीं एवढ्या मोठ्या स्वागताला मुळींच पात्र नव्हतों. आम्हीं आपले शिपाईगडी. राजामहाराजांच्या थाटाचें स्वागत आम्हांला नको होतें.

**राजा:**—राजे, राजेमहाराजेही आपल्या चरणांजवळ लोळत राहतात. हिंदवी स्वराज्याचे आपण नेते, पुढारी, कार्यकर्ते. आपली योग्यता अनेक महाराजांस याव-याची नाहीं. इथें येऊन आपण आम्हांला खराखर पावन केलें आहे.

**राजकुमारी:**—खरं म्हणतात महाराज. राजांची योग्यता फार थोर आहे. ह्यांनीं आम्हां सर्वांसच खरं राष्ट्रकार्य काय आहे याचं शिक्षण दिलं आहे. राष्ट्रसेवेची महति त्यांनीं आम्हांस पटविली. परमश्रेष्ठ राष्ट्रकार्य करण्याची सुसंधि त्यांनीच आम्हांला आज प्राप्त करून दिली. राजे, आपलं करावं तितकं स्वागत अगदीं अपुरं आहे. आम्हीं दिलेले लाख दोन लाख रुपये या राष्ट्रकार्याकरितां लागणाऱ्या कोट्यावधी रुपयांत तुळशीपत्रासारखे आहेत. यांत आम्हीं आपणांस काय अधिक दिलं?

**राजे राणोजीराव:**—हें तुळशीपत्र प्रेमानें अर्पण केलें आहे. भक्तिभावानें वाहि-लेल्या फुलाच्या पाकळीची किंमत अनेक कोटी रुपयेही करूं शकत नाहींत. धन-दौलतीपेक्षां कार्यप्रेमी वीरांची आवश्यकता राष्ट्राला अधिक आहे. स्वराज्य प्राप्तीसाठीं प्राणाहुति देणारे, आपलें सर्वस्व अर्पण करणारे, आपल्यासारखे भक्तिवान् व श्रद्धाळु पुरुषश्रेष्ठ असावयास पाहिजेत. आज आपण जें उदाहरण घालून दिलें त्यानें राज-

पुतान्यांतील सर्व राजपुतांचे डोळे उघडतील. बुंदेले वीर खरे समजदार म्हणून आपली कीर्ति दिगंत होईल. निदान आम्हीं सर्व मराठे आपल्या थोर मनाची, उच्च कृतीची, व भाग्यवंत अशा सौजन्याची तारीफ करीत राहूं.

**राजाः**—आमचें अल्पसें स्वागत आपण मोठ्या मनानें घेत आहांत यांत राजे, आपला मोठेंपणा आहे. आपल्या कृपेनें सर्वकांहीं आम्हास लाभलें आहे. अशीच कृपा-दृष्टि सतत राहूं द्या. आपल्या व आमच्या घराण्याचा ऋणानुबंध पिढ्यान् पिढ्या चालावा अशी त्या प्रभु एकलिंगजीजवळ प्रार्थना आहे.

**राजे राणोजीरावः**—ज्योतिर्लिंग महांकाळेश्वर आपल्या इच्छा पूर्ण करतील. आपल्या व आमच्या घराण्याचा ऋणानुबंध पिढ्यान् पिढ्यांचा राहील हो बरी आठवण झाली. महाराज आपणापाशीं एक विनंति आहे. ती आपण मान्य करावी. थोडी मागणी आहे. आपणांस फार प्रिय असलेली गाष्ट आम्हीं मागितली तर तीस आपण होकार द्याल काय !

**राजाः**—राजे, अगदीं संकोच करूं नका. माझ्या राज्यांतील जी वस्तु आपणांस पाहिजे, ती मी आनंदानें आपणांस अर्पण करीन. काय आहे आपली मागणी ? कळूं द्या तर खरी. तुम्हीं मागावें व आम्ही नाहीं म्हणावें असें काय आहे ? तुम्ही आजपासून आम्हांस पुत्राप्रमाणें प्रिय आहांत. कांहीं संकाच धरूं नका, मागा.

**राजे राणोजीरावः**—महाराज, मागणी जरा नाजुक व अवघडही आहे. मागणीची वस्तु आपली व महाराणीसाहेबांच्या फारच आवडीची आहे. म्हणून जरा संकोच वाटतो.

**राजाः**—बेलाशक मागा. ती न देण्यासारखी असल्यास तिच्या तोलाची दुसरी देऊं. पण आपणांस निराश करणार नाहीं. अतिथानें मागावें व आम्हीं न द्यावें हें राजपुतांचें शील नाहीं. फारच नाजुक बाब असल्यास फार तर त्या एवजां मोबदला देऊं. जें काय पाहिजे तें आपण जरूर मागा.

**राजे राणोजीरावः**—आपल्या घराण्याच्या ऋणानुबंधाची आणभाक होऊन आतां मैत्री झाली आहे. आपण मात्र असें समजूं नका कीं, आमच्या पुढच्या मागणीच्या नकारानें आम्हांस दुःख होईल. आमच्या मागणीबद्दल कसलाही विचार मनांत न ठेवितां मोकळ्या मनानें स्पष्ट जबाब द्यावा. आपल्या मनावर कसलेंच दडपण मानूं नये.

**राजाः**—राजे, आपली मागणी बरीच अवघड असावी असें दिसतें. म्हणूनच आपण इतक्या कळवळ्यानें बालत आहांत. माझ्याकडून प्रथम आपणांस वचन

पाहिजे कां ? अहो आपणांस न देण्यासारखें जगांत काय आहे ? वाटल्यास पहिलें वचन घ्या. मग तुम्हांस मागणी करण्यास धैर्य होईल ना !

**राजे राणोजीराव**ः— महाराज वचन बिलकुल देऊं नका. तुम्हांस नकार देण्यास मोकळीक राहिलीच पाहिजे. बाब नाजुक असून मानापमानाचा प्रश्न उत्पन्न करणारी आहे. म्हणून थोडें जपूनच घेतलें पाहिजे. बरें तर ऐका. आपल्या या दोन्ही सरदारांची व आमची मैत्री फार दृढ झाली आहे. ते व आम्हीं सतत सहवासांत असावें असें आम्हांस वाटूं लागलें आहे. दतियाचें एक लष्करी पथक आमच्या सैन्यांत आम्हीं ठेवूं इच्छितों व हे त्या पथकाचे सेनापति ते राहतील. ते गुणवान् व शूर आहेत म्हणून आमच्या सैन्यास गुणी माणसांच्या सहवासाचा लाभ होऊन आमचें राजपूतमराठा ऐक्याचें ध्येय पूर्ण होईल. हें उदाहरण आम्हांस इतर क्षत्रियांस दाखवितां येईल व क्षात्रसंघटनाचा प्रश्न लवकर सुटेल.

**राजा**ः—( घाईनें व दुःखानें ) छे छे, राजे, एवढं मात्र मागूं नका आपण दतियाचें पथक जरूर ठेवा. आमच्या सेनापतीसारखे वीर आम्हीं त्यावर नेमूं. कुमार व भीमसिंह ह्यांना आम्हांस त्यावर नेमतां येणार नाहीं. कुमार आमचे जीव कीं प्राण आहेत. त्यांना आमच्यापासून दूर ठेवण्यास आम्हीं क्षणभरही तयार नाहीं. कुमारांची मागणी आपण स्वप्नांतही करूं नका. ( राजे व राजकुमारी निराशेनें एकमेकांकडे पहातात). राजे, कुमारांना आपल्याबरोबर पाठविल्यानें आमची आंधळ्याची काठीच नाहींशी होणार ! आमचा आधार तुटला जाणार आहे. आमची एकुलती एक राजकन्या ! ( राजे व राजकुमारी एकमेकांकडे पाहून हंसतात ) ती बिचारी राहणार पडद्यांत ! स्त्रीच ती ! आतां आमची सर्व भिस्त या कुमारांवर ! त्यानां तुमच्याबरोबर पाठविल्यावर मग काय राहिलें आमचें ? सर्वस्वच गेलें कीं ! कृपा करा, त्यानां मागूं नका. या वृद्धाची दुनिया उजाडूं नका ! ही मागणी मला पूर्ण करतां येणार नाहीं. ती नाकारल्याबद्दल दुःख वाटतें. क्षमा करा माझा नाइलाज आहे !

**राजे राणोजीराव**ः—छे छे, महाराज, यांत क्षमा मागण्यासारखें काय आहे ? मी प्रथमच म्हटलें होतें कीं, मागणी थोडी नाजुक आहे. ठीक आहे, सोडा तो विषय. आपली जी मैत्री झाली ती कायम ! आपला ऋणानुबंध जन्मोजन्मींचा राहील ! आपण अगदीं वाईट मानूंनका. वृद्ध माणूस आपण ! आपणांस कोणीतरी आधार पाहिजेच. सर्व आनंदी आनंद झाला. तह झाला व आपला मोठा आधार मिळाला.

सर्व कांहीं आमच्या इच्छेप्रमाणें झालें. पण कुमार तुम्हीं उदास कां ! आणि डोळ्यांत आंसवें ! हें काय भलतेंच.

**राजकुमारीः**—(गहिंवरून) नाहीं, राजे, मी उदास नाहीं. डोळ्यांतून आसवं आपोआपच गळत आहेत. आपण आम्हांला सोडून जाणार म्हणून वियोगदुःखाच्या भावी कल्पनेनं त्रास होतो आहे. महाराजांची आज्ञा आम्हीं मानलीच पाहिजे. पुनः संधी येतांच महाराजांची अनुज्ञा आम्हीं घेऊं व आपणाकडं येऊं. गुरूशिवाय शिष्याला कसं चैन पडेल ! आपणांस आम्हीं निराश करणार नाहीं. आणखी थोडे दिवस थांबावं लागेल एवढंच.

**राजाः**—कुमार, काय म्हणतां तुम्हीं हें ? उगीच राजांना आशेवर ठेवूं नका. तुम्हांला कांहीं मागचापुढचा विचार आहे कीं नाहीं ? (रागानें) कुमार, भलतेंच कांहीं बोलूं नका. ही गोष्ट अशक्य आहे. राजांच्याकडे लक्ष देऊं नका. सोडा तो विषय. पाहुण्यांना आनंदानें निरोप द्यावयाचा सोडून भलतेच प्रश्न काढीत आहांत. राजे, या आतां. या पिकल्यापानाकडे पहा. केव्हां गळून पडेल याचा नियम नाहीं म्हणून तुम्हींच कुमारांची समजूत घाला. कुमार, पाहुण्यांना कुठलीही तकलीफ होऊं नये. राजे, जाधवराव, या आतां. (सर्व वंदन करतात. राजा जातो).

**राजे राणोजीरावः**—जाधवराव, पाहिलंत आपली कशी निराशा झाली ती. पहिलीच वेळ आहे. कुमार म्हणतात त्याप्रमाणें पुनः योग येईल. खरं कीं नाहीं कुमार ? आमचे शिष्य आम्हांला सोडून केव्हांही राहणार नाहींत.

**राजकुमारीः**—(दुःखानें) होय राजे, तूर्त निराशा झाली खरी. पण महाराजांचं मन वळवून मी लवकरच आपल्या दर्शनाला येईन. येथून गेल्यावर आपले मुक्काम कसकसे पडतील ? आम्हांला त्याची थोडी माहिती असावी.

**राजे राणोजीरावः**—चालू स्वारीचें काम शेंवटास आलें आतां आम्हीं परत श्रीशाहूछत्रपतींच्याकडे जाबसाल देण्याकरितां साताऱ्यास जाणार आहोंत. महाराज छत्रसाल, आमचे जुने दोस्त, त्यांना भेटून उज्जैनला जाऊं. तेथील कामकाज उरकून खानदेशांत जाऊं. तेथून मोंगलाईंत जाऊं. नंतर पुणें, सातारा ह्या ठिकाणीं जाऊन पेशवे व छत्रपति ह्यांच्या भेटी घेऊं. तेथून पुढील वर्षाच्या कामगिरीची आंखणी करून विजयादशमी होतांच इकडे उत्तर हिंदुस्थानांत येऊं.

**राजकुमारीः**—आपल्या या दासाची मात्र आठवण ठेवा. माझी मुद्रिका आपणाजवळ आहेच. आपलीही मी जीवापलीकडे ठेवली आहे. ह्याच मुद्रिका एकमेकांचीं प्रेमवचनं

आहेत असं समजा. राजे मी सर्वस्वी आपणांवर अवलंबून आहे. माझ्या भावी आयुष्याचं चीज करणं आपल्या स्वाधीनचं आहे. आपण जसा मला हात दिलात तसा माझा उद्धार करा. एवढीच माझी आपल्याजवळ आग्रहाची मागणी आहे. जाधवराव, तुम्हीं या गोष्टीस साक्ष आहांत. जेव्हां जेव्हां वेळ येईल तेव्हां तेव्हां या गरीबाबद्दल आपल्या मित्रांना आठवण देत जा.

**पिलाजीराव:**—कुमार, आपण बेफिकीर असा शिंदेरावांना मी बिलकुल चैन पडूं देणार नाहीं. सारखी आपली आठवण काढून स्वारीला बेचैन करीत जाईन. बाकी आमचे राजे तसे विसराळू नाहींत म्हणा ! (उत्तमेस) कांहो भीमसिंह तुम्ही कराल कां आमची आठवण ? कारण शिंदेरावांना जोडीदार मिळाले. आम्हांलाही वाटते कीं आपणांस जोडी मिळावी. जर आपली हरकत नसेल तर आपणही अशीच जोडी बनवून टाकूं.

**उत्तमा:**—जाधवराव, तुम्हीं जर मला शिष्य करून घेतलं आहे तर मी आपल्या गुरूला कसा विसरेन. हं एखादे वेळीं गुरूच शिष्याला विसरावयाचे. कारण गुरूंच्या-पाठीमागें व्यवसाय अनेक. शिवाय मी पडलों कुमारांचा सेवक-मित्र. तेव्हां जिथं ते तिथं आम्हीं. खरं आहे कीं नाहीं, सरकार ?

**राजकुमारी:**—होय भीमसिंह, तूं म्हणतोस तें खरं आहे ! चला राजे आम्हीं आपणां-बरोबर छावणीपर्यंत येतों. पायथ्याशीं घोडे तयार ठेविले आहेत. सज्जनाबरोबर चार पावलं सहवास करावा असं म्हटलं आहे. शिवाय आतां आपण छावणी उठवून दक्षिणेस जाणार. त्यामुळं अधिक उदास वाटत आहे. ( गहिंवरून ) काय करावं महाराज अनुकूल नाहींत. पुनः भेटीचा योग केव्हां येतो कोण जाणं ?

**राजे राणोजीराव:**—आपण धीर सोडूं नये. पुनः पुढील वर्षी आम्हीं बुंदेलखंडांत येणारच आहोंत. तेव्हां आपली अगत्यपूर्वक भेट घेऊं. तोंपर्यंत आपण महाराजांचें मन वळवून ठेवावें. आमचा निश्चय कायम आहे. ही ताटातूट आपणाप्रमाणें आम्हांसही दुःखकारक होत आहे. पण वेळेकडे नजर दिली पाहिजे. बरें कुमार, आतां गड उतरून आम्हीं छावणींत जातों.

**पिलाजीराव:**—चला नूतन शिष्यवर आपणही आमच्याबरोबर असा, गप्पा-गोष्टी करीत छावणीपर्यंत चला. कुमार व राजे बरोबर जातील. तुम्हीं व आम्हीं बरोबर जाऊं.

**राजकुमारीः**—जाधवराव योग्य म्हणतात. भीमसिंह तूं चल जाधवरावांच्याबरोबर. मी येतों राजांच्याबरोबर.

**उत्तमाः**—जी सरकार, चला.

( राजकुमारी व राजे आणि जाधवराव व उत्तमा जोडीनें जातात ).

अंक पहिला समाप्त.

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

(दतियाच्या किल्ल्यावरील राजवाडा. राणी एकटीच महालांत विचार करीत बसली आहे.)

**राणीः**—कुवर अलीकडं इतकी उदास कां असते ? कांहीं कळत नाहीं. धड बोलत नाहीं, खेळत नाहीं, खात नाहीं, पीत नाहीं. दिवसेंदिवस अधिकच उदास होत आहे. राजे येऊन गेल्यापासून तिला कसलं तें राजपूतमराठ्यांच्या ऐक्याचं वेड लागलं आहे ! व्हायचं असलं ऐक्य तर होईल. हिनं उगीच सारखी चिंता करून कां तें लवकर होणार आहे ? पण तिच्या कांहीं तें ध्यानांत येत नाहीं. सारखं "मधु-मीलन", "ऐक्य", ह्याच भावनेंत ती वावरत असते. देवा, हिच्या मनांतील वेड अजीबात काढून टाक. ही पहा आलीच. पण सारखी अगदी विचार करीत ! ( राजकुमारी प्रवेश करते ).

**राजकुमारीः**—( स्वगत ) राजे गेल्यापासून जिवाला कशी हुरहूर लागली आहे. कांहींसुद्धां सुचत नाहीं. मन कसं उदास झालं आहे. मनाची तळमळ कशी शांत व्हावी ? राजे जिथं असतील तिथं पांखरासारखं उडून जावं असं वाटतं ! पण शरीर दुर्बल ! तें मनाच्या भराऱ्यांबरोबर कोठून भराऱ्या मारील. आईबाबा माझ्या मनाप्रमाणं वागत नाहींत. बाबांना माझ्या प्रेमाची कल्पना, राजे गेल्या दिवसापासून आली आहे ! ते माझ्या मतानं वागते तर आज राजपूतमराठ्यांचं मधु-मीलन झालं असतं. देवा, कांहीं कर, पण हें "मधु-मीलन" होऊं दे. किती गोड भावना आहे ही ! पण हें व्हावं कसं ! रूनीं माणसं रूढी सोडावयास तयार नाहींत. मग हा नवमत-प्रसार कसा व्हावा ! मी तयार आहे, राजे तयार आहेत, तर वडील मंडळी विरुद्ध आहेत. सर्वच रूढीबंधनांत गुरफटलेले. रूढी तोडण्याची एकाचीही हिंमत नाहीं. कांहीं सुचत नाहीं. जीव कसा वेडावून गेला आहे. ( उघड ) अगबाई, आई तर इथंच आहे.

**राणीः**—(कुरवाळून) कुवर, बाई तूं नेहमी अलीकडं अगदीं उदास दिसतेस. मराठ्यांची छावणी उठल्यापासून तुला असं काय झालं आहे ? तुझं मन कशांतच लागत नाहीं असं मला वाटतं. खरं सांग काय कारण आहे बरं ! माझी बाळ अशी कधींच आजवर उदास दिसली नाहीं. फुलपांखराप्रमाणं आनंदांत बागडणारी तूं आतां अशी कां झाली

आहेस ? या तुझ्या मातेला सगळं मोकळ्या मनानं उघड करून सांग. पण बाई, अशी मनांत झुरूं नकोस !

**राजकुमारी**:—आई, काय सागूं तुला, मला सांगायला लाज वाटते ग ! इतके दिवस खेळलें, बागडलें, वाटेल तसं मोकळ्या मनानं तुझ्याजवळ बोललें. पण आज मात्र मला लाज वाटतें. राजे, ( लाजते ) त्यांची भेट झाल्यापासून माझं मन माझ्या स्वाधीन राहिलं नाहीं. स्वराज्याची कल्पना इतकी पटली आहे कीं त्याकरितां वाटेल तो त्याग करावा असं वाटतं. तसंच त्यानंतर सर्व क्षत्रियांचं संघटन हा प्रश्न मनाला चटका लावणारा आहे. तो सुटल्याशिवाय मुसलमानांच्या मगरमिठींतून भरतखंड मोकळा होणार नाहीं. मला वाटतं माझ्या प्रमाणंच त्या दोन्ही कल्पना किंवा बाल-बुद्धीचे विचार आई तुला पटतील !

**राणी**:—होय कुवर, तुझे विचार मला पटतात. हिंदवी स्वराज्य पूर्ण होण्यास नुसते क्षत्रियच नव्हे तर अखिल हिंदुमात्र एकजीव व्हावयास पाहिजेत !

**राजकुमारी**:—किती बरोबर बोललीस आई तूं ! अखिल हिंदुजनांचं संघटन किंवा एकीकरण व्हावयास पाहिजे, ही गोष्ट सत्य आहे. आज नुसता क्षात्रसंघटनाचा प्रश्न सुटला तरी काम भागणार आहे. दक्षिणेंत मराठे व उत्तरेंत राजपूत हे दोन्ही क्षत्रिय खरे बलवान् आहेत. मराठ्यांनीं दक्षिणेंत स्वराज्याची कल्पना यशस्वी केली, त्याचाच प्रचार ते उत्तरेंत करूं लागले आहेत. ते परोपरीनं राजपुतांची समजूत करीत आहेत व स्वतः वाटेल तो त्याग करण्यास तयार आहेत. अशा स्थितींत राजपुतांनीं काय करावयास पाहिजे ?

**राणी**:—बाळ, किती प्रगल्भ विचार आहेत तुझे ! हे सगळे माझ्यासारखीला कसे कळतील ? राजकारणाचे प्रश्न पुरुषांनींच सोडवावे. आम्हां बायकांना ते कसे कळावे.

**राजकुमारी**:—तूं अगदीं इतकी अडाणी नाहींस कांहीं ! तुझ्यापासूनच मी सर्व शिकले ना ? तुझा रामायणमहाभारत वगैरे धर्मग्रंथांचा अभ्यास भरपूर झाला आहे. त्या ग्रंथांतील राजकारण तुला समजतं. प्रस्तुतचा साधा व उघड प्रश्न तुला सुटत नाहीं असं कसं होईल ?

**राणी**:—मला वाटतं स्वातंत्र्याकरितां राजपुतांची धडपड चालू आहेच. आजवर ज्यांनीं मोंगलांचं राज्य तारलं ते आपलं स्वराज्य सहज स्थापन करूं शकतात. मराठ्यांची कर्तबगारीही मोठी आहे. असं कळतं कीं दिल्ली गांठण्याचा त्यांचा विचार आहे.

**राजकुमारीः**— आई, तूं म्हणतेस तें खरं आहे. माळव्यांतील व बुंदेलखंडांतील मोंगल सुभेदारांची त्रेधा त्यांनींच केली. अकबर बादशहानं हिंदु-मुसलमानांच्या ऐक्या-करितां अनेक साधनं उपयोगांत आणलीं. पण त्यांत बेटीव्यवहार हें साधन फार यशस्वी ठरलं. त्यामुळंच राजपुतांना मोंगल आपल्या हाडामांसाचे वाटूं लागले. मधु-मीलनाच्या विचारानं माझं डोकं भंडावून सोडलं आहे. आई, राजे अगदीं सर्व-गुणसंपन्न आहेत व इतर सर्व दृष्टीनं योग्यही आहेत !

**राणीः**—हं आतां आलं माझ्या ध्यानांत. तुझं राजांच्यावर प्रेम जडलं आहे. पण बाळ, बुंदेले राजपुतांत आजवर तशी वहिवाट नाहीं. उदेपूरप्रमाणं आपलं कुल आजवर शुद्ध आहे. अशा स्थितींत तुझ्या मनाप्रमाणं होणं कसं शक्य आहे ? त्यामुळं आपल्या कुलास नाहीं कां कमीपणा येणार ? बाळ, तूंच विचार कर. महाराजांना ही गोष्ट कशी पसंत पडेल ? आपली जात, नातेवाईक, वगैरे सर्वच ही गोष्ट पसंत करणार नाहींत. म्हणून हा विचार तूं कायमचा सोडून दे.

**राजकुमारीः**—आई, ज्या ठिकाणीं राष्ट्रोद्धार होत आहे, तिथं थोड्याशा कुला-भिमानासाठीं आपण एवढं महत्कार्य मागं टाकावं काय ? राजांवर माझं प्रेम आहे. राष्ट्रकार्य व प्रेम हीं दोन्हीं यामुळं साध्य होणार आहेत. आमच्या विवाहानं ही प्रथा पडून हां हां म्हणतां अनेक विवाह घडून येतील व दोघांत कांहीं भेदभाव राहणार नाहीं. तूं तयार झालीस तर बाबा तयार होतील. कसंही कर पण माझा राजांच्या-बरोबर विवाह घडवून आण. ( राजा प्रवेश करतो ).

**राणीः**— हं बाळ, चूप बैस. महाराज आले. ते ऐकतील तर फार रागावतील.

**राजाः**—असा रागावण्यासारखा कोणता विषय चालला आहे ? तुम्हीं दोघीही माझ्या विचाराबाहेर वागत नाहीं. मग मला रागावण्यासारखं असं काय आहे ?

**राणीः**—विशेष कांहीं नाहीं ? आमच्या थोड्या राजकारणाच्या गोष्टी चालल्या होत्या. उगीच आपल्या शिळोप्याच्या गप्पा !

**राजाः**—मग मी त्यांत रागावण्यासारखं काय आहे ? जर मलाही कळेल तर बरें ! हं सांगा, कसल्या गोष्टी चालल्या होत्या ?

**राणीः**—राजपूतमराठ्यांचं ऐक्य कसं घडवून आणावं, हा विषय चालला होता. त्याकरितां कोणतीं साधनं आहेत याचीही चर्चा केली. इतक्यांत आपण आलांत !

**राजा:**—राजपूतमराठ्यांची मैत्री निदान आपल्यापुरती तरी झालीच आहे. बरें दिवसेंदिवस ती आपल्या उदाहरणाप्रमाणें अधिक राजेमहाराजे वगैरे राजपुतांत प्रसार पावेल. हिंदी स्वराज्याची व ऐक्याची कल्पना सर्वांस पटण्यासारखी आहे. त्यांत मला रागावण्यासारखा प्रश्न कसा निर्माण होतो ? जरा थोडें उघड सांगितल्यास बरें पडेल.

**राणी:**—महाराज, प्रश्न थोडा नाजुक आहे. शिंदेराव हे क्षत्रिय—मराठे आहेत. उदेपूरच्या महाराण्यांचे नातेवाईक आहेत. छत्रपति भोंसले घराण्याशीं त्यांचा संबंध आहे. राजे शिंदेराव व राजपूत यांत मुळींच परकेपणा नाहीं. आतां प्रश्न असा कीं, त्यांचा आपला संबंध अधिक दृढ कसा करतां येईल ?

**राजा:**—ते मूळचे राजपूत असले तरी आज ते आम्हांस फार दूरचे आहेत. सध्यां तात्पुरता त्यांच्याशीं स्नेह झालाच आहे. अधिक सहवासानें व परिचयानें तो दृढ होत जाईल. मग आणखी कोणती कल्पना आपण काढली आहे ?

**राणी:**—ते आपल्या लक्षांत यावयाचं नाहीं. आमची कुवर, कुमार म्हणून राजांच्या सहवासांत राहिली. त्यांचा स्वभाव वगैरे तिला पूर्णपणंणें कळून चुकला. सहवासांत राहिल्यानं एकमेकांचीं मनं मिळालीं आहेत. म्हणूनच राजांनीं कुमारांबद्दल मागणी घातली होती. त्या वेळीं ही गोष्ट लक्षांत आली नाहीं. आज तिनं मोकळ्या मनानं सर्व हकीकत सांगितली, त्यामुळं मला सर्व कांहीं कळलं.

**राजा:**—(दुःखानें) बाळ, काय हे ! आतां मी सर्व समजलों. राज्यापरी राज्य संकटांत पडलें व माझे अनेक पिढ्या शुद्ध असलेलें कुळही अशा दारुण संकटांत पडूं पहात आहे ! अरेरे, काय करावें ? या एकुलत्या एक मुलीनें काय आरंभिलें आहे ? राणीसाहेब आपणही तिला उत्तेजन देतां ? कुठें गेली आपली अक्कल ? सर्व शहाणपणाला आपण दोघींनीं फांटा दिला काय ? मला ही कल्पना देखील सहन होत नाहीं . माझ्या सर्व कुळाच्या अब्रूचे धिंडवडे निघण्याची वेळ आली असून राणीसाहेब, आपण ते उघड्या डोळ्यांनीं पहातां ? (संतापानें) असें वाटतें कीं तुम्हां दोघींचीही कत्तल करावी, पण अब्रू जाऊं देऊं नये. सांगा असला घाणेरडा विचार सोडून देतां कीं मरणाला तयार होतां ? मी ही गोष्ट कालत्रयीही होऊं देणार नाहीं. आम्हीं सर्व मरण पतकरूं पण आपल्या शुद्ध बुंदेले कुळाला बट्टा लागूं देणार नाहीं.

**राणी:**—छे छे, महाराज, असें रागावूं नका, मी बाळेची समजूत करते. हा विचार आम्हीं सोडून देतों. संतापूं नका व कांहीं अविचार करूं नका. मी सगळी व्यवस्था आपल्या मनाप्रमाणं करतें. माझी बाळ शहाणी आहे. ज्या

गोष्टीनं आपल्या पितरांना दुःख होईल अशी गोष्ट ती केव्हांही करणार नाहीं. बाळ सोड तो विचार, आपल्या पित्याच्या मनाला शांति प्राप्त करून दे! त्यांच्या मना-विरुद्ध वागणार नाहींस असं त्यांना आश्वासन दे. पोरवय आहे, सहज वाटलं ती बोलून गेली मजजवळ! आपण नका त्याची काळजी करूं! बाळ, त्यांच्या मना-प्रमाणं वागशील ना?

राजकुमारीः—बाबा, आई, तुम्ही मला क्षमा करा! माझं पोरवय तर खरंच! बरं विचारही थोडा न झेंपणारा! रूढीविरुद्ध असलेल्या विचारानं आपण रागावणार हें ठरलेलं! वाटत होतं तुम्हां लोकांची समजूत होईल! मला नवमतानं वागण्याची परवानगी द्याल! पण तसा योग नाहीं. नवमताच्या उदयास तुमच्यासारख्या रूढि-प्रिय जुन्या माणसांनीं विरोध करावा हें साहजिक आहे. आई, बाबा, सोडा तो विषय! ज्यामुळं तुम्हीं दोघंही दुःखी व्हाल अशी गोष्ट मीही करणार नाहीं. तुमच्या समजुती-प्रमाणं आम्हीं वागावं हेंच लेंकराचं उत्तमश्रेष्ठ कर्तव्य होय!

राणीः—पाहिलंत किती माझी बाळ शहाणी आहे! उगीच आपण तिच्यावर रागावलात व निष्ठुरपणानं बोललात! ये कुवर, अशी मजजवळ ये. माझ्या बाळेला किती भीति दाखविली तुम्ही! वडील मंडळीला जी गोष्ट पसंत नाहीं ती, ती कशाला करील! महाराज आतां तरी तिच्यावरचा राग सोडा व पूर्वींप्रमाणंच तिच्यावर माया करूं लागा.

राजाः—वा! बाळ आहेच आमची तशी समजूतदार! तुम्ही कांहीं करा पण कुळाची अब्रू सांभाळा. आमचें काय, आम्ही आतां म्हातारे झालों, पण तुम्हांला सर्व आयुष्य अजून काढावयाचें आहे. पुढील मुलाबाळांचाही विचार तुम्हास ठेविला पाहिजे. तुम्ही फार संभाळून वागलें पाहिजे. जेणेंकरून कुळाची धवल कीर्ति मलिन होणार नाहीं असेंच आपण वागलें पाहिजे. बुंदेले वीरांनीं आपल्या बाणेदारपणानें आजपर्यंत आपली बाजी राखली आहे. यापुढें ती तुम्हीच सांभाळणार. आतां असें करा. कुवर, तुम्ही लग्नाला योग्य झाला आहांत. राजपूत राजघराण्यांतील एखादें स्थळ सुचवा म्हणजे लागलीच तुमच्या पसंतीनें ताबडतोब विवाह उरकून घेऊं.

राणीः—भलतंच कांहीं तरी; मुलीला विचारावयाचं! स्थळं तिला कोठून माहीत असणार? बाळ, एखादें असलंच ध्यानांत तर सांग. वडिलांनींच उत्तम स्थळ पहावं व कुवरला तें सुचवावं. म्हणजे ती आपली पसंती वा नापसंती सांगेल! महाराज जेव्हां तुझा विवाह उरकतील, तेव्हां आमच्या डोळ्यांचं पारणं फिटेल!

**राजकुमारीः**—( स्वगत एकीकडे ) जें स्थळ सुचविलं, त्यानं बाबा इतके चिडले. मला मारून टाकावयालासुद्धां तयार झाले. तर आतां दुसरं कुठलं स्थळ सुचवावयाचं आहे. हिंदु कुमारीचा प्रथम निश्चयच कायम असतो. (उघड) आई, माझ्या विवाहाचा सध्यां विचारच सोडा. पुढें पहातां येईल. ज्या गोष्टीनं तुम्हां वडील मंडळींना दुःख होतं व मलाही ज्यामुळं उदासवाणं वाटतं, ती गोष्टच आपण बोलं नये हें बरं. शिवाय आम्हां पोरीसोरींना अशीं स्थळं कुठून माहीत असणार. वडिलांचंच काम आहे तें. आम्हाला काय जिकडं दावं लावाल तिकडं जावयाचं! मुक्या जनावरासारखीच आमची स्थिति आहे.

**राजाः**—छे असं म्हणूं नका. आम्ही आपलं मत घेतल्याशिवाय आपला विवाह करणार नाहीं. स्वयंवराची इच्छा असल्यास तोही समारंभ करूं. पण हाडाच्या राजपुताच्या गळ्यांतच आपण माळ घातली पाहिजे. आपण एखाद्या राजकुमाराचं स्थळ सुचवा किंवा स्वयंवरास तयार व्हा. जसा आपला विचार असेल तसें कळवा. कारण विवाह आतां अधिक दिवस लांबणीवर टाकतां येणार नाहीं. आम्ही कांहीं स्थळें शोधतों, व आपणांस कळवितों. पुढें येणाऱ्या मुहूर्तावरच विवाहाची योजना करावी असें आम्हांस वाटतें.

**राणी**.—केवढं महाराजांचं उदार मन हें! पाहिलंस बाळ तुझ्या वडिलांचं हृदय किती उदात्त व मायाळू आहे तें! बाळे, आतां तूं आपला निश्चय ठरव; व आम्हाला कळव.

**राजकुमारीः**—आई, तुम्ही सध्यां मला कांहींच विचारूं नका. मी उदास असल्यामुळं सध्यां मला त्या बाबतींत विचार करावयाचा नाहीं. ज्या वेळीं मन थोडं स्वस्थ होईल त्या वेळीं पाहतां येईल. तुम्ही मायाळू आहांत माझ्या मर्जीप्रमाणंच वागाल.

**राणीः**—महाराज, सध्यां तिला स्वस्थ राहूं द्या. थोड्या दिवसांनीं हिचं मन प्रसन्न होईल. मग ती आपल्या इच्छेप्रमाणं सर्व कांहीं करील. आजच घाई नको.

**राजा**—ठीक आहे. जशी तुम्हां दोघींची मर्जी. बाळ, तुमच्या मनाची उदासीनता घालविण्याकरितां आम्ही काय करावें बरें! कांहीं उपाय असेल तर आम्हांला सांगा; म्हणजे त्याप्रमाणें व्यवस्था करूं.

**राजकुमारी**.—(विचार करून आनंदानें) हं बाबा असं करा मला थोडे दिवस कुठंतरी बाहेर जाऊं द्या! कुठं बरं? हं बाबाजींकडं. महाराजांच्याकडं पुष्कळ

दिवसांत मी गेलें नाहीं. तिथं माझं मन रमेल, व उदासीनताही दूर होईल. उत्तमेला मजबरोबर पाठवावी. महाराजांच्या सहवासांत मला बरं वाटेल. शिवाय, त्यांच्याकडे असलेलीं राज्याचीं प्रकरणंही मी उरकून येईन.

**राजाः**—मला वाटतें सध्यां तुम्ही कुठं जाऊं नये, महाराज छत्रसालांच्याकडे जाणेंच असेल तर कांहीं दिवसानंतर जावें. आपल्या जाण्यानें आम्हाला फार हुरहूर लागेल ! शिकार वगैरे कांहीं मनोरंजक कार्यक्रम काढून उदासीनता दूर करावी. लहानपणापासून आपली आनंदी वृत्ति पाहून आम्हांला संतोष होतो, आपल्यामुळें आम्ही पुत्र नमल्याचें दुःखही विसरलों आहों, म्हणून आपण बाहेर जाण्याचें तूर्त रहित करा.

**राणीः**—हो खरंच, बाळ, आम्ही तरी कुणाच्या जिवावर करमणूक करावी ? मुलगा नाहीं, लहान मूलबाळ नाहीं. सर्वकांहीं तूंच ! आमची आशा, आनंद, वैभव सर्वकांहीं तूंच आहेस. मनाचा उदासपणा घालविण्यास मी तुझ्याशीं गोष्टी करीत बसत जाईन. मगतर जाईल ना तुझा उदासपणा !

**राजकुमारी.**—( हंसत ) काय मायाळू हृदयं आहेत तुमचीं ! मलासुद्धां तुम्हाला सोडून जावं असं वाटत नाहीं ! पण माझ्या मनाला कोणीतरी दूर दूर खेंचीत आहे ! हृदयावर माझा मुळींच ताबा राहिला नाहीं. त्याला कोणीतरी गुरुत्वाकर्षणा-प्रमाणं आपल्याकडं ओढीत आहे. माझं मलाच कळत नाहीं कीं हें काय होत आहे ! मी सर्व बाबतींत संयमी असा मोठा अभिमान मला होता. पण तो आतां पार गळून गेला. मी कुणाचीतरी मनानं गुलाम झाली आहे खास !

**राजाः**—पाहिलेत, पुनः ताळतंत्र नाहींसे झालें. आतां बडबड बंद न कराल तर थोड्या वेळांत वेड लागेल. पूर्वीप्रमाणें गुण्यागोविंदानें इथें राहून खेळत, बागडत रहा. वेड्या कोंकरासारखे हट्टी व अविचारी होऊन आपल्या बहुमोल जीविताचें मातेरें करूं नका. राणीसाहेब, समजवा आतां आपल्या कन्येला ! आम्हाला असली बडबड ऐकवत नाहीं. आम्ही पुनः बजावून सांगतों कीं, अविचार सोडा व नीट शुद्धीनें राहून आम्हाला दुःख देऊं नका. (राजा रागानें निघून जातो).

**राजकुमारीः**—(राणीच्या गळां पडून) आई, काय होत आहे हें ! कसं शांतवन करावं मनाचं ! आई, विरंगुळा व्हावा म्हणून बाबाजीकडे जावं म्हटलं तर तेंही बाबांना पसंत नाहीं. तूच सांग बरं, माणसांनीं कसं वागावं ! माझ्याच्यानं हें सगळं सहन करवत नाहीं ! विरहदुःखाची आंच किती तीव्र असते हें मला कसं समजावतां येईल ?

**राणीः**—पुरे कर ! जशी कांहीं मी स्त्री नाहीं ! स्त्रीचं अंतःकरण स्त्रीला चांगलं कळतं ! कुठून आले ते मराठे शिंदेराव ! तेही शत्रु म्हणून आले ! मित्र बनून चालते झाले ! त्यांचा कसला विरह मानावयाचा. त्यांना तर तुझं स्मरणही होत नसेल ! वेडी पोर आहेस तूं ! अग तुझ्यासारख्या मुली त्यांनीं अनेक देशांत, अनेक पाहिल्या असतील ! ते काय सर्वांच्याकरितां झुरत बसतील ? असं त्यांनीं मनावर घेतलं तर त्यांचं राजकारण कोणी पहावं ? वेडे मुली राजकार्यधुरंधर माणसं अशीं एक-मेकांच्या प्रेमासाठीं झुरत बसत नाहींत ? मला तुझंच आश्चर्य वाटतं. अग तूं स्वतःस राजकारणी, मुत्सद्दी म्हणवतेस ना ? मग एखाद्या सामान्य पोरीप्रमाणं, दुःख काय करतेस, गळां काय पडतेस, मन बावरलं काय म्हणतेस, हृदयावर ताबा राहिला नाहीं असं काय म्हणतेस ? बस कर ! असली वृत्ति सोडून दे. माझी सला ऐक, शोक सोडून दे !

**राजकुमारी**:—आई, तूं म्हणतेस तें मला पटतं. पण मलासुद्धां खात्री आहे कीं, शिंदेराव मला विसरणार नाहींत ! माझ्याप्रमाणं त्यांचीही स्थिति झाली असली पाहिजे ! एकदां प्रेमबद्ध झाल्यावर मोठमोठ्या ऋषींची तारांबळ उडते ! तर मग आमच्यासारख्यांची काय गत ! माझी खात्री आहे, तेही मजप्रमाणंच उदास असतील व मनांत विरहदुःखानं होरपळत असतील ! त्यांना माझी आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं. कारण माझ्याप्रमाणं तेही प्रेमपाशांत पडले आहेत.

**राणी**—हं पुरे कर. तसं असतं तर त्यांनीं लवकर छावणीच उठविली नसती ! खंडणी हातीं पडली कीं, गेले निघून. पुरुषच ते ! पुरुषाप्रमाणंच वागावयाचे ! तूं मात्र वेडी. बसली आहेस आपली झुरत ! बाळ, आतां नाहींस ना दुःख करून उदास होणार ?

**राजकुमारीः**—आई, समजलें तुझ्या म्हणण्याचा मतलब ! मुत्सद्दी, राजकारणी, स्त्रीपुरुषांनीं प्रेमवश होऊन आपलें राजकाज खोळंबून ठेवूं नये. खरं आहे तुझं म्हणणं. मीही त्या प्रेमाचं गांठोडं बांधून जरा दूरच ठेवून देतें. मग तर झालें ना ? मात्र कृपा करून बाबांना विचारून हवापालट करण्याकरितां पन्ना येथें बाबाजींकडं पाठव. आई, एवढं करच. करशील ना आई ? किती किती मायाळू आहे माझी आई ! हं बोल, सांग ना.

**राणीः**—होय बाळ. त्यांची मी परवानगी मिळवून देईन. आतां तर आनंदी होशील ना ? तें प्रेमवगैरे सर्व विसरून जा. राजकारणांत लक्ष घाल. इथलं राजकाज

पहात जा म्हणजे हळूहळू सर्व उदासीनता दूर होईल. माणसानं नेहमीं आपल्या व्यवसायांत मग्न असावं. म्हणजे मनांवर कसल्याच विकाराचं दडपण बसत नाहीं.

**राजकुमारीः**—खरंच आई तूं म्हणतेस तसंच करीन, पण बाबाजींकडून परत आल्यावर ! अगोदर नाहीं.

**राणीः**—बरं बाई, मी महाराजांना विचारून, म्हटलं तर उद्यांच तुला व उत्तमेला लवाजम्यासह पाठवितें मग तर झालं ना. मग ही आमची फुलराणी फुलेल ना ? वेडे मुली, तुझं वय आनंदांत राहण्याचं. कशी पडली प्रेमपाशांत कोण जाणं !

चल आतां. थोडी विश्रांति घे. दुःखानं बाळेचं तोंड कसं सुकून गेलं आहे.

**राजकुमारीः**—चल आई. ( दोघी ही जातात. )

(पडदा पडतो)

## अंक दुसरा.

### प्रवेश दुसरा.

(बुंदेलखंड—पन्नायेथील राजवाड्याचा दिवाणखाना. महाराज छत्रसाल, राजे राणोजीराव व पिलाजीराव बोलत बसले आहेत.)

**महाराज छत्रसालः**—राजे, साताऱ्याकडे जाण्याची अगदीं घाईच आहे कां ? आठपंधरा दिवस इथें मुक्काम केला असता तर आम्हाला बरें वाटलें असतें. कालच आपण इथें आला, व आज तर जाण्याची तयारी ! आपण असें तांतडीनें जाणें आम्हाला बरें दिसत नाहीं ! आपला पाहुणचार कांहींच झाला नाहीं ! काय जाधवराव खरें कीं नाहीं ? तुम्ही थोडे दिवस जरूर रहाच. म्हणजे आम्हाला आनंद होईल.

**पिलाजीरावः**—महाराज म्हणतात तें खरें. आम्हालाही इथें राहणें नेहमीं आवडतें. कारण मराठ्यांचा व आपला लोभ अनेक पिढ्यांचा आहे. म्हणून कांहीं परकेपणा वाटत नाहीं.

**राजे राणोजीरावः**—महाराज, आपण थोरल्या आबासाहेबांचे मित्र ! त्यांच्या इतकेच आपण आम्हाला पूज्य आहांत. दक्षिणेंत छत्रपतींना जेवढा मान, तेवढा बुंदेलखंडांत आपल्या सिंहासनाला मान म्हणून आपल्या चरणांसंनिध कांहीं काळ

घालविणें हें अत्यंत मोदकारक आहे; पण श्रीशाहूछत्रपतींची निकडीची आज्ञा असल्यामुळें घाईनें जाणें जरूर आहे. आपल्या आशीर्वादानें दतियाकडील स्वारी लवकर निपटली. म्हणून आतां वेळ न गमवितां जाणें जरूर आहे. महाराज, आपला लोभ आमच्यावर असल्यानें नेहमीं आम्हाला धन्यता वाटते.

**महाराज छत्रसालः**—राजे, महाभाग श्रीशिवछत्रपतींचें स्मरण झालें म्हणजे काय वाटतें आम्हाला हें वर्णन करवत नाहीं! आमचें भाग्य मोठें म्हणून असे सर्वश्रेष्ठ गुरु आम्हाला लाभले होते. आम्ही मोगलांच्या नोकरींत, गुलामगिरींत, नव्हे परदास्यांत शेणकिड्याप्रमाणें लोळत असतां त्यांनींच आम्हाला जागें केलें! मोंगल सरदार म्हणून मिरविण्यापेक्षां भारतभूचे उद्धारक, हिंदवी स्वराज्याचे कर्णधार, त्यांनीं आपल्या उपदेशानें आम्हाला बनविलें आज बुंदेलखंड स्वतंत्र असून स्वराज्य उपभोगीत आहे, याचें सर्व श्रेय त्या शिवावतारी थोरल्या आबासाहेबांना आहे. त्यांनीं आम्हाला असा गुरुमंत्र दिला कीं, आमच्यांतील मोंगल राजनिष्ठेचें भूत पार गाडलें गेलें. सुंदर उपदेशाबरोबरच त्या वेळीं श्रीभवानीमातेचा प्रसाद म्हणून ही बहुमोल तरवार त्यांनीं आम्हास प्रसाद म्हणून दिली. त्यांच्या दर्शनाचा तो प्रसंग आठवला म्हणजे राजे, हृदय कसें गदगद हालूं लागतें. डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागतात. त्या परमश्रेष्ठ विभूतींचीं मूर्ति मनश्चक्षूपुढें साक्षात् उभी राहते. त्यांच्या पुण्यमय आशीर्वादानें येथील स्वराज्यसूर्य तेजस्वीपणानें प्रकाशत आहे. आजचे शुभदिवस आम्ही पहातों ही त्या गुरुश्रेष्ठांचीच पुण्याई होय. त्यांच्या दिव्य कृति पाहून आम्हाला स्फूर्ति लाभली, त्यांच्या दिव्य वाणीनें आमचे बाहू स्फुरण पावले, व गुरु श्रीप्राणनाथ प्रभूंच्या प्रोत्साहनानें आम्ही सर्व बुंदेले वीर एकत्र केले. काळाशीं झगडावें त्याप्रमाणें आजवर या यवनांशीं आम्ही झगडत आहों. जें यश आज पदरीं पडलें आहे त्याचें सर्व श्रेय त्या दोन महात्म्यांना आहे, आम्हांला नाहीं.

**राजे राणोजीरावः**—असें नका म्हणूं महाराज! श्रीशिवप्रभु तर मराठ्यांचे परमेश्वरच आहेत. आपण त्यांना गुरु म्हणून मान देतां हेंही योग्यच. पण गुरूनें पुष्कळ उपदेश केला व शिष्य वेंगळा असला तर काय उपयोग होणार! थोरल्या आबासाहेबांचीच योग्यता आपले ठिकाणीं आहे. त्यांनीं व आपण स्वातंत्र्याचें कंकण बांधून यवनांशीं धर्मयुद्ध चालविलें व त्यांत यशही मिळविलें. भीमा नदीच्या कांठीं आपल्या उभयतांच्या भेटी झाल्या. आपला उत्साह, स्वातंत्र्यप्रीति व धर्मप्रेम पाहून आमच्या महाराजांना आनंदाचें भरतें आलें व आपणांस बंधु लेखून त्यांनीं आपणांस बहुमोल उपदेश केला;

व युद्धनीति सांगितली. यवन फार माजले असून ते धर्माचा उच्छेद करीत आहेत; तेव्हां त्यांचा युक्तीनें संहार केल्याशिवाय स्वातंत्र्य लाभणार नाहीं, व धर्मावरचें संकट टळणार नाहीं. अशा प्रकारची शिकवण त्यांनीं आपणांस दिली. म्हणून थोरल्या आबासाहेबांच्या व आपल्या ध्येयपूर्तीसाठीं आम्हीं सर्वांनींच अगदीं एकजीवानें झटलें पाहिजे. आज दतियावालेही आपले मित्र झाले आहेत. हळुहळु असेच बुंदेले सर्व लहान-मोठे राजे व आपण एक होऊं व हां हां म्हणतां दिल्लीला शह देऊं.

महाराज छत्रसालः—राजे, आपण, पेशवे व श्रीशाहूछत्रपति यांच्याबद्दल आमच्या आकांक्षा फार मोठ्या आहेत. यवनांचा पुरता मोड करून तुम्हीच त्यांना अटकेपार पिटाळून घाल, अशी आम्हाला बालंबाल खात्री आहे. आम्ही काय, आतां पिकलें पान. आज किंवा उद्यां गळून पडणारच. पण पुढील सर्व भिस्त आपणा मंडळींवर आहे. राजांचा पराक्रम, पेशव्यांचा सल्ला, छत्रपतींची आज्ञा, व आम्हांसारख्या वृद्धांचा आशीर्वाद,हिंदवी स्वराज्य सिंधुनदीपार खास प्रसृत करतील.आबासाहेब अल्पायुषी निवर्तले. अवरंगजेबानं संभाजी बाळाचा घात केला हिंदवी स्वराज्य व मराठेशाही पार रसातळीं जात होती. अशा वेळीं, राजाराम राजांच्या नेतृत्वाखालीं संताजी-धनाजींच्या घोडदौडीनें सारा महाराष्ट्र दणाणून सोडला व अवरंगजेबाला हाय हाय करीत प्राण सोडावा लागला. राजे, त्या धनाजी वीराच्या तालमींत तुम्हीं तयार झालेले! आतां आपणाबद्दलच आम्हाला मोठी आशा आहे. स्वराज्याचें तारूं पैल तीराला आपणच न्याल, यांत संशय नाहीं. आपल्या पांच पूज्य छत्रपतींच्या कारकीर्दी आम्ही पाहिल्या. आमची मनीषा पूर्ण व्हावी हाच आम्हाला रात्रंदिवस ध्यास लागला आहे. या वृद्धावस्थेंतही आम्ही यवनांशीं अद्याप झगडत आहों. पण आमची सर्व भिस्त आतां तुम्हां तरुण मंडळींच्या पराक्रमावर आहे.

राजे राणोजीरावः—महाराज केवढी मोठी आपुलकी ही! आम्हाला असा उन्नत आशीर्वाद मिळत राहिल्यास आम्ही आपल्या कृपेनें आपल्या इच्छेप्रमाणेंच भराभर राजकारण उरकूं. जाधवराव, मी म्हणतों तें खरें कीं नाहीं? आपणांस महाराजांचा आशीर्वाद असल्यावर आपण सहजच पराक्रम गाजवूं.

पिलाजीरावः—शिंदेराव, वडिलांच्या पुण्याईनें तर सर्व कार्यें यथासांग पार पडतात. वडिलांचा शुभाशिर्वाद नेहमीं फलदायीच असतो. आम्हां तरुणांना नसतो पांचपेंच! वडील सल्लागार असल्यावर चुका होण्याचा संभव फारच कमी असतो. महाराजांचा पोक्त सल्ला हा इकडील यशाची गुरुकिल्ली आहे. माळवा व बुंदेलखंड

इकडे आम्हास आज फिरकतांही आलें नसतें. महाराजांनीं मुसलमानांचा नक्षा उतरला आहे, म्हणून आम्ही धन्यवाद दिले पाहिजेत. ईश्वर आपणांस उदंड आयुष्य देवो व हिंदवी पातशाही दिल्लीला विभूषित झालेली पहाण्याची सुसंधि आपणांस लाभो. महाराष्ट्रांतील स्वराज्य व बुंदेलखंडांतील स्वराज्य हीं तुटक तुटक होतीं पण माळवा हातीं आल्यामुळें दोन्हीं एकत्र जोडलीं गेलीं आहेत. हिंदवी स्वराज्याची सीमा नर्मदा ओलांडून चंबळ गांठण्यांपर्यंत आली ती महाराजांच्या कृपेमुळेंच होय.

**महाराज छत्रसालः**—आमच्या वडीलकीला आपण मान देतां एवढाच त्यांतील अर्थ समजावयाचा ! बाकी खरे शूरवीर तुम्ही मराठे आहांत. महाराष्ट्रांतील तुम्ही सिंह आपल्या गर्जनेनें दिल्लीच्या तक्ताला हादरून सोडीत आहांत, त्यामुळें आम्हाला फार आनंद होत आहे. बरें पण तुम्ही चारसहा दिवस तरी इथें राहिलेंच पाहिजे. त्याशिवाय आमचें समाधान होणार नाहीं. आणखी थोडे दिवस राहतां येत असेल तर बरें म्हणजे पुढील राजकारणाबद्दल थोडें बोलणेंही झालें असतें.

**राजे राणोजीरावः**—महाराजांची आज्ञा आम्हाला मोडतां येणार नाहीं. आणखी दोन दिवस आमचा मुक्काम वाढवतों. मग मात्र आपण आम्हास लागलीच जाण्याची परवानगी द्यावी.

**महाराज छत्रसालः**—ठीक आहे. राजे, आम्हां म्हाताऱ्या माणसांचें तुम्ही ऐकलें, भूषण वाटतें आम्हाला ! आजच्या राजकारणासंबंधीं थोडा विचार करणें अवश्य आहे. दिल्लीपतीसुद्धां फार कमजोर आहे. त्याच्या दरबारीं भांडणें व अनेक तंटे आहेत. प्रत्येक प्रांताचा सुभेदार स्वतंत्र व बंडखोर झालेला असून तोच आपली सत्ता जमवूं पहात आहे. अशा वेळीं मराठे, राजपूत, शीख, जाट, इत्यादि क्षत्रियवर्ग एकजुटीनें प्रयत्न करतील तर यशप्राप्ति लवकर होईल. याबद्दल आपण कांहीं योजना आंखली आहे काय ?

**राजे राणोजीरावः**—होय महाराज, दिल्लीला शक्य तितक्या लवकर शह द्यावयाचा आमचा निश्चय ठरला आहे. दिल्लीला हिंदु बादशहा झाला पाहिजे याकरितां निरनिराळ्या प्रांतांत मोहिमा चालू आहेत. माळवा, बुंदेलखंड, राजपुताना, पंजाब, अयोध्या, वगैरे प्रांत जिंकण्याची सर्व योजना आंखली आहे. सर्व बाजूंनीं यवनांचा कोंडमारा करून त्यांना सिंधुपार करणें हेंच सर्वांचें ध्येय असलें पाहिजे. सर्व प्रकारचा त्रास, संकटें, अडचणी, सर्वकांहीं सहन करावयाचें पण ध्येय गांठावयाचें हाच सर्वांचा निश्चय आहे. आमच्याकडे उत्तरेकडील म्हणजे नर्मदेच्या वरच्या भागांतील सर्व

कामगिरीची सर्व जबाबदारी आहे. सध्यां मराठेशाहीचें राजकारण फार धडाडीनें चालू आहे.

**महाराज छत्रसालः**—आंखणी तर फार चांगली आहे. चोहोंकडून हरहर महादेव गाजविल्यावर दिल्लीपतीची दुर्दशा होण्यास काय वेळ लागणार आहे! तुमचें काम, मला वाटतें अधिक जोखमीचें व अवघड आहे. दिल्ली हा मुसलमानांचा अड्डा आहे. तुर्कस्तान, अरबस्तान, इराण, अफगाणिस्तान, इत्यादि मुसलमान देशांतून लाखो मुसलमान दिल्ली येथें जमूं शकतात. त्यामुळें ते जिंकले जात नाहींत. त्यांच्याशीं लढतां लढतां आमचा जन्म गेला पण त्यांचा अद्याप बिमोड होत नाहीं, याचें कारण तेंच आहे.

**राजे राणोजीरावः**—निरनिराळ्या यवनांनीं निरनिराळ्या प्रांतांत वसाहती करून ते त्या मतांशीं अगदीं समरस झाले आहेत. त्यांना खड्याप्रमाणें वेंचून काढून फेंकून देणें, त्यामुळें फार बिकट झालें आहे. छत्रपतींचें राजकारण फारच धोरणी आहे. बादशहाचे आपण सहाय्यकर्ते असें दाखवीत एका एका सरदारास पराभूत करीत एक एक प्रांत ते ताब्यांत घेत आहेत. मध्यवर्ति धोरण हेंच कीं यवनांना कसा शह देतां येईल! मुलुखामुलुखांत मोहिमा चालू ठेवून यवनांची शक्ति आम्ही कमी कमी करीत आहोंत. चोहोंकडे मोहिमांमध्यें यश मिळूं लागलें आहे. जाधवराव, आमचें म्हणणें बरोबर आहे ना ?

**पिलाजीरावः**—शिंदेराव, आम्ही पडलों शिपाई गडी! आम्हाला हें राजकारण कांहीं कळत नाहीं! लढा म्हटलें कीं लढावयाचें! शिंदेराव मुत्सद्देगिरीचे डाव आपणच खेळावे! आम्ही नाहीं! आपण सेनानी व राजकारणी पुरुष म्हणून आपली ख्याति आहे, तेव्हां महाराजांना आपणच सर्व धोरण समजावून द्यावें.

**राजे राणोजीरावः**—वा. जाधवराव, आपण हा विनय दाखविलात. आपण व आम्ही बरोबरीचे व एकाच तोलाचे! पराक्रम किंवा राजकारण यांत कांहीं कमी नाहीं. आमच्याप्रमाणेंच आपणही धनाजीराव सेनापतींचे पट्ट शिष्य आहांत. पांडव-गडाचा पराक्रम, दमाजी थोरातावरील स्वारी, आणखी असेच लहानमोठे आपले पराक्रम आम्ही विसरलों नाहीं! उत्तरेकडील हरएक स्वारींत आपली मदत होते. पेशवे प्रत्यक्ष चुलत्याप्रमाणें मान देऊन आपणास काका म्हणतात. नुकतीच आपण फिरंगी व इंग्रज यांवर तरवारीची शर्त करून त्यांचा जो अलिबागेस हिरा बुरजा-जवळ पराभव केलात त्याबद्दल पेशव्यांनीं आपणांस सुपें मुकामीं नुकतीच पाव चाहूर

जमीन वंशपरंपरा इनाम दिली. धनाजीराव जाधवांच्या पाठीमागें त्यांचा कुपुत्र चंद्रसेनराव ह्याची जागा तुम्ही चांगल्या रीतीनें भरून काढली. तो छत्रपतींशीं बेइमान होऊन निजामाकडे गेला. पण तुम्ही मात्र पूर्ण इमान राखलें. आपली स्वराज्यसेवा विसरण्या-सारखी नाहीं.

**महाराज छत्रसालः**—तुम्ही दोघेही फार योग्यतावान् पुरुष आहांत. आपल्या पराक्रमावर व मुत्सद्देगिरीवर हिंदवी स्वराज्याचें तारूं डौलानें डुलत राहिलें आहे. आपण त्याचे कर्णधार आहांत. विनयानें कोणी कमीपणा घेण्याचें कारण नाहीं. सर्वच सेवक, म्हणून मानापमान, श्रेय, कष्ट, मेहनत, इत्यादि गोष्टीस न जुमानतां आपण भगवान् श्रीकृष्णाच्या उपदेशाप्रमाणें 'कर्मण्येवाधिकारस्ते' या न्यायानें अघाडीवर जावयास पाहिजे. बरें छत्रपतींचें धोरण इतकें सर्वश्रेष्ठ आहे कीं त्याप्रमाणेंच आम्ही सर्वांनीं वागलें पाहिजे. माळव्यांत दया बहाद्दर व गिरिधर बहाद्दर ह्यांचा ससेमिरा सारखा पाठीमागें आहे. गुजराथेंत अरबांचा त्रास आहे. रोहिलखंडांत रोहिला बळावला आहे. अयोध्येचा सुभेदार व अलाहाबादचा महंमद बंगष ह्यांचा बुंदेलखंडावर डोळा असून ते आज ना उद्यां या खडांत चढाई केल्यावांचून राहणार नाहींत. काशी, प्रयाग, अयोध्या, वगैरे सारखीं आमचीं पवित्र तीर्थक्षेत्रें यवनांच्या ताब्यांत असून त्यांचा त्यांनीं सारखा उच्छेद मांडला आहे. जिकडे पहावें तिकडे यवन मातले आहेत ! बुंदेलखंडावर तर भावी संकट फार मोठें ओढवणार आहे. राजे, महंमद-बंगषच्या स्वारीच्या धास्तीनें रात्रंदिवस आम्हाला चैन पडत नाहीं. त्याच्या लहान लहान फौजा सर्व बाजूंनीं हल्ले करीत आहेत.

**राजे राणोजीरावः**—त्यांचा बंदोबस्त करण्याच्या दृष्टीनें राजपुतान्यांत आम्ही नवीन राजकारण घडवून आणीत आहोंत. जयपूरचे सवाई जयसिंह, जोधपूरचे अजितसिंह व त्यांचे पुत्र अभयसिंह, उदेपूरचे महाराणे संग्रामसिंह, ह्यांच्यामध्यें स्वराज्याच्या दृष्टीनें नवचैतन्य निर्माण केलें आहे. सवाई जयसिंहजींनीं आपला वकील दीपसिंह यास दक्षिणेंत पाठवून मराठा राजकारण चोंखाळून पाहिलें आहे. ते पूर्णपणें मराठ्यांशीं सहमत झाले आहेत. बादशहाकडून गुजराथबद्दल पंधरा लाख व माळव्या-बद्दल अकरा लाख खंडणी देण्यास ते तयार आहेत. जयसिंहांनीं व आम्ही एक होऊन इतर शत्रूंचा बंदोबस्त करावयाचा आहे. छत्रपति व पेशवे यांच्याबद्दल दीपसिंहांनीं जयसिंहांस सांगितलें कीं, "शाहुराजा बहुत खुब्या राखतो. राजे जर मजलसीसारखे न चालत तर एवढें राज्य कसें राहूं शकलें असतें ? राजे पोख्त, शहाणे व विवेकी आहेत, जाबसाल उत्तम करतात. बाजीरावाशिवाय आणीक कोणी सत्यवचनी,

प्रामाणिक, पोख्तकारी, अगर चलनसाहेब फौज दुसरा कोणी नाहीं.'' अशा प्रकारें खात्री झाल्यावर जयसिंहांनीं आमच्याशीं सल्ला केली. राजाधिराज जयसिंह पराक्रमी असून फौजबंद आहेत. ते महत्त्वाकांक्षी आहेत. आज दिल्लीला दरबारी लोकांत दोन तट असून ते वजीर खानदौराच्या पक्षांत एक महत्त्वाचे मोहरे गणले जातात. मराठ्यांच्या मदतीनें दिल्लीच्या राजकारणांत आपलें महत्त्व स्थापन करावें, अशी त्यांची मोठी इच्छा आहे. ज्याप्रमाणें सवाई जयसिंह मोंगल बादशहा नामधारी करून सर्व सत्ता हिंदूंच्या हातीं आणू इच्छितात त्याचप्रमाणें आमचे छत्रपतीही अवरंगजेब बादशहास दिलेलें वचन सध्यां तात्पुरते पाळीत आहेत. ''राजश्री स्वामींचें वचन पूर्वीं अवरंगजेब बादशहा होते त्यासीं गुंतलें आहे कीं, तुम्हावर कोणी परचक्र आलें तर आपण तुमची कुमक करावी, सर्वस्वें जेथपावेतों होईल तोंपर्यंत साहित्य करावें.'' याप्रमाणें दिलेल्या वचनास जागून, छत्रपति आजचें राजकारण हाकीत आहेत. आतां सवाई जयसिंहामार्फत राजपुतान्यांत संघटन करावें व बुंदेलखंडांतील आपलें कार्य अधिक जोमानें चालवावें अशी कामाची आंखणी आहे.

**महाराज छत्रसालः**—योजना उत्तम आहे. मात्र आमच्या मदतीकरितां आपल्या फौजा सारख्या तयार पाहिजेत. कारण महंमद बंगष आमच्यावर सारखा जळतो आहे.

**राजे राणोजीरावः**—महाराज, आपणांस त्याची मुळींच काळजी नको. विजयादशमी होतांच फिरून आमच्या फौजा इकडेच येतील. मारवाडांतील राजकारण अधिक रंगास येईल असें वाटतें. पुढील वर्षीं रावसाहेब किंवा चिमाजीरावही आमच्या स्वारीबरोबर येतील. दिल्लीला शह देण्याची निकड फार असल्यानें आम्हाला तांतडीनें परत यावें लागेल. मदतीबद्दल आपण निःशंक असा. इकडील सर्व भिस्त मात्र आपणांवर आहे. बुंदेलखंडांतील सर्व राजेमहाराजे यांना राजकारणाच्या एका सूत्रांत गुंफून ती विजयमाला येथील आमच्या छत्रपतींनींच संपादन करावी अशी आमची महाराजांच्या चरणांजवळ नम्र विनंति आहे. आपण सर्वजण मिळून त्या महंमद बंगषाला एकदा मक्केची यात्रा घडवूंच घडवूं.

**महाराज छत्रसालः**—शाबास राजे ! तुमची हिंमत पाहून कोणीही आपलें कौतुकच करील. परत येतांना बाजीरावांना मात्र जरूर आणा. पेशव्यांना पाहून आमच्या नेत्रांचें पारणें फिटेल. छत्रपतींचें दर्शन नाहीं तरी त्यांच्या प्रतिनिधींचें दर्शन झालें तरी तेवढाच आनंद होईल !

**राजे राणोजीराव**:—रायांची तब्येतच अशी आहे कीं, त्यांना स्वारीवर आल्यावांचून चैन पडणार नाहीं. त्यांचा स्वभाव व एकंदर गुण आपणास फार आवडतील. त्यांचें वय लहान पण कीर्ति थोर आहे. आपल्या वडिलांच्याबरोबर आमच्या बरोबरीनें त्यांनीं मोहिमांत भाग घेतला होता. ते एका पथकाचे अधिपति होते. रावसाहेब व चिमाजीराव, दोघे बंधु अगदीं रामलक्ष्मणासारखे प्रेमळ आहेत.

**महाराज छत्रसाल**:—असेंच असावें माणसांनीं! बरं राजे, आतां पोषाख उतरा. सैन्य वाटल्यास पुढें जाऊं द्या. आपण दोन दिवसांनीं मागाहून जा. सैन्य थांबलें तर त्यासही थोडीअधिक विश्रांति मिळेल.

**राजे राणोजीराव**:—जाधवराव, मला वाटतें सैन्याला पुढें कूच करावयास सांगावें. आपण निवडक स्वारांसह मागाहून जाऊं.

**पिलाजीराव**:—ठीक आहे. आपली आज्ञा सैन्यास कळवितों व त्याप्रमाणें व्यवस्था करतों. ( जाधवराव मुजरा करून निघून जातात ).

**महाराज छत्रसाल**:—राजे, राजपूतमराठ्यांच्या ऐक्याचा जो प्रयत्न आपण चालविला आहे तो स्तुत्य आहे. तरी पण मला ती आंवळ्याची मोट वाटते आहे. गांठ सुटली कीं पुनः ते विस्कळित होणार. ऐक्य कायम टिकविणारें एखादें रामबाण साधन शोधून काढावयास पाहिजे. सर्वांचा शत्रु जो यवन तो नाहींसा होतांच आपसांत यादवी माजल्यावांचून राहणार नाहीं. राजपूतमराठे आज एक झाले तरी उद्यां ते एकमेकांचीं डोकीं फोडणार नाहींत कशावरून? राजे, या बाबतींत आपण कांहीं विचार केला आहे कां? जगाचा अनुभव आजपर्यंत नेहमीं असाच आहे.

**राजे राणोजीराव**:—राजपूतमराठ्यांत प्रेमव्यवहार वाढून जर रोटीव्यवहार, बेटीव्यवहार होऊं लागले कीं मग दुजाभाव मुळींच राहणार नाहीं. सर्व भेदभाव नष्ट होऊन जें ऐक्य होईल तें वंशपरंपरा चालू राहील. मोंगलांचा अनुभव आपणाजवळ आहेच. म्हणून राजपूतमराठ्यांचें मधु-मीलन रोटी-बेटीव्यवहारानें झालें कीं मोठें सामर्थ्य निर्माण होईल. दोन्ही समाजांतील राजकारणी थोर पुरुषांनीं या प्रश्नाचा विचार करून अशा कार्यास प्रोत्साहन द्यावें व अबाधित टिकणारें संघटन घडवून आणावें. बाकी आमच्यासारख्या तरुणांच्या कल्पना आपल्यासारख्या वृद्ध मंडळीस मानवणार नाहींत हें आम्हास ठाऊक आहे.

**महाराज छत्रसाल**:—ज्याच्या गुरूनें मुसलमान झालेल्या बाजी निंबाळकरास राजकाजाकरितां शुद्ध करून घेतलें, इतकेंच नव्हे तर त्याच्या मुलाला स्वतःची मुलगी

दिली व त्याच्यासारखा हिरा स्वपक्षपाती केला, तो हा छत्रसाल राजपूतमराठ्यांच्या प्रेमव्यवहारांत मागें हटेल ? शक्य नाहीं. आम्हीं म्हणतों कीं मुसलमानांनासुद्धां हिंदु बनवून आत्मसात् करण्यास काय हरकत आहे ? यवनांनीं हिंदु व्हावें व हिंदवी स्वराज्यास मदतगार व्हावें हाच आमचा मुख्य हेतु. आमचा विरोध आहे तो इस्लाम संस्कृतीला! आजवर त्या संस्कृतीनें हिंदु संस्कृतीचा वाटेल तसा छळ केला, पण त्याच इस्लाम संस्कृतीला उदारपणानें पोटांत घेण्यास हिंदु संस्कृति तयार आहे. आमची संस्कृति नेहमीं उदार असतां उलट ही इस्लाम संस्कृति नेहमीं आगळीक करीत असते. त्याची आम्हास भयंकर चीड येते. आमच्या आबासाहेबांनीं सहिष्णुतेची कमाल केली. कुठल्याही मशीदीला किंवा इस्लाम स्त्रीला बेइज्जत केलें नाहीं. त्याप्रमाणें सर्वांनीं वागावें असें आम्हास वाटतें. हा प्रेमव्यवहाराचा प्रश्न लवकर सोडवावा. प्रत्येकानें प्रथम आपणापासूनच सुरुवात करावी. म्हणजे हळुहळु प्रघात पडून कांहीं दिवसांनीं तो सार्वत्रिक होईल. व राजपूतमराठे एकमेकांत मिसळून जातील. राजे, किती धोरणी आहांत तुम्हीं. आजवर कोणीही याप्रमाणें विचार केला नाहीं. राजे, आमची पूर्ण संमति आहे हा प्रश्न सोडविण्यास. आमच्या हांतून होईल ती मदत आपण देऊं.

**राजे राणोजीरावः**—हें ऐकून आम्हाला खरा आनंद होत आहे. समाजाला नुसता हा प्रश्न समजण्यास कित्येक पिढ्या घालवाव्या लागतील समाज नेहमीं आंधळा असतो त्यांतील धुरीण पुढारी हे त्याचे डोळे असतात ! पण ते सनातनी-मदिरा पिवून धुंद झालेलेच आढळून येतात. जे कोणी कर्ते सुधारक असतात त्यांचा हे समाजकंटक छळ करतात. त्यामुळें अशा प्रेमव्यवहारांत नेहमीं विरोध होतो. अशानेंच समाज-सुधारणा पंगु होते ! आज आपणासारखे कर्ते सुधारक आहेत हें पाहून आम्हाला फार आनंद होत आहे. आमची आपणांस अशी नम्र विनंति आहे कीं आपण ह्या राजकारणी प्रश्नास जरूर सहाय्य करा. आपल्या सहवासांत बऱ्याच गुंतागुंतीच्या प्रश्नांवर ज्ञानरूपी प्रकाश पडला. आपली पोख्त बुद्धि आम्हाला नेहमींच मार्गदर्शक होईल यांत शंका नाहीं.

**महाराज छत्रसालः**—राजे, आपल्या इच्छेप्रमाणेंच सर्व घडून येईल असा आमचा आपल्यास आशीर्वाद आहे. बरं चला आतां निवांतपणें विश्रांति ध्या.

**राजे राणोजीरावः**—चलावें महाराज ! ( दोघेही जातात. )

---

# अंक दुसरा.

## प्रवेश तिसरा.

( पन्ना राजधानी--राजवाड्यांतील एक दिवाणखाना, राजकुमारी व उत्तमा पुरुषवेषांत बोलत बसल्या आहेत. )

**राजकुमारीः**—बाई उत्तमा, आपण येथपर्यंत येऊन पोहोंचलों. पण राव केव्हांच निघून गेले. आतां काय करावं हें कांहीं समजत नाहीं.

**उत्तमाः**—सरकार, इथं येऊन निराशा झाली खरी. मला वाटतं इथंच थोडे दिवस थांबून नंतर परत दतियास जावं.

**राजकुमारीः**—निराशा झाली खरी ! पण परत दतियास जाण्यास कांहीं जीव होत नाहीं. बरं इथं राहून चैन तरी कसं पडावं.

**उत्तमाः**—मग आपण परत जाणंच योग्य होय. आतां महाराज येतील त्यांना परवानगी विचारा व परत चला. हे पहा महाराज आलेच.

( महाराज छत्रसाल प्रवेश करतात. त्या दोघी त्यांना प्रणाम करतात ).

**महाराज छत्रसालः**—बाळ, इतक्या घाईनें येणें केलेंत ! येण्याबद्दल पूर्वी कळविलें नाहीं. बरें लवाजमाही बरोबर बराच आणला आहे. कां कुठची लांबची सफर करण्याचा विचार आहे वाटतें ?

**राजकुमारीः**—बाबाजी, मी काय सांगूं ? आपणासारख्या वडिलांजवळ मला एवढं मोकळ्या मनानं बोलतां यावयाचं नाहीं. राजे शिंदेराव इथं आले व लागलीच निघून गेले; दतियाचं राजकारण त्यांनीं नुकतंच संपविलं व तांतडीनं निघून आले. मला वाटलं होतं इथं त्यांची भेट होईल म्हणून ! पण ( दुःखानें ) माझी फार निराशा झाली.

**महाराज छत्रसालः**—दतियाचे महाराज व राजे यांच्यामध्यें तह झाला व लढाई-वांचून प्रकरण मिटलें व तुमच्या राजघराण्याची व त्यांची गाढ मैत्री झाली हे राजांनीं आम्हाला कळविलें. आम्हाला हें ऐकून फार फार आनंद झाला. बाळ, अशाच रीतीनें सर्व राजपूत राजे समजुतीनें वागतील तर राजपूतमराठ्यांचें ऐक्य लवकर होईल. या तहामुळें उत्तम उदाहरण घालून दिलें आहे. त्यामुळें राजपूतमराठ्यांच्या ऐक्याची मुहूर्तमेढ रोंविली गेली आहे. त्यामुळें हिंदवी स्वराज्याचें कार्य लवकर तडीस जाईल. बाळ, राजे चंपतराय, आमचे पूज्य पिताजी, बुंदेलखंड स्वतंत्र करण्याकरितां रात्रं-दिवस खपले. अवरंगजेबानें कांहींतरी सबब काढून त्या मानी नरवीराचा अपमान

केला. महाराष्ट्रांत राजे शहाजींनीं जें कार्य केलें तेंच काम पिताजींनीं बुंदेलखंडांत केलें. बुंदेले राजांत ऐक्य घडवून आणून त्यांनीं त्यांना मोंगलांविरुद्ध सज्ज केलें. पण अवरंगजेब महा कपटी त्यानें आमच्या राजेलोकांत फूट पाडली व पिताजींना मोंगलांशीं एकाकी तोंड द्यावें लागलें. मोंगलांनीं कपटानें पिताजींना जंगलांत गांठलें पण त्यांनीं आपल्या थोड्याशा अनुयायांसह लढतां लढतां धारातीर्थीं शयन केलें. ते स्वर्गीं अमर होऊन राहिले ! आमच्या वयाच्या फक्त चौदाव्या वर्षीं ही घटना घडून आली बाळ, तेव्हांपासून आम्हीही पिताजींचें व्रत घेतलें व आज अनेक वर्षें हें स्वातंत्र्ययुद्ध चालवीत आहोंत. स्वातंत्र्याकरितां लढतां लढतां पिताजी कपटानें घेरले गेले. ह्या गोष्टीची आम्हाला भयंकर चीड आली व मनाला मोठा धक्का बसला. आतां हिंदवीं स्वराज्य स्थापन व्हावें अशी रात्रंदिवस तळमळ लागली आहे. आमच्या डोळयां-देखत दिल्लीच्या तक्तावर आमच्यांतील एखादा हिंदु वीर जेव्हां आरूढ होईल व सर्व हिंदुस्थान खरें खरें हिंदूंचें होईल तेव्हांच आमच्या हृदयाची तळमळ शांत होणार आहे. आपसांतील कलह बंद करून ऐक्य साधन करावयास पाहिजे. यामुळेंच आपल्या तहानें आम्हास फार आनंद झाला.

**उत्तमा**:—महाराज, दतियाचं राजकारण सुव्यवस्थित पार पाडण्याचं सगळं श्रेय आमच्या छोट्या सरकारांनाच आहे. त्यांनींच पुढाकार घेऊन आमच्या महाराजांचं मन वळविलं. या गोष्टीला ते मुळींच तयार नव्हते. ते म्हणत मी जोहार करून मराठ्यांशीं युद्ध करीन, पण खंडणी देऊन त्यांचा गुलाम होणार नाहीं. पण छोटे सरकारांनीं त्यांचं मन वळवून खंडणी देण्यास त्यांना तयार केलं व भावी युद्ध टाळलं. ही सर्व कामगिरी ह्यांनीं चोख बजावली. ह्या बाबतींतच शिंदेरावांची जरूरींत भेट घ्यावयाची होती.

**महाराज छत्रसाल**:—मग कुवरनीं फार मोठी कामगिरी केली असें म्हटलें पाहिजे !

**उत्तमा**:—तसंच, राजे शिंदेराव व सरकार यांची मैत्री फार दृढ झाली आहे. राजे इकडं आल्यावर त्यांना बिलकुल चैन पडेना. शिवाय राजकारणाच्या दृष्टीनं थोडा विचारविनिमय करावयाचा होता. म्हणून आम्ही, महाराज व मातोश्रीसाहेब यांची अनुज्ञा घेऊन इकडं आलों.

**महाराज छत्रसाल**:—राजांनीं कुवरना ओळखलें नाहीं ? आश्चर्य आहे ! त्यांच्यासारखा पुरुष असा फसणार नाहीं. मग हें कसें घडलें ?

**राजकुमारी**:—बाबाजी, ओळखलं नाहीं असं कसं होईल ? इतकंच कीं त्यांनीं ओळखलं असं दाखविलं मात्र नाहीं. मी राजकुमारी आहे, हें कळल्यामुळं त्यांना

अधिकच कौतुक वाटून माझ्याशीं ते फारच प्रेमानं वागले ( लाजते ) इतकंच नव्हे तर बाबांच्याजवळ शिलेदार म्हणून मजबद्दल त्यांनीं मागणीसुद्धां घातली. पण बाबा जुन्या मताचे ! ते कोठून ऐकणार ? रावांनीं मागणी करून पाहिली. पण त्यांत त्यांची निराशा झाली ! तेथून ते तांतडीनं इकडं निघून आले. बाबाजी, मला फार वाईट वाटलं. त्यांची ती निराशा पाहून. मीही अतिशय बेचैन झालें. म्हटलं चार दिवस आपल्याइकडं येऊन जीव रमेल तर पहावं !

**महाराज छत्रसाल**ः—आतां आलें माझ्या सर्व ध्यानांत. बाळ, तुमच्या मनाची स्थिति आम्हाला आतां कळली वडील किंवा मातोश्री यांचा प्रश्न बाजूला ठेवा. पण तुमच्या स्वतःच्या मनाचा कांहीं कायम निश्चय केला आहे काय ? कारण या जन्मोजन्मींच्या गांठी ! तुमचा निश्चय ठाम असावयास पाहिजे. त्याशिवाय आम्हासारख्या वृध्द मंडळीस सल्ला देणें थोडें बिकट जाणार आहे. आपला निश्चय काय आहे हें प्रथम आम्हाला कळूं द्या.

**राजकुमारी**ः—बाबाजी, मी उघड करून काय सांगू ? मला लाज वाटते. इतकं खरं कीं माझ्या हृदयावर आतां माझा ताबा राहिला नाहीं. राजांचं त्यावर पूर्ण वर्चस्व आहे. आम्ही लहान मुलींनीं यापेक्षां अधिक काय सांगावें ?

**महाराज छत्रसाल**ः—समजलों. बाळ, तुमच्या इच्छेस आमची पूर्ण संमति व सहानुभूति आहे. आपले वडील व मातोश्री विरुद्ध असतील तर त्यांनाही आम्हीं समजावूं. आतां आपण बेफिकीर असा. विजयादशमी होतांच राजे इकडेच येणार आहेत. ते आले कीं टाकूं योग जमवून. तोंपर्यंत तुम्ही इथं रहा किंवा थोडे दिवस इथं राहून बरें वाटल्यावर नंतर दतियास जा. आमच्या मतें आतां आपण राजांच्या शोधांत त्यांच्यामागें फिरूं नये. कारण त्यापासून फायदा न होतां उगीच हैराण मात्र व्हाल. राजे अगदीं तांतडीच्या घाडदौडीनें सातार्‍यास गेले आहेत. वाटेंत अगदीं जरूरीपुरते मुक्काम ते करणार आहेत. म्हणून त्यांच्या घोडदौडीपुढें तुमची धडपड व्यर्थ होणार आहे.

**राजकुमारी**ः—माझ्या समजुतीनं त्यांचा उज्जैनला मुक्काम खात्रीनं अधिक होईल. कारण राजधानींतील हजारों कामं तशीच सोडून ते सहसा एकदम दक्षिणेंत जाणार नाहींत. तेथं मुक्काम करावा लागेल, असं ते आमच्या भेटीच्यावेळीं म्हणाले होते. त्यांच्या बेतांत फरक होण्याचं कारण नाहीं म्हणून उज्जैनला आमची गांठ पडेल असा मला भरंवसा वाटतो. उज्जैनपर्यंत जाण्याची अनुज्ञा आपण मला द्यावी.

आमचा लवाजमा आहे तेवढा बरोबर असला तरी चालेल. अधिकाची कांहीं आवश्यकता नाहीं.

**महाराज छत्रसालः**—खरें म्हटलें तर तुमची भेट होणें शक्य नाहीं. सहासात महिन्यांचा प्रश्न. ते येथें परत आले कीं येथेंच आपला विवाह मोठ्या थाटानें उरकून घेऊं ! आतां तुम्ही प्रवासाच्या भानगडींत पडूं नये. कारण बुंदेलखंडाबाहेरील प्रवास अत्यंत धोक्याचा आहे. महंमद बंगषाचा मुलगा पीरखान हा माळवा व बुंदेलखंड ह्यांच्या दरम्यान भोपाळजवळ राहून बुंदेले लोकांस सतावीत आहे. विंध्य पर्वतासारखे डोंगर व भोंवतालचीं गहन अरण्येंही फार बिकट आहेत. सिंध, बेतवा, नर्मदा, पार्वती, कालीसिंध, क्षिप्रा वगैरेसारख्या मोठमोठ्या नद्या ओलांडाव्या लागतात. हिंस्र पशूंचा त्रास. भिल्ल, गोंड व इतर रानटी लोकांची भीतीही कांहीं कमी नाहीं. अशा स्थितींत आपण माळव्याकडे जाण्याचें साहस करूं नका. आम्हां म्हाताऱ्या माणसांचें थोडें ऐका.

**राजकुमारीः**—बाबाजी, आपलं म्हणणं रास्त आहे. पण अगदीं इतकं भिण्यासारखं त्यांत काय आहे ? आम्हीं राजपूत स्त्रियांनीं अशा शंकाकुशंका मनांत बाळगून भिण्याचं कारण मुळींच नाहीं. थोडं सावधपणानं व चपळाईनं प्रवास करीत जाऊं म्हणजे झालं ! भावी संकटाच्या नुसत्या कल्पनांनींच आम्हीं भ्यावं असं आपणांस वाटतं कां ?

**महाराज छत्रसालः**—बाळ, सर्व गोष्टी बाजूला राहतील व विनाकारण संकट ओढवून घ्याल. माळव्यांत जाण्याचा छंद बिलकुल सोडावा असें आम्हाला वाटतें.

**राजकुमारीः**—आमच्या अंगीं भित्रेपणा उत्पन्न व्हावा असं कां वाटतं आपल्याला ? आम्ही बायकांनीं पराक्रमी, धाडसी, व कीर्तिमान् व्हावं असं वाटत नाहीं कां ? आपण वडील आहांत, कराल ती आज्ञा आम्हीं पाळलीच पाहिजे.

**महाराज छत्रसालः**—तसें नव्हें बाळ; तुम्हाला भीति दाखविण्याचा आमचा हेतु नाहीं. सर्व संकटांची कल्पना आपणांस पूर्णपणें यावी म्हणून सर्व परिस्थिति आपणापुढें मांडली. आतां आपली जाण्याचीच इच्छा असली तर आम्ही विरोध करणार नाहीं. मात्र बरोबर आणखी सैन्य घेऊन जाणें बरें. स्त्रियांची प्रवासाची भीति दूर झालेली चांगली. बरें, जाणार असाल तर आमच्या अनुमतीचें एक पत्र बरोबर घेऊन जा. त्याची आपणांस योग्य वेळीं मदत होईल. शिवाय येथील कांहीं निवडक सैन्य उज्जैनपर्यंत न्या.

**उत्तमाः**—महाराजांनीं तयारी केल्यावर कसलीं संकटं येणार आहेत ? शिवाय प्रसंगीं आमच्या तरवारींवर आमचा भरंवसा आहेच !

**राजकुमारीः**—बाबाजी, लढवय्या स्त्रियांनीं संकटाला बिचकूं नये. आपलं अनुमतीपत्र व थोडं निवडक सैन्य आमच्याबरोबर द्या.

**महाराज छत्रसालः**—ठीक आहे आतां तुम्ही विश्रांति ध्या. उद्यां पहाटेस आम्ही तुमची रवानगी करतों. काळजी करूं नका. आम्ही तुमची सर्व व्यवस्था नीट करून पाठवूं. तुम्ही थकला असाल. विश्रांति ध्या. आम्ही जातों. ( महाराज छत्रसाल जातात. दोघी उठून प्रणाम करतात. )

**राजकुमारीः**—( उत्तमेस ) महाराजांनीं तर परवानगी दिली. आतां पुढं कसं ? येथून पुढं पाऊल टाकण्याच्या दृष्टीनं मन जरा कच खात आहे. उज्जैनला जाणं म्हणजे बिकट साहसच आहे. तिकडंही युद्ध चालू आहेच. बाकी निश्चय झाला तो कायम ! जसं येथंपर्यंत आलों तसंच एकवार उज्जैनपर्यंत जाऊं या.

**उत्तमाः**—ठीक आहे. जशी सरकारांची इच्छा.

**राजकुमारीः**—उत्तमा, हृदयाची कातरता व उत्सुकता अधिक वाढल्यानं मन थोडं उदास होऊं लागलं आहे. तें औदासिन्य दूर करण्याकरितां एखादं सुंदर गाणं म्हण पाहूं.

**उत्तमाः**—म्हणतें हं सरकार.

**पद ४**

( चाल—पति की पूजा करूं दिन-राती । —संतसखू )

चल जाऊं ग प्रिय-मीलनासी । आतुर मन हें करूं भक्तीसी ।
विनती हीचि प्रभु-चरणासी ॥
सर्व संकटें टाकुनी मार्गे । अनुसरावें प्रिया अनुरागें ।
सखि सद्भावें प्रेमा जागें ॥ ४ ॥

**राजकुमारीः**—काय खोडकर आहेस ग ? माझ्याच मनाचं चित्र रेखाटलंस कीं अगदीं ! कांहींतरी निराळ्या भावाचं गाणं म्हणण्याऐवजीं तूं मनाची अधिक उत्सुकता वाढविणारं गाणं म्हटलंस हें शोभतं कां तुला ?

**उत्तमाः**—माफ करा सरकार ! आपणाला खिजविण्याचा माझा हेतु नव्हता. मला वाटलं या भावांत आपल्याला मौज वाटेल. तुम्ही एखादं मीराबाईचं गीत म्हणाना ! गोपाळकृष्णाच्या भक्तीनं वेडावलेल्या मीराबाईनीं भक्तीचीं कवनं गाईलीं तर आमच्या छोट्या सरकारांनीं राजांच्या प्रेमानं वेडावून जाऊन तशींच भक्तिभावाचीं गाणीं म्हटलीं तर त्यांत काय वावगं आहे ? हं म्हणाच तर एक.

**राजकुमारी**:— बरं बाई, तुझ्या इच्छेप्रमाणं कां होईना. ऐक तर.

### पद ५.

( भजन—मीराबाई ).

मोरी गलियन में आवोजी घनश्याम ॥ मोरी गलियन में ॥ टेक ॥
पिछवाडे आये हला दीजो ललित सखी है न्हारो नाम ॥
मोरी गलियन पैयां परत हूं विनय करत हूं मतकर मान गुमान ॥ मोरी गलियन में ॥ १ ॥
मीरा के प्रभु गिरधर नागर तव चरनन में ध्यान ।
मोरी गलियन में आवोजी घनश्याम ॥ २ ॥

**उत्तमा**:— वा सरकार ! किती सुंदर भावयुक्त गाणं आहे हें ! श्रीकृष्ण भगवान् जसे मीराबाईच्या भक्तीला पावले व प्रत्यक्ष दर्शनानं वृंदावनीं त्या साध्वीला पावन केलं; तसेच राजेही आमच्या या छोट्या मीराबाईशीं विवाह करून उज्जैनला खास पावन करून घेतील !

**राजकुमारी**: – चल पुरे झाली थट्टा ! उत्तमा, खरंच राजांची भेट उज्जैनला होईल कां ? माझी उत्कंठा दिवसेंदिवस फारच वाढत आहे. आतां विश्रांति घेऊं या. लागलीच उद्यांच्या तयारीस लागलं पाहिजे.

**उत्तमा**:— सरकार, राजांची भेट होईल व सर्व मनाप्रमाणं घडून येईल. चलावं सरकार.

( दोघी जातात. )

## अंक दुसरा.

### प्रवेश चवथा.

( विंध्य पर्वतांतील गहन अरण्य. भोपाळजवळील प्रदेश–शिहूर पुरुषवेषांत राजकुमारी व उत्तमा रस्ता चुकून इकडे तिकडे फिरत आहेत. )

**राजकुमारी**:—उत्तमा बाबाजी म्हणत होते तीच वेळ आली ना ? मोंगल सरदारानं आपल्या लहानशा सैन्याची दाणादाण करून जंगलांत चोहोंकडं पांगापांग करून टाकली. आपलाही तो पाठलाग करीत आहे. दाट अरण्यामुळं थोडा वेळ आपण त्यास झुकाडी दिली. पण आतां पुढच्या संकटास कसं तोंड द्यावयाचं ?

**उत्तमा**:—सरकार, आपण फारच सावधगिरीनं वागलं पाहिजे. प्रसंग फारच बिकट आहे. प्रथम त्या चांडाळ यवनाच्या तडाख्यांतून सहीसलामत सुटूं नंतर कोणीतरी वाटाड्या पाहून उज्जैनच्या मार्गास लागूं. पळालेले लोक

पुनः येतील व वाटेंत सर्वांच्या गांठी पडतील, कसं तरी या दुष्टाला चुकवून या भुलभुलाई जंगलांतून बाहेर पडूं या.

**राजकुमारीः**—बाई, असं झालं तर ठीक होईल. प्रथम हें अरण्य व पर्वत ओलांडून जाऊं या. मग पाहूं काय करतां येईल तें. किती भयंकर संकटांत आपण पडलों आहोंत. माझा धीर तर अगदीं खचूं लागला आहे. करावयास गेलों काय आणि झालं भलतंच !

**उत्तमाः**—सरकार, आपण धीर सोडूं नका. ईश्वर याही संकटांतून आपणास सोडवील. चिंता करूं नका. चटकन् येथून लपतछपत जाऊन निसटूं या. आपलीं हत्यारं सज्ज ठेवून लक्ष देऊन पुढं चला. सरकार, माणसांची चाहूल लागत आहे. कांहीं गडबड न करतां सावधगिरीनं चला.

**राजकुमारीः**—उत्तमा ! होय ग होय. माणसांचीच चाहूल. थोडं कुजबुजणंही ऐकूं येत आहे. सावध हं ! तरवार उपसून चल. आपणांस फिरून दोन हात करावे लागणार ! उत्तमे, यवनच ते. (पडद्यांत 'दीन दीन' असा शब्द होतो.) ऐकलंस तःच यवन ! आतां काय करावं ? अगदीं इकडंच अंगांवर चालून येत आहे. सैनिकही बरेच दिसतात. आपला निभाव कसा लागेल बरं ?

**उत्तमाः**—एक युक्ति करूं या. मी या दिशेनं जाऊन खूप जोरानं ओरडत धांवत सुटते. तुम्ही इकडं मागच्या मागं निसटून जा. ते सर्व माझ्यामागं धांवत येतील व तुम्हास निसटून जाण्यास संधी मिळेल. हं व्हा मागं आणि झाडींत चटकन् नाहींशा व्हा. मीही ओरडून चटकन् पुढील झाडींत लपून जातें. ते निघून गेल्यावर मी बाहेर पडून तुम्हाला शोधीत येईन. हं जा लवकर, निसटा कशा तरी.

**राजकुमारीः**—हं चूप. असं वेड्यासारखं करावयाचं नाहीं. मी एकटी तुला शत्रूच्या दाढेंत लोटून, सुटून जाऊं म्हणतेस ? वेडी कुठली. अशानं कां संकट दूर होणार आहे ! मला कृतघ्न व्हावयास सांगतेस काय ? फार शहाणी आहेस कीं तूं ! माझ्या जीवाभावाच्या मैत्रिणीस आगींत ढकलून मी स्वतःला वांचवूं म्हणतेस ? कसली तुझी ही कुकल्पना ! जें काय व्हावयाचं असेल तें होईल. दोघीही लढून मरूं, पण एकमेकींपासून प्राण आहे तोंपर्यंत अलग व्हावयाचं नाहीं. उत्तमे, तयार हो. आपण राजपूत वीरांगना आहोंत. लढून मरावयाचं, पळून जावयाचं नाहीं, समजलीस !

**उत्तमाः**—सरकार, मी हात जोडतें; पाया पडतें; आपण चटकन् झाडींत नाहींशा व्हा. त्याशिवाय सुटका होणार नाहीं. ही वेळ भयंकर आहे. गनीमीकावा लढविल्या-

शिवाय भागणार नाहीं. लढाईत आपणा दोघींचा इतक्या लोकांसमोर निभाव लागणार नाहीं. सरकार घाई करा. निघून जा. जा लवकर. ते जवळ येऊं लागले. माझी काळजी आपण करूं नका ! मी थोड्या वेळांत आपणांस येऊन भेटतें. त्यांना झुकांडी द्यावयाची आहे.

**राजकुमारीः**— अशी गडबडूं नकोस, शांत रहा. असा वेडेपणा करून फायदा नाहीं. आतां फाटाफूट करावयाची नाहीं. धैर्यानं सर्व संकट पार करावयाचं आहे. जेथपावेतों झुंकाडी देतां येईल तोंपर्यंत देऊं या. समोरासमोर गांठ पडलीच तरी लढून मरूं किंवा मारूं. चल ये अशी माझ्या मागून. हं अगदीं सावधपणानं व लढाईच्या तयारीनं.

**उत्तमाः**—चला सरकार. तुम्ही नाहींच माझं ऐकणार ! आपलं प्रसंगावधान फार मोटं आहे. मी आपली अल्पबुद्धीची. आपण कराल तें योग्यच असणार ! ( दोघी लपतछपत पडद्यांत निघून जातात. लागलीच दुसऱ्या बाजूनें मोंगल सरदार पीरखान व बहाद्दर तीनचार साथीदारांसह दीन दीन करीत येतात. )

**पीरखानः**—बहाद्दर, त्या राजपूत सरदारांस इकडे झाडींत शिरतांना पाहिलेंस ना ? थोडें काळजीपूर्वक धुंडलें तर शिकार हातची जाणार नाहीं.

**बहाद्दरः**— हां सरदारसाहेब, ते आले तर इकडेच, पण दिसत मात्र नाहींत. ( जमीनीकडे पहात ) पाहिलेंत खानसाहेब, ही माणसांची ताजीं पावलें उमटलेलीं दिसतात. आतां हा भाग सोडावयाचा नाहीं. या माझ्यामागें त्यांना आतां हुडकून काढतों पहा.

**पीरखानः**—तू नांवाप्रमाणें बहाद्दर आहेस खरा. या वेळीं तूं फार हुशारी दाखविलीस ! दया बहाद्दर किंवा गिरिधर बहाद्दर यांनाही तूं पाठीमागें टाकलेंस. चल गड्या, असाच माग काढीत जाऊं या.

**बहाद्दरः**—खांसाहेब जरा हुशारीनें चलाः कुठें लपले असल्यास घात होईल. अरे हे झाडींत कोण आहेत ? माणसेंच दिसतात. खांसाहेब, तेच ते राजपूत सरदार ! हरामखोर या असे बाहेर ! आतां कुठें जाल ! काफर कुठचे ! खानसाहेब आतां जाऊं देऊं नका यांना. शिपाई, पकडा यांना !

( राजकुमारी व उत्तमा तरवारी सरसावून पडद्याबाहेर येतात. )

**राजकुमारीः**—हां खबरदार, शिवीगाळ करशील तर जीभ तळापासून कांपली जाईल. हरामखोर, काफर, अशी शिवीगाळ कोणाला करतोस ? शिवीगाळ करायला लाज नाहीं वाटत ? चांगला हिंदु दिसतो आहेस कीं ! मग यवनासारखी मस्ती तुला कां

आली आहे ? हिंमत असेल तर एक एक या; दोन हात होऊं द्या ! उगीच वल्गना काय करतां ? तोंडाची वाफ कां दवडतां ?

**पीरखान**:—अरे अल्ला ! आवाज किती गोड आला ! रूप किती सुंदर आहे ! लडका जरा तिखट दिसतो. हिंमत तर मोठी दाखवतो. ढंग तर जनानी दिसतात. अरे तूं जनानी कसा ? लढाईच्या गप्पा मारणें सोपें आहे. तुझ्यासारख्या जनानी पोरास लढाई तरी करतां येईल कां ? तोंडावर थोडीसुद्धां मिशी नाहीं !

**राजकुमारी**:—(आवेशानें) तोंडानं बडबड करणारे आम्ही नाहीं, खांसाहेब आहेत ! आम्ही वाटसरू आपल्या मार्गानं जात असतां विनाकारण आमच्यावर तुम्ही हल्ला केला व आमच्या लवाजम्याची पांगापांग केलीत. आम्ही आपलें कसे तरी वाट काढीत असतां फिरून तुम्ही आमच्या वाटेला जात आहांत. निष्कारण आमच्यासारख्यांना त्रास देण्यांत तुम्हां यवनांना काय मौज वाटते ? सोडा आमचा रस्ता. आम्हाला आमच्या मार्गानं जाऊं द्या.

**पीरखान**:—ओ हो ! किती गोड गोड वाणी ही ! किती सुंदर मुखडा ! मी तर गार झालों अगदीं ! राजपूत वीरा, असें करा, तुम्ही तरवार म्यान करा. आमच्याबरोबर चला. आम्ही तुम्हाला नोकर करूं. आपल्यासारखे [illegible] आम्ही तुम्हाला चांगली नोकरी देऊं. आमचे पिताजी आपल्यावर मोठी मेहेरबानी ठेवतील ! चला आमच्याबरोबर, आतां लढाईचें नांव काढूं नका.

**उत्तमा**:—सरदारसाहेब, आम्ही प्रवासी. तुमचा कोणताही अपराध आम्ही केला नाहीं. मग आम्हाला कां आडवतां ? व्हा बाजूला !

**पीरखान**:—ओ हो ! आपलाही जनानी आवाज. काय गोष्ट आहे ? आपण दोघेहीं पुरुष असून जनानी ढंग कसे ? इतके खूपसूरत पुरुष मी कधींच पाहिले नाहींत. असे लडके आम्ही जरूर पाळतों. तूं ही तरवार म्यान कर. खुशीनें दोघेही आमच्या स्वाधीन व्हा. नाहींतर फुकट प्राणास मुकाल !

**बहादर**:—खांसाहेब, हें गौडबंगाल आहे ! मुलगे सुंदर आहेत. म्हणून त्यांचा असा अपमान करूं नका. ते राजपूत आहेत. त्यांना सरदारी किंवा मनसबदारी देण्याच्या लायकीचे दिसतात.

**राजकुमारी**:—तुम्ही हिंदु दिसतां. आम्ही प्रवासी असून उज्जैनला जाणारे यात्रेकरू आहोत. तुम्ही सज्जन दिसतां ! खांसाहेबांना सांगून आम्हाला आमच्या मार्गानं जाऊं द्या. आम्ही आपले फार ऋणी होऊं. ईश्वर आपलं नेहमीं कल्याण करील !




राजकुमारी.—( चिडून ) काय म्हणालात ? राजपूत स्त्रिया तुमची दौलत ? वाटेल तशी लयलूट करावी त्यांची, असें वाटतें कां तुम्हांला ? पण ध्यानांत ठेवा ही दौलत हातीं येण्यापूर्वीच कबरीचा रस्ता धरावा लागेल !

**पीरखान**:—आतां सुटकेची गोष्ट सोडा. तुम्ही जनानी आहां, यावरून मला शंका येते कीं तुम्ही स्त्रिया आहांत. प्रवासी-यात्रेकरू नसून राजपूत स्त्रिया आहांत. बोला तुम्ही कोण आहांत ? स्त्रिया असाल तर फारच उत्तम. राजपूत स्त्रिया म्हणजे आमची दौलत ! ती आम्ही केव्हांही गमावणार नाहीं. बहाद्दर हिंदु म्हणून तुमची तरफदारी करणार नाहीं. तो बाटगा आहे, व त्यासही मोंगली वळण आहे. समजलात ! बोला, बऱ्या बोलानें आमच्या स्वाधीन होतां कीं नाहीं ?

**राजकुमारी**:—(रागानें) नाहीं. आम्ही स्त्रिया आहोंत कीं पुरुष आहोंत याचं उत्तर या आमच्या तरवारीच देतील. वाट सोडा नाहींतर एक एक पुढं या. आम्ही लढून मरून जाऊं पण तुमचे गुलाम होणार नाहीं. (चिडून) काय म्हणालात ? राजपूत स्त्रिया तुमची दौलत ! वाटेल तशी लयलूट करावी त्यांची, असें वाटतें कां तुम्हांला ? पण ध्यानांत ठेवा, ही दौलत हातीं येण्यापूर्वीच कबरीचा रस्ता धरावा लागेल !

**बहाद्दर**:—खानसाहेब, हे यात्रेकरू राजपूत आहेत. कोणीही असोत, ते राजकीय भानगडींतील नाहींत. आपणाला जी खबर लागली, तीं माणसें हीं नव्हत. दतियाची बुंदेली राजकन्या इतक्या थोड्या लोकानिशीं जाणें शक्य नाहीं. ज्या संशयानें आपण छापा घातला तो संशय व्यर्थ आहे. राजा छत्रसालाकडची माणसं हीं नव्हत. जाऊं द्या त्यांना. तीं माणसें मागाहून येत असावींत. आपण वाटेवर नजर ठेवूं. तीं माणसें मिळतांच कैद करूं. जाऊं द्या ह्यांना.

**उत्तमा**:—ठीक बोलतात सरदारसाहेब ! आम्हीं फक्त यात्रेकरू आहोंत. राजपूत आहोंत. बुंदेलखंडाशीं आमचा जो संबंध लावतां ते आम्ही नाहीं. जाऊं द्या आम्हाला ! आपण फार थोर सरदार आहांत. गरीब यात्रेकरूंना कां त्रास देतां ?

**पीरखान**:—तुम्ही राजपूत आहांत ? पण मर्द आहांत कां औरत ? पुरुष तर खास नाहीं. आमच्या जासूदांची बातमी बरोबर आहे. (राजकुमारीकडे न्याहाळून पाहून) ही सुंदर आकृति पाहून दतियाच्या राजकन्येचीच कल्पना मला होत आहे. तिच्या सौंदर्याची ख्याति ऐकली आहे. तिला आपल्या जनान्याची मालकीण करण्याचा आमचा हेतु आहे. राजकन्या उज्जैनला जात असल्याचें ऐकलें आहे ! बोला तुम्ही दतियाहून आला किंवा कसें ? स्त्रिया तर खास आहांतच आतां तुम्हांपैकीं राजकन्या कोण हें सांगा म्हणजे झालें. जरी तुम्ही राजकन्या नसला, तरी राजपूत स्त्रिया आहांत. तेव्हां आमच्या जनान्याची शोभा तुम्ही खास वाढवाल. हं, हा मोंगल सरदार पीरखान तुम्हाला आज्ञा करतो कीं तरवारी म्यान करा व आमच्या मागें या. समजलात !

**राजकुमारीः**—(स्वगत) अरेरे घात झाला. हा दुष्ट आतां कांहीं सोडणार नाहीं. हा आमचा कट्टा दुष्मन, आतां लढून मरण्यावांचून गत्यंतर नाहीं ! (उघड) सरदार-साहेब, वटवट बंद करा. राजपुतांचा अपमान वल्गनांनीं करीत आहांत. तो आम्ही सहन करणार नाहीं. आमची जीवंत शरीरं तुमच्या हातीं लागण्याच्या ऐवजीं राई राई एवढे तुकडे आपल्या हातीं लागतील ! मित्रा, बोल हरहर महादेव ! श्री एकलिंगजी की जय ! लढून मरावयाचें हें ध्यानांत ठेव !

**बहाद्दरः**—( स्त्रिया आहेत हें ओळखून ) खांसाहेब, हात आटोपा ! जाऊं द्या ह्यांना ! राजपूत स्त्रियांचा अपमान करून आपण आमच्या सारख्यांचींसुद्धां मनें दुखवीत आहांत, सर्व राजपूत स्त्रिया तुमच्या जनान्यांत जावयास पाहिजेत काय ? व्हा बाजूस. वाट सोडा. जाऊं द्या त्यांना !

**पीरखानः**—हां, हरामखोर ! हिंदूच ना तूं ! हिंदूंच्याच बाजूनें बोलणार ग ! सर्व काफर सारखेच ! मी आपली शिकार सोडणार नाहीं. चल हो बाजूस. मोठ्या मानापमानाच्या गोष्टी करतो आहेस. जन्माचा गुलाम व गोष्टी सांगतो आहे मिजाशीच्या. दोन तुकडे आमच्या पदरीं तोडावयाचे व आम्हीं सांगू तें काम करावयाचें. कुत्रा तूं, गोष्टी सांगतो आहेस सरदारकीच्या ! राजद्रोही ! निमकहराम !

**बहाद्दरः**—तोंड आवर. मी नोकरीस असलों तरी माझें हिंदुत्व किंवा मानापमान गहाण ठेवलेला नाहीं ! तुला लढून मरावयाचें असलें तर मर. मी ह्यांच्या अंगास हात लावूं देणार नाहीं. उलट त्यांना मदतच करीन. चला राजपूत वीरानों करा या यवनाशीं दोन हात ! आजपासून यवनांच्या नोकरीवर पाणी सोडलें आहे. मला पश्चात्ताप होत आहे. झालें तेवढें पाप बस्स ! यापुढें कुत्रा न राहतां सिंह व्हावयाचें ! स्वातंत्र्याकरितां बलिदान करावयाचें ! चल ये हरामखोर कर दोन हात ! आतां दोघांच्या ऐवजीं तिघे आहोंत !

**राजकुमारीः**—ईश्वर तुमचं भलं करो. बोला हर हर महादेव !

**उत्तमाः**—हर हर महादेव !

**बहाद्दरः**—हर हर महादेव !

**पीरखानः**—(घाबरून) बहाद्दर, थांब ! काय करतो आहेस याचा विचार आहे कां तुला ? आपल्या मालकाच्या विरुद्ध तूं जात आहेस. आजवर ज्यांचें मीठ खाल्लेस त्यांचा शत्रु होत आहेस. अशा ऐन वेळीं तूं मला दगा करूं नकोस. तुला ही गोष्ट आवडत नसेल तर चालता हो येथून पण माझ्या मार्गांत विघ्न आणूं नको. याचा




गुरुदेव.—हां, हां! चांडाळ, हात आवर, बेशुद्ध वीरावर असा वार करतोस काय?

परिणाम ठीक होणार नाहीं, मी या स्त्रियांशीं लढून ह्यांना कैद करून नेणार ! समजलास !

**बहाद्दरः**—स्त्रियांशीं युद्ध करणें नामर्दाचें काम आहे व तें मी करणार नाहीं. तूं हिंदु म्हणून माझा जो अपमान केलास, काफर-निमकहराम म्हणून मला ज्या शिव्या दिल्यास, राजपूत स्त्रियांचा जो अपमान केलास, मला गुलाम म्हणून जीं शेलकीं विशेषणें लावलीस, कुत्रा म्हणून जो दोन तुकड्यांचा उल्लेख केलास, त्या सर्व गोष्टींनीं माझ्या आजपर्यंतच्या इमानदारीच्या नोकरीचें बक्षिस मला मिळालें आहे ! तूं माझे चांगले डोळे उघडले आहेस ! आजवर झालें तें झालें, आतां तरी देशद्रोहाचें पाप करावयाचें नाहीं, हाच निश्चय !

**पीरखानः**—अरे हरामखोर, तूं चांगला दगा दिलास ! चला शिपाई हो ! करा दोन हात व या तिन्ही काफरांना करा गिरफदार ! बोलो दीन दीन दीन. शिपायांनों लढा ! (लढूं लागतात.)

**बहाद्दरः**—चल ये. हर हर महादेव. ( सर्व लढत लढत पडद्यांत जातात. )

---

## अंक दुसरा.

### प्रवेश पांचवा.

( " थांबा हो थांबा " अशी उत्तमा पडद्यांत ओरडते. " जवळ आसपास कोणी वीर असल्यास त्यानं जरूर मदतीस यावं. आम्ही संकटांत आहोंत ". असा पडद्यांत उत्तमेचा आवाज ऐकूं येतो. पीरखान जखमी होऊन बेशुद्ध पडतो. हळुहळु एक एक शिपाई लढून बेशुद्ध पडतो. बहाद्दर जखमी होऊन बेशुद्ध पडतो. राजकुमारी पीरखानाशेजारीच बेशुद्ध पडते व उत्तमा बहाद्दरजवळ बेशुद्ध पडते. पडदा उघडतो तेव्हां पीरखान खंजीर उपसून सरकत सरकत राजकुमारीजवळ जातो. तो खंजीर खुपसणार इतक्यांत गुरुदेव व शिष्यवर धांवत बाहेर येतात ).

**गुरुदेवः**—हां, हां ! चांडाल हात आवर, बेशुद्ध वीरांवर असा वार करतोस काय ! ( धांवत जाऊन हात धरतो व खंजीर काढून घेऊन त्यास बाजूला पाडतो. तो बेशुद्ध होतो. ) शिष्यवर, कमंडलुतील पाण्यानें या बेशुद्ध मंडळीस शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न कर. ( राजकुमारीच्या डोळ्यांस पाणी लावून वारा घालून सावध करीत. )

**राजकुमारीः**—( सावध होऊन ) उत्तमे, कुठं आहेस तूं ?

**उत्तमा** —( सावध होऊन ) सरकार, इकडे आहे मी.

**राजकुमारीः**—(उठून) अगबाई हे कोण ! गुरुदेव, प्रणाम करतें मी तुम्हाला. उत्तमे, जखमी झालीस वाटतं. ये, गुरुदेवांना प्रणाम कर. गुरुदेव, घायाळ बंधूंना पट्टया वगैरे बांधून त्यांची शुश्रषा करा.

**गुरुदेवः**—बाळ, ठीक आहे. शिष्यवर, तुम्ही या बाकीच्या मंडळींची व्यवस्था करा, तोंपर्यंत आम्ही या दोघा वीरांना घेऊन मठाकडे जातों. तुम्ही यांची नीट व्यवस्था करून वाटेला लावा. हे यवन आहेत हें ध्यानांत ठेवून सावधगिरीनें वागा. बेसावध आहेत तोंपर्यंत येथून निसटून सुरक्षित ठिकाणीं निघून जाणें योग्य आहे. क्षणभरही वेळ गमावतां उपयोगी नाहीं.

**राजकुमारीः**—गुरुदेव आपले उपकार थोर आहेत. आपण म्हणतां तें खरं. उत्तमे चल. गुरुदेवांच्या कृपेनंच सर्व संकटांतून आपण निभावून जाऊं ! आतां इथं थांबणं योग्य नाहीं.

**उत्तमाः**—चलावं सरकार, चलावं गुरुमहाराज.

(गुरुदेव, राजकुमारी व उत्तमा जातात. शिष्यवर पाणी शिंपडून प्रत्येकास सावध करतो.)

**पीरखानः**—( सावध होऊन ) अरे कोण हा गोसावडा. ह्यानें आमची शिकार पळविली वाटतें. कांरे, बोल कुठें आहेत त्या राजपूत बाया ?

**शिष्यवरः**—( भीत ) इथं बायातर कोणीच नव्हत्या. दोन राजपूत तरुण मात्र होते, ते तर केव्हांच निघून गेले. तुम्ही घायाळ होऊन पडलेले पाहून मी तुम्हांस सावध केलें. आपला अपराध झाला कां ?

**पीरखानः**—(त्वेषानें) कांरे गोसावड्या, उपकारांची ढाल पुढें करून आम्हांला फजित करतोस काय ? अरे काफर तूं ! असल्या मामूली उपकारानें मोंगल सरदार हस्तगत होत नाहीं; किंवा त्यांच्या पोटांत दयाही उत्पन्न होत नाहीं; समजलास ! पाज पाणी त्या सर्वांना व कर सावध ! नाहींतर मी तुला आतां मारतों बघ. (उभा राहूं लागतो पण जखम असल्यानें तसाच विव्हळत पडतो. शिष्यवर बहादूरास सावध करतो. )

**बहादूरः**—( सावध होऊन बसून ) शाबास वीरांनों. तुमचा पराक्रम पाहून माझे डोळे निवले. माझ्यासारख्याची तरवार मोंगलांच्या नोकरींत अर्पण केल्यापासून तिच्यांतलें सगळें तेज मावळलें ! गुरुमहाराज, कुठें गेले ते राजपूत वीर ? धन्य आहे त्यांच्या पराक्रमाची ! त्यांनीं यवनांना चांगलेंच लोळवलें ! त्यांच्या तरवारीचें पाणी स्वराज्यांत असल्यामुळें अधिक तिखट दिसलें.

**शिष्यवरः**—ते बराच वेळ झाला निघून गेले. आतां असें करा, आपण हें पाणी घ्या व बाकीच्या शिपायांना सावध करा. आपले हे यवन मित्र फार दुष्ट दिसतात. त्यांची मला भीति वाटते. तुम्ही चांगले सावध झाला असून फार जखमीही नाहीं. तुम्ही हिंदु आहांत असें दिसतें. तुमचें अंतःकरण दयाळू दिसत आहे. बरें हे लोक तुमचेच आहेत, तेव्हां तुम्हीच आतां सर्व व्यवस्था करा !

**बहादूरः**—ठीक आहे. गुरुमहाराज, तुम्ही जा. आम्ही यवनांची गुलामगिरी पतकरली आहे, ती थोडे दिवस तरी पार पाडलीच पाहिजे. यवन दुष्ट आहेत, ते तुम्हांला उगीच सतावतील. तुम्ही आपले जा कसे !

**पीरखानः**—गोसावड्या थांब. तूं जाऊं नकोस. त्या दोन बायांचा पत्ता सांग. त्या जिथें असतील तिथें मला घेऊन चल. बहादूर त्यास जाऊं देऊं नको. नाहींतर त्या परी आपणांस सांपडणार नाहींत ! ओ हो ! काय तें सौंदर्य ! वाहवा रे मापुक ! किती पराक्रमी होते ते ! धन्य आहे त्यांची. अशा परी जनान्यांत ठेविल्याच पाहिजेत. तरच मौज लुटावयास मिळेल. (विव्हळत) अरे अल्ला ! जखमा फार जबर आहेत. रक्त फार वाहून जात आहे यार बहादूर जरा मदत तर कर.

**बहादूरः**—खांसाहेब, मी स्वतःच फार जखमी आहे. ( एकीकडे ) गुरुमहाराज, जा आपण. बेटा मरतो आहे तरी त्या मुलांना पकडण्याची इच्छा आहेच. ( शिष्यवर निघून जातो ). खांसाहेब, मी नको नको म्हणतां हा प्रसंग तुम्ही सर्वांवर ओढवून घेतलात, त्या बिचाऱ्या वाटसरूंना जाऊं दिलें असतें तर कशाला असा बिकट प्रसंग आला असतां !

**पीरखानः**—( विव्हळत ) अरे काफर तूं. त्या राजपुतांच्या बाजूनेंच बोलणार ! इतकी चांगली शिकार तूं हातची घालविलीस, काय म्हणावें तुला ? तूं शत्रूला मदतगार झालास. हिंदु तितके हरामखोर !

**बहादूरः**—खांसाहेब जरा तोंड संभाळून बोला. मरायला लागलात तरी इतकी गुर्मी ! काफर, काफर, म्हणतच शेंवटचा अल्ला तुम्ही बोलणार असें दिसतें आहे. आजपर्यंत अनेक पापें केलीं त्यांचें प्रायःश्चित्त म्हणून आतां मरत आहांत, समजलांत ! मला आणखी शीण देऊन पापांत भर कां टाकीत आहांत ? तुमची व तुमच्या बादशहाची गुलामगिरी आज फेंकून दिली. नोकरीवर लाथ मारून हा मी चाललों पहा ! यवनांची सेवा करण्याचें फळ आजवर चांगलेंच मिळालें ! आतां यापुढें आपल्या स्वतःच्या बाहुबळानें मिळेल तें कमवावयाचें ! कोणाचीही नोकरी म्हणून करावयाची नाहीं.

हिंदुधर्माचा अभिमान बाळगून जमल्यास हातून देशसेवाच करावयाची ! झाली एवढी गुलामगिरी बस झाली. खांसाहेब, येतों आतां. आपल्या नोकरीचा आजपासूनच राजिनामा !

**पीरखानः**—अरे हरामखोर, मला असा संकटांत सोडून तूं चालतां होतोस काय? आजवरच्या नोकरीची तुला कांहींच चाड नाहीं कां ? अरे अल्ला, पाणी तरी दे. बहाद्दर, मी मरतों रे, माझ्या जखमा तरी बांध.

**बहाद्दरः**—हें प्या पाणी. मी जखमाही बांधतों. पण तुम्ही घटका दोन घटकांचे सोबती आहांत ! अल्लाचें नांव घेत रहा. हिंदु खरा निमकहलाल असतो तो यवनासारखा निमकहराम नसतो. ( त्याच्या जखमा बांधतो.) हं, आतां मृत्यूची वाट पहात इथें पडा. या शिपायांत कोणी जिवंत आहे कां पहातों, म्हणजे त्याला तुमच्याजवळ ठेवून मी आपल्या मार्गाला लागेन. हा एक हलतो आहे, यालाच सावध करतों. ( जवळ जाऊन एका शिपायास सावध करतो ) अरे जवान, हे खांसाहेब इथें पडले आहेत; त्यांच्याजवळ बैस. जगले तर त्यांना भोपाळला घेऊन जा, मेले तर त्यांना मातीआड कर, मग निघून जा. मला फार जरूरी जाणें असल्यानें इथें थांबता येत नाहीं. ऊठ, खांसाहेबांजवळ बैस.

**शिपाईः**—ठीक आहे सरदारसाहेब. हुकुमाप्रमाणें सर्व बंदोबस्त करतों.

**बहाद्दरः**—आजपासून यवनांच्या गुलामगिरीला तर फांटा दिला. आतां वाट सांपडेल तिकडे जावयाचें ! प्रथम ते राजपूत सरदार मिळाले तर त्यांच्याबरोबर रहावयाचें ! यवनांच्या नोकरीपेक्षां आपल्या हिंदूंचीच नोकरी करणें काय वाईट आहे ? नोकरीच आतां करावयाची नाहीं. राष्ट्रसेवा, देशसेवा करून या यवनांपासून हिंदुधर्म व स्वदेश यांना मुक्त करणें हेंच ध्येय ठेवावयाचें ! प्रभो, आज माझे चांगले डोळे उघडले असून मला सन्मार्ग लाभला आहे.

**पीरखानः**—बहाद्दर, असें काय करतोस ? मला सोडून जाऊं नको ! तुला मोठ्या हुद्याची नोकरी देईन. तुला काफर म्हणून मी शिवीगाळ करणार नाहीं. मी मरतो आहे. या वेळीं तूं मला मदत कर. मला अंधेऱ्या येऊं लागल्या आहेत. शक्ति फार क्षीण झाल्या आहेत. माझ्याच्यानें बोलवतदेखील नाहीं. तुला वडिलांना सांगून मी माळव्याचा सुभेदार करवीन पण तूं मला सोडून जाऊं नको. तुझ्यासारखा पराक्रमी शूर पुरुष माझ्या मदतीस मिळणार नाहीं. तुझी बढती तूं म्हणशील त्याप्रमाणें करीन.

**बहादर:**—खांसाहेब, तें सगळें राहूं द्या. तुम्हांला गरज आहे, म्हणून थोडा वेळ खुशामत कराल, पण गरज संपताच आम्हांला बुटाच्या ठोकरीनें उडवाल. तुमची यवनांची रीत आज अनेक वर्षे पहातां पहातां थकून गेलों आहे. ईश्वर तुमचें भलें करो! मला थांबायला आतां वेळ नाहीं. मला माझ्या पुढच्या तजविजीस लागावयास पाहिजे. खांसाहेब, मी आपल्या सेवेकरितां हा शिपाई ठेविला आहे. मला अगदीं निकडीच्या कामाकरितां गेलेंच पाहिजे. तो तुमची सर्व काळजी घेईल. आपणांस असें सोडून जाणें मलाही योग्य वाटत नाहीं, परंतु पश्चात्तापदग्ध मनांला आतां इथें शक्ति मिळणार नाहीं. तुम्हांला जेवढ्या मदतीची आवश्यकता आहे. त्याची व्यवस्था मी केली आहे. हिंदूचें जें कर्तव्य आहे तें मी पार पाडलें आहे. आतां यापलीकडे मी कांहीं करूं शकणार नाहीं. अरे जवान, खानसाहेबांना नीट सांभाळ बरें. सांगितल्याप्रमाणें नीट व्यवस्था कर. खांसाहेब येतों आतां, सलाम. (निघून जातो. शिपाई पीरखाना-जवळ बसतो. पीरखान विव्हळत बेशुद्ध होतो. पडदा पडतो.)

## अंक दुसरा

### प्रवेश सहावा.

( शिहूरनजीकगुरुदेव यांचा मठ. गुरुदेव, राजकुमारी, उत्तमा व शिष्यवर भजन करीत आहेत वेळ रात्री नऊच्या सुमार. )

**गुरुदेव:** —

पद ६.

( भजन —मीराबाई. )

राम नाम रस पी लेरे मनुआं, राम नाम रस पी लेरे० । टेक ।
तजि कुसंग सत्संग बैठि नित हरि चरचा सुनलीजैरे मनुवां ॥राम०॥
काम क्रोध मद लोभ मोह को चित्त से बहाय दीजैरे मनुवां ।
मीरा के प्रभु गिरधर नागर तेहि के रग्ङ में भीजैरे मनुवां ।
राम नाम रस पी लेरे मनुवां ॥ २ ॥

**गुरुदेव:**—बाळांनों भगवान् श्रीकृष्णाच्या कृपाप्रसादानें तुमच्यावरील संकटें दूर झालीं. त्या प्रभूस वंदन करा, म्हणजे पुढील सांकडेंही तोच दूर करील. (त्या नमस्कार करतात ). तुमच्या बाकीच्या लोकांस धुंडण्याकरितां मी माझ्या शिष्यांना पाठविलें आहे. ते पहाटेपर्यंत सर्व लोकांना घेऊन येतील असा माझा अंदाज आहे. तुम्ही फार मोठा पराक्रम केला! तो हिंदुद्वेष्टा पीरखान मारला गेल्यामुळें मोंगलांचा

इकडील फार मोठा मोहरा नाहींसा झाला. त्यानें इकडील भागांत फारच धुमाकूळ मांडला होता तुमचा अभिलाष करण्याच्या दुष्ट हेतूनें तो तुमच्यामागें पडला होता. प्रभूनें त्यास चांगलें शासन केलें, तुम्ही आतां फार थकला आहांत. स्वस्थ जाऊन झोंप ध्या. शिष्यवर, तुम्ही जाऊन ह्यांच्या विश्रांतीची व्यवस्था एका सुरक्षित खोलींत करून या. यवन शिपाई पीरखानाच्या मृत्यूनें चिडून जाऊन इकडे पाठलाग करीत येण्याचा संभव आहे. ह्यांची सर्व मंडळी एकत्र झाली म्हणजे ह्यांची पुढें जाण्याची व्यवस्था करूं.

**शिष्यवरः**—आज्ञा गुरुजी. मी सर्व व्यवस्था ताबडतोब करतों (जातो).

**गुरुदेवः**—बाळानों, कांहीं हरकत नसल्यास तुमची थोडी हकीकत आम्हांस सांगा तोंवर शिष्यवर येत आहेत. मग आपण विश्रांतीस जा.

**राजकुमारीः**—गुरुमहाराज, आपले उपकार आम्हांवर फार आहेत. तेव्हां आपणासंबंधीं कसलीच शंका न घेतां खरी हकीकत सांगावयास पाहिजे. त्या अगोदर थोडा गुरुमहाराजांचा परिचय झाला तर बरं आम्ही बुंदेलखंडचे रहिवासी असून कांहीं विशेष कामाकरितां उज्जैनला जात आहोंत. आम्ही राजपूत असून राजघराण्यांतील आहों.

**गुरुदेवः**—(डोळे मिटून नमस्कार करीत) गुरुमहाराज, श्रीप्राणनाथ प्रभुजी, नमस्ते, नमस्ते.

**राजकुमारीः**—(आनंदानें) वाहवा ! गुरुमहाराज, आपण गुरुश्रेष्ठ श्रीप्राणनाथ प्रभुजींचे शिष्य आहांत ! (उठून नमस्कार करून) गुरुदेव माफ करा आम्ही आपणांस न ओळखतां आपणाबद्दल संशय दाखविला. आपण गुरुश्रेष्ठांचें नांव घेतांच आम्हांला आपली व आपल्या कार्याची सर्व माहिती मिळाली.

**गुरुदेवः**—तुम्हीही आमच्या गुरुश्रेष्ठांना ओळखतां तर. बुंदेलखंडाचें, आमच्या मातृभूमीचें, नांव घेतांच त्या प्रभूचें स्मरण झालें. मी त्या भूमीचा एक सेवक आहे. बाळांनों त्यांची आपल्याला माहिती कशी ? पण हा प्रश्न व्यर्थ आहे. बुंदेल-खडांतील प्रत्येक मनुष्य गुरुश्रेष्ठांचें नांव जाणतो. अशाच रीतीनें तुम्ही ऐकलें आहे कीं, कांहीं प्रत्यक्ष संबंध आला आहे ?

**राजकुमारीः**—महाराज, माझे आजोबा, महाराज छत्रसाल, यांचे ते गुरुजी. मी लहानपणापासून गुरुश्रेष्ठांना ओळखतें. माझ्यावर त्यांची फार कृपा आहे राजकारणांत

ते तरबेज असून बुंदेलखंडांत स्वराज्य स्थापन करण्यांत महाराज छत्रसालांना त्यांनीं फार प्रोत्साहन दिलें ! ते बुंदेलखंडाचे खरे खरे प्राण आहेत ! बुंदेलखंड स्वतंत्र करण्याकरितां ज्यांनीं अहोरात्र जुलूम, संकटं, अत्याचार, इत्यादि सर्व सहन केलं, पण स्वातंत्र्यच जपत राहिले, त्यांचं स्मरण झाल्याबरोबर आदरानं अपोआपच हात जोडले जातात ! भक्तीनं हृदय भरून येतात !

**गुरुदेवः**—बाळांनों, आतां तर तुम्ही आमचेच झालात ! महाराज छत्रसाल माझे गुरुबंधु ! बुंदेलखंडाचें स्वातंत्र्य संपादण्यासाठींच राजकारणास्तव हा मठ इथें स्थापन केला आहे. असे मठ जागजागीं आहेत. त्यांतून महाराजांना सर्व बातम्या देण्याची व्यवस्था केलेली आहे. उपदेश करून लोकांत स्वराज्यप्रीतिचें बीजारोपण आम्ही करतों. यवनांच्या अत्याचारानें पीडलेल्या लोकांस आम्ही मदत करतों. हा मठ बुंदेलखंडावर होणाऱ्या आक्रमणाच्या दृष्टीनें फार महत्त्वाच्या ठिकाणीं आहे. आम्ही इकडील लोकांत महाराजांबद्दल राजनिष्ठा निर्माण करीत असतों व यवनांच्या अघोरी कृत्यांचा धिक्कार करीत असतों. आमचे गुरुश्रेष्ठ व महाराज छत्रसाल यांच्या पुण्याशीर्वादानेंच तुमच्या केविलवाण्या हांकेबरोबर आम्हांस तुमच्याकडे धांवत येण्याची बुद्धि झाली. नाहींतर त्या दुष्ट पीरखानानें खजीरानें तुमचा प्राणघात केला असता. भगवन् तुमची लीला अगाध आहे ! अशा रीतीनें तूं आमच्या गुरुबंधूंच्या प्रिय माणसांची संकटांतून सुटका करविलीस ! देवा धन्य आहे तुमची ! आमचे शतशः प्रणाम आहेत आपणांस ! हा शिष्यवर आलाच. आतां आपल्याबद्दल कोणासच कांहीं सांगूं नका ! आपली सर्व माणसें येईपर्यंत निवांतपणें विश्रांति घ्या. आपण अगदीं काळजी करूं नका.

**शिष्यवरः**—गुरुजी, सर्व व्यवस्था नीट करून आलों. मठांतील एकांताची जागा सुरक्षित आहे. आसपास लांबपर्यंत फिरून मी चाहूलही घेतली. कुठें कांहीं गडबड नाहीं. चला मंडळी, मी ती खोली आपणांस दाखवितों !

**राजकुमारीः**—गुरुमहाराज, पहाटेपर्यंत आम्ही आपल्या सान्निध्यांत राहून नंतर पुढील मार्गास लागलों असतों. गुरुमहाराजांचे हे चरण सोडूं नये असं आम्हाला वाटतं. यावर जशी गुरुमहाराजांची आज्ञा !

**उत्तमाः** होय गुरुमाऊली, आम्ही इथंच थांबतों. तिकडं त्या एकांतांच्या खोलींत पुनः संकटं येण्याचा संभव. आम्हांला आतां भीति वाटते. आपणाजवळ राहिल्यानं आम्हांस कांहीं त्रास पोहोंचणार नाहीं.

**गुरुदेवः**—बाळांनों असें घाबरूं नका. इथें भिण्यासारखें कांहीं नाहीं. तुम्ही इथें आल्यापासून तुमच्या सुरक्षितपणाची सर्व व्यवस्था मी माझ्या शिष्यमंडळाकडून व्यवस्थित केलेली आहे. इथें मला अजून बरींच कामें आहेत. मजजवळ थांबल्यानें कदाचित् धोका होण्याचा संभव आहे. हें मंदिर आहे इथें येण्याची सर्वांना मोकळीक असते. शत्रूकडील कोणी येण्याचा संभव फार आहे ! म्हणून आम्ही इथें राहून आपल्या खोलीकडे सारखी चाहूल ठेवूं. थोडें सावधागिरीनें राहिलें पाहिजे ! मी व शिष्यवर इथें राहूं ! तुम्ही खोलींत जातांच सर्व दारें बंद करा. दिवा मंद करा. उजेड बाहेर दिसूं नये. कांहीं काळजीचें कारण नाहीं. मात्र सावध असणें बरें !

**राजकुमारीः**—ठीक आहे. जशी गुरुमहाराजांची आज्ञा ! मात्र पहाटे आम्हांस उज्जैनकडं जातां येईल अशी व्यवस्था करण्याची गुरुमहाराजांनीं कृपा करावी. शिष्यवर, चला दाखवा आम्हांला ती खोली. भीमसिंह, चला जीव कसा अगदीं थकून गेला आहे. आतां सर्व भिस्त गुरुमाऊलीवर ठेवून अगदीं निर्धास्तपणं झोंप घ्यावयाची ईश्वरानंच गुरुमाऊलीचं दर्शन घडविलं. आतां तोच पुढंही सर्व भलं करणारा आहे.

**उत्तमाः**—होय सरकार, ते दयाळू असून महाराजांचे गुरुबंधु ! मग विश्वास व श्रद्धा ठेवून मोकळेपणानं वागण्यास कांहीं हरकत नाहीं !

**राजकुमारीः**—बरं, गुरुमहाराज येतों आम्ही. प्रमाण.

**उत्तमाः**—गुरुमाऊली, प्रणाम. (राजकुमारी, उत्तमा व शिष्यवर जाऊं लागतात).

**गुरुदेवः**—आशीर्वाद. जा बाळांनों अगदीं निवांतपणें झोंप घ्या. शिष्यवर, सर्व व्यवस्था नीट लावून तुम्ही मजकडे परत या. बाळांनों, या आतां. विश्रांति घ्या. (सर्व जातात). अहाहा ! देवा, काय अतर्क्य लीला आहे तुझी ! माझ्या गुरुबंधूंच्या आप्तासच मदत करण्याची व ऐनवेळीं प्राण संकटांतून वांचविण्याची महासंधि तूं मला प्राप्त करून दिलीस ! यापेक्षां कोणतं सत्कार्य माझ्या हातून होणार होतें. श्रीप्राणनाथ प्रभु गुरुजी, आपल्या शिष्याचें जीवित आज धन्य झालें. आपल्या व आपल्या प्रिय शिष्याच्या, महाराज छत्रसालाच्या, सेवेला आज हें शरीर उपयोगीं पडलें. देवा ही सेवा आपल्या चरणाजवळ रुजूं व्हावी ! गुरुदेवा, आपलें आज्ञापालन आम्ही अशाच प्रकारें करीत राहूं व हिंदु बांधवांस आमच्याकडून मदत देत जाऊं. या सत्कृत्यांनींच आमच्या जीविताचें साफल्य होणार आहे ! बुंदेलखंडांतील स्वराज्य

वाढीस लावून ती भूमि स्वतंत्र ठेवण्याचा बीजमंत्र गुरुदेवांनीं सर्वांला दिला. आम्ही त्या स्वातंत्र्यनारायणाची सेवा आजवर करीत आहोंत. यवनांपासून गो, ब्राह्मण, देव, धर्म ह्यांना वांचविण्याची शक्य तेवढी खटपट करीत आहोंत. गुरुदेवा, यश देणारे आपणच आहांत. (शिष्यवर परत येतो). हं शिष्यवर, नीट व्यवस्था केलीत ? सर्व सुरक्षित व व्यवस्थित आहे ना ?

**शिष्यवर**:—होय गुरुजी. त्यांना खोली दाखवून, दारें लावून झोंपी जाण्यास सांगितलें. आसपास चाहूल घेऊन सर्व सुरक्षित आहे याची ही खात्री करून घेतली. दिव्याचा उजेड बाहेर दिसत नाहीं हें पाहून नंतर मी इकडे आलों.

**गुरुदेव**:—ठीक आहे. आतां ती दुसरी मंडळी कुठपर्यंत आली आहेत ? त्यांची काय हकीकत आहे ?

**शिष्यवर**:—गुरुजी, आपली शिष्यमंडळी रानोमाळ तपास करीत फिरत आहेत. जशीं माणसें मिळतात त्यांना त्या शेजारच्या महेश्वर मंदिरांत आणून सोडीत आहेत. आतांपर्यंत बरीचशी मंडळी येऊनही गेली आहेत. त्यांची खाण्यापिण्याची व विश्रांतीची व्यवस्था परस्पर तिकडेच केली आहे. मला वाटतें पहाटेपर्यंत सर्व माणसें एकत्र होतील. चंद्रप्रकाश असल्यानें शोध करण्यास मोठी मदत होत आहे.

**गुरुदेव**:—मग बरीचशी मंडळी सांपडली तर ! यावरून शिष्यमंडळींनीं फार मेहनत केलेली दिसते. सर्व मंडळी कुमारांच्या बरोबरचीच आहेत ना ? त्यांत कोणी मोंगल शत्रूकडील तर नाहींत ना ? नाहींतर आणखी घोंटाळा व्हावयाचा !

**शिष्यवर**:—गुरुजी, शत्रूकडील कोणी इकडे आले नाहींत. शिष्यमंडळींनीं पूर्ण चौकशी करून मित्रमंडळी मात्र इकडे आणली. शत्रूवर दया दाखविण्याची ही वेळ नव्हे खास. त्यामुळें या मंडळींवर पुनः संकट यावयाचें. म्हणून शिष्यमंडळी अगोदरच सावध आहेत !

**गुरुजी**:—बरें आतां असें करा, पुनः महेश्वर मंदिराकडे जा. सर्व शिष्यांना व त्या माणसांना प्रवासाच्या तयारींत रहा, असें सांगा. कारण मोठ्या पहाटेसच या सर्व मंडळीस उज्जैनमार्गास लावण्याचा माझा विचार आहे. सर्व तयारी झाल्यावर अगोदर मला येऊन कळवा. सर्व सावधगिरीनें असा. सध्यां पहाटेपर्यंत मी जागृत राहून कुमारांचें संरक्षण करतों ! तुम्हीं आपलीं कामें बिनबोभाट पार पाडा. आजच्या दिवस सर्वांना जागरण व त्रास होणार आहे. पण तो त्रास परोपकाराकरितांच आहे. सर्वांना याप्रमाणें कळवा, जा.

**शिष्यवर**:—आज्ञा गुरुजी. सर्व कामें उरकून शुक्रोदयापूर्वी मी आपणाकडे येईन, प्रणाम (जातो).

**गुरुदेव**:—आतां ईशभजन करीत पहाटेपर्यंतची रात्र जागरण करीत काढावयाची. माझें भजन ऐकून कुमार निवांत झोंपतील. ज्या प्रभूनें आतापर्यंत सर्व सुरळीत पार पाडलें तोच शेंवटपर्यंत सर्व संकटांतून पार पाडील.

**पद ७.**

( भजन—मीराबाई. )

करम गति टारे नाहिं टरे ।
सतवादी हरिचन्द से राजा, नीच घर नीर भरे ।
पांच पाण्डु और कुन्ती द्रौपदी, हाड हिमालय गरे ॥
जग्य कियो बलि लेणा इन्द्रासन सो पाताल धरे ।
"मीरा" के प्रभु गिरधर नागर, विष से अमृत करे ॥७॥

( भजन करीत असतां पडदा पडतो ).

अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

( उज्जैन –महाराणी मैनाबाईचा राजवाडा. राजे राणोजीराव, शिंदेरावांच्या पत्नी महाराणी मैनाबाई व त्यांची दासी बोलत आहेत, असा प्रवेश. )

**म० मैनाबाईः**—काय म्हणतेस, दोन राजपूत स्त्रिया पुरुषांच्या पोषाखांत आलेल्या आहेत ? बरोबर लवाजमाही आहे ? आणि राजांची भेट घेऊं इच्छितात ?

**दासीः**—होय महाराज. त्या म्हणतात आम्ही बुंदेलखंडांतून आलों आहोंत. महाराज छत्रसाल यांच्या दरबारांतील सरदार आहोंत. ऐट तर आणली आहे पुरुषांची ! पण महाराज, बायकोमाणूस कुठं लपूं शकतं काय ? आवाजावरून, पहाण्यावरून, चालण्यावरून, व एकंदर स्वभावावरून चटकन् ध्यानांत येतं कीं त्या तरुण मुली आहेत !

**म० मैनाबाईः**—बाई, बाई! जें जें ऐकावं तें नवलच ! तरुण मुली, पुरुषाच्या पोषाखांत ! महाराज छत्रसाल यांचे सरदार ! ही सर्व संगती लावावयाची तरी कशी ? काय गौडबंगाल असावं बरं ! तरुण मुली व राजांची भेट ! ( विचार करीत ) राजेही नुकतेच बुंदेलखंडच्या स्वारीहून परत आले. तिकडूनच हीं माणसें वेषांतर करून येतात, तेव्हां राजांचेंच कांहीं महत्त्वाचं राजकारण असलं पाहिजे. काय असेल बरं ? कांहीं कल्पना करवत नाहीं बरं तूं असं कर. पहिले त्यांची राहण्याची, जेवणाखाण्याची सर्व व्यवस्था आपल्या महाराजवाड्यांत कर. तीं माणसें फार लांबून आलीं आहेत. त्यांना चटकन विश्रांति घ्यावयास मिळाली पाहिजे. त्यांना माझ्याकडून सांग कीं राजे दक्षिणेंत गेले असून ते विजयादशमीनंतर इकडे येतील तोंपर्यंत आपण त्या वाड्यांत निवांतपणं रहावं ! कसलीही उणीव पडावयाची नाहीं ! कारभाऱ्याकडून लवाजम्याची व्यवस्था त्याच वाड्यांत करून दे. सर्वजण त्यांची चांगली व्यवस्था ठेवा व परकेपणा वाटूं देऊं नका. त्यांनीं विश्रांति घेतल्यावर फुरसतीनं मी त्यांना भेट देईन. राजे इथं नाहींत म्हणून पाहुण्यांच्या आदरातिथ्यास काडीभरही काटकसर होतां कामा नये !

**दासीः**—आज्ञा महाराज. महाराजवाड्याची सोय आपण चांगली काढलीत. जरूर पडल्यास महाराजांना स्वतः जाऊन सर्व गोष्टी पहातां येतील. कारण या वाड्यांतून त्या वाड्यांत भुयार असल्यानं चटकन जातांयेतां येईल.

**म० मैनाबाईः**—माझाही तोच हेतु ! त्यांना भुयाराची कांहीं कल्पना मात्र देऊं नको. त्यांचं सोंग बाहेर काढण्यास त्याचा फार उपयोग होईल. खाशा

स्वाऱ्यांच्या तैनातींत तूं स्वतः राहून सर्व गोष्टी बारकाईनं पहा. हयगय करूं नकोस. कमीअधिक कळल्यास प्रथम मला येऊन कळव. कांहीं राजकारणाचे डाव असल्यास ते अगोदरच कळलेले बरे. कांहींतरी भानगड आहे खास ! त्याचा पूर्ण तपास झाल्यावांचून मनाला समाधान वाटणार नाहीं !

**दासी**:—आज्ञा महाराज. मी स्वतःसगळी व्यवस्था करून आपणांस कळविण्यास येतें. आपण कांहीं काळजी करूं नका. सर्व बातम्या वेळच्या वेळीं महाराजांच्याकडे येत राहतील व आपली आज्ञा होईल त्याप्रमाणं पुढं व्यवस्था केली जाईल.

**म० मैनाबाई**:—सर्व कसं मार्मिकपणानं व सावधगिरीनं पहावयाचं ! व्यवस्था मात्र उत्तम राहिली पाहिजे ! जा लवकर. ( दासी जाते ). काय राजकारण असावं कांहीं कल्पना करवत नाहीं. स्वारींनीं तिकडील हकीकत सविस्तर सांगितली. त्यांत दतिया व ओर्छा येथील राजांची मैत्री नवीन झाली ही आनंदाची बातमीही सांगितली. पण स्वारी जरा उदास दिसत होती. त्यांचं कशांतही मन लागत नव्हतं असं दिसत होतं. हे वकील म्हणावे तर तरुण मुली व त्याही पुरुषवेषांत ! नवल नव्हे कां ? पतीचं मन थोडं जरी अस्वस्थ असलं तर तें गृहिणीच्या लक्ष्यांत आल्यावांचून रहात नाहीं ! तरुण मुली म्हटलं कीं अंगावर कांटा उभा राहतो ! कुठं कसली भानगड उत्पन्न होईल ह्याचा नियम लागत नाहीं ! संशय मनांत डोकावल्यावांचून रहात नाहीं. डोकं कसं भणणं करूं लागलं आहे. छे असं बेचैन होऊन उपयोगी नाहीं. यानं सर्वच गोष्टी फसतील. कांहींही असो सर्वकांहीं सावधपणानंच घेतलं पाहिजे ! मनाची तळमळ कशी बरं दूर व्हावी ? राजांचं चारित्र्य ! छे छे, विचारसुद्धां करावयास नको. आमची बायकांचीं मनं नेहमींच शंकी ! काय करावं ? मनांतला संशय अधि-कच वाढूं लागला !

एवढी मी समजूतदार, शहाणी व राजकारणी स्वतःला समजतें. पण अगदीं मूर्खाहून मूर्ख बनूं लागलें आहे ! राजे व संशय ! छे, छे, असंभवनीय ! देवा, माझ्यावर दया कर. ही तुझी कन्या तुला शरण आहे. कृपा करून मला शांत व समाधानी राहूं दे. माझ्या मनांतला हा खोडकर संशय सर्व नाहींसा कर ! बाळराजे महांकाळेश्वर दर्शनास गेलेले अद्याप आले नाहींत. ते आले म्हणजे मनाला जरा विरं-गुळा होईल ! ( बाळराजे जयाजीराव, दत्ताजीराव, व एक वयस्कर नोकर प्रवेश करतात. बाळराजे धांवत जाऊन मैनाबाईच्या गळां पडतात. )

**बाळराजे जयाजीराव:**—मासाहेब, महाराज, हें काय ? तुमच्या डोळ्यांत आंसवें ! आपण इतक्या उदास कशा ? कसलें दुःख झालें आहे आपणांला ? बोला, मी तें ताबडतोब दूर करतों. दत्ताजीबाबा पहा बरें, महाराज कशा दुःख करताहेत ! बरें कारणही सांगत नाहींत. मासाहेब, आपण दुःखी दिसला कीं, आम्हांलाही रडूं येतें. बाबा दक्षिणेंत गेले म्हणून वाईट वाटतें ना तुम्हांला ? त्यांची आठवण झाली कीं आम्हांलाही रडूं येतें. मग अशीच डोळ्यांतून आंसवें गळतात. थांबविली तरी कांहीं केल्या थांबत नाहींत ! (हंसत) महाराज, कसं ओळखलं ? बाबा गेले आहेत म्हणूनच चैन पडत नाहीं ना ? म्हणूनच दुःख करीत आहांत ना ?

**म० मैनाबाई:** (डोळे पुशीत) होय बाळराजे. मला त्यांचीच आठवण झाली. बरं तुम्हीही महांकाळेश्वर दर्शनास गेलेले. छोटे दत्ताजीराजे व जोतीबाराजे झोंपी गेलेले, त्यामुळं अधिकच उदास वाटून मनाला थोडं दुःख झालं. बाकी कांहीं नाहीं.

**बाळराजे:**—बरें तर आतां आम्ही आलों आहोंत. डोळे पुसा. हंसा व आमचा एक गोड पापा घ्या. बाबा असले म्हणजे आम्हांलाही कांहीं काळजी वाटत नाहीं. पण ते गेले कीं आम्हांला असें वाटतें कीं त्यांचीं कामें आम्ही करावीं, कारभाऱ्यांना हुकूम सोडावें. दत्तबा व जोतीबा यांना शिस्तीनें वागावयास शिकवावें व लष्करी शिक्षण द्यावें. आपल्या प्रजेचीं दुःखें नाहींशी करावीं. राज्यांत जिकडे तिकडे दौरे काढून प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकावीं. सर्वांचीं दुःखें दूर केल्यानें त्यांना सुख होईल. प्रजाजन सुखी तर आपण सुखी ! महाराज, आपणांला तर कधींच दुःख होऊं नये, आपण खूप आनंदांत असावें, असें नेहमीं आम्हांला वाटतें !

**म० मैनाबाई:**—( जवळ घेऊन लडिवाळपणानें ) माझे बाळराजे ते ! किती किती शहाणे झालांत तुम्हीं ! ( पापा घेऊन ) माझ्या राजावरून मीठमोहरी ओंवाळून दृष्ट काढली पाहिजे. बाळराजे, आपल्या वडिलांनीं या माळव्यांत फार मोठी कामगिरी केली आहे. भिल, गोंड व पेंढारी लोकांनीं राज्यांत धुमाकूळ मांडून प्रजेस सतावलं होतं. मोंगल सुभेदार नुसते नामधारी. त्यांना लोकांचा बंदोबस्त करतां आला नाहीं. पण राजांनीं दक्षिणी अंमलदार नेमून व जागजागीं सैन्याचा बंदोबस्त ठेवून 'बादशाही सत्तेपेक्षां आमची मराठेशाही बरी' अशी प्रजाजनांची खात्री पटवून दिली. जमीनदार व ठाकूर लोकांचे हक्क रक्षण करून त्यांचीं वतनं कायम करून त्यांना वंशपरंपरा ऋणी केलं आहे. मराठ्यांच्या शत्रूंना त्यांनीं जबरदस्त जरब दिली आहे. अनेक पराक्रमी सरदारास जहागिरी देऊन मराठ्यांचा घरंदाज वर्ग आज इथं निर्माण केला आहे.

रयत सुखी तर राजा सुखी ! बाळराजे, प्रजेला लेंकराप्रमाणं सांभाळलं पाहिजे ! त्याशिवाय राज्यांत शांतता नांदत नाहीं. बाळराजे, सध्याचं राजकारण आपण चांगलं अभ्यासिलं पाहिजे.

**बाळराजेः**— महाराज म्हणतात तें योग्य आहे. आपण क्षत्रिय आहोंत. पराक्रम व राजकारण हे गुण अंगीं असणें अगदीं अवश्य आहे. आम्ही लष्करी कामें तर या दत्ताजीबाबाकडून शिकतों. तुम्हीं व बाबा राजकारणाचे धडे नेहमीं देतां. मग आम्ही दोन्ही दृष्टीनें तरबेज होऊन उत्तम राजे खास बनणार आहों !

**म० मैनाबाईः**—होय बाळराजे. तुम्ही आपल्या वडिलांकडूनच उत्तम जाबसाल करण्यास शिकाल. मी काय बायको माणूस! मला काय राजकारण कळणार आहे !

**बाळराजेः**—वा महाराज, शिवाजी महाराजांच्या मातोश्री जिजाबाईसाहेब स्त्रीच होत्या ना ? मग त्यांनीं आपल्या शिवबाला कसें राजकारण शिकविलें ? तुम्हीं तसेंच आम्हांला तरबेज करा. बरें आज आपल्याकडे पाहुणे कोण आले आहेत ? ते फार मायाळू दिसतात. आम्हीं महाराजवाड्यांत खेळत होतों. त्यांनीं आम्हास जवळ बोलाविलें. फार माया केली त्यांनीं आमची ! आपल्या व बाबांच्याबद्दल त्यांनीं सारखा प्रश्नांचा भडिमार केला. मीही त्यांनां अशीं उत्तरें दिलीं कीं ते अगदीं माझ्यावर खूष होऊन गेले.

**म० मैनाबाईः**—बाळराजे, कुठं भेटले ते पाहुणे ? महाराजवाड्यांतील जनानी दिवाणखान्यांतच उतरले आहेत कां ? त्यांचा वेष कसा होता ? राजांच्याबद्दल त्यांनीं कसे प्रश्न विचारिले ?

**बाळराजेः**—होय. ते जनानी अतिथीगृहांतच उतरले आहेत ते दोन सरदार दिसतात. महाराज, ते पुरुष असून जनानखान्यांत कां उतरले आहेत ?

**म० मैनाबाईः**— मीच त्यांची तशी व्यवस्था केली आहे. बुंदेलखंडचे महाराज छत्रसाल ह्यांच्या प्रांतीतले ते सरदार असल्यानं माझ्या देखरेखीखालींच ठेवणं योग्य होतं. राजे इथं नसल्यानं त्या पाहुण्यांची योग्य व्यवस्था राखण्याची जबाबदारी मजवर आहे हें तुम्ही जाणतांच. बरं, प्रश्न कसले विचारीत होते ? कांहीं आठवतात कां ?

**बाळराजेः**—आपण पडदा करीत असतां ? पुरुषांनीं असें जनानखान्यांत राहूं नये असा बाबांचा कडक नियम ! तो तुम्हीं कसा मोडलात ? असें नियम तोडणें आम्हांला मुळींच आवडत नाहीं. शिस्तभंग होतो तो. बाबांना हें कळलें तर ते तुमच्यावर खूप रागावतील. पाहुण्यांनीं मला बाबांच्या पराक्रमाबद्दल, राजकारणाबद्दल व आपल्या घरांतील मंडळींसंबंधीं प्रश्न विचारिले.

**म० मैनाबाई**:—बाळराजे, कांहीं विशेष कारणाकरितांच मी त्यांना तिकडं उतरवून घेतलं आहे. ते दोघेच आहेत ना तिथं ? आपली दासी त्यांच्या दिमतीस आहे ना ? राजपुतांना वाटतं आम्हीच राजकारणी, पण त्यांना मराठ्यांचं राजकारण कळत नाहीं. बाळराजे, आपणांला राजपूत, मोंगल, अरब, पठाण, जाट, भिल्ल, गोंड, वगैरे अनेक लोकांशीं झगडावयाचं आहे. तेव्हां सर्वांचे स्वभाव जाणूनच त्यांच्याशीं वागावं लागतं. दक्षिणेंतील परिस्थिति व इकडील परिस्थिति फार वेगळी आहे. त्यामुळं आपणांस फार सावधगिरीनं वागावं लागतं. बरं, दत्ताजीबाबा, बाळराजांना आतां थोडं लिहावयास बसवा. जा बाळराजे, थोडा अभ्यास करा.

**दत्ताजी**:—आज्ञा महाराज. चलावें बाळराजे. कालचे मोडीचे धडे व उदाहरणें करावयाचीं आहेत तीं पुरी करा. आतां गुरुजी येतील. तोंपर्यंत सर्व उजळणी तयार पाहिजे.

**बाळराजे**:— चला दत्ताजीबाबा. अभ्यासाचे कसे डोंगर पडले आहेत. ( दोघे जातात ).

**म० मैनाबाई**:—(डोळे भरून बाळराजांना पहात) या माझ्या बाळराजाकडं पाहिलं कीं सर्व चिंता दूर होते. वडिलांप्रमाणंच पराक्रमी व राजकारणी होऊन ते मोठी कीर्ति मिळवतील असा मला भरंवसा वाटतो. राजांनीं जसं नांव कमाविलं तसंच यांनींही कमावलं म्हणजे माझ्या जीविताचं सार्थक झालं ! माझे हे तिन्ही लाल स्वपराक्रम-तेजानं विलसत राहून श्री छत्रपतींच्या मराठेशाहीच्या सेवेंत सादर राहतील असे मी श्रीमहांकालेश्वर व श्रीहरसिद्धीला नवस करीत आहे. कांहींतरी संशय येऊन माझं हृदय कातर झालं आहे ! भावी संकटाचं स्वप्न पडल्यासारखं मला वाटत आहे. दोन राजपूत स्त्रिया आणि त्याही पुरुषवेषांत ! माझं मनस्वास्थ्य बिघडण्याचं हेंच कारण. त्यांची पूर्ण माहिती मिळाल्याशिवाय मनाची रुखरुख कमी होणार नाहीं. देव करो व सर्व इडापिडा टळो !

### पद ८.

( अभंग--तुकाराम )

विचारा वांचून । न पाविजे समाधान ॥
देह त्रिगुणांचा बांधा । माजी नाहीं गुण सुधा ॥
देवाचिये चाडे । देवा धावें जें जें घडे ॥
तुका म्हणे होतें । बहु गोमटें उचितें ॥ १ ॥

(दासी प्रवेश करिते.)

**दासी**:—( हंसत ) महाराज, अहो स्त्रियाच त्या ! दोघींचा संवाद मी आड उभी राहून ऐकला. त्यांत एक महाराज छत्रसालांची नात, दतियाची राजकन्या असून दुसरी तिची मैत्रिण आहे.

**म० मैनाबाई**:—काय म्हणतेस राजकन्या ? ( आश्चर्यानें ). आणि राजांच्या भेटीकरितां ? हं आतां आलं ध्यानांत. स्वारी म्हणत होती कीं दतियाच्या राजांनीं लढाईशिवाय खंडणी देण्याचं कबूल केलं. राजपूत राजा लढाईशिवाय तयार झाला, यावरूनच राजकन्येची कामगिरी ध्यानांत येते ! माझी शंका आतां अधिकच दृढ होऊं लागली. स्वारीच्या उदासीनतेचं कारण हेंच दिसतं. देवा ! काय प्रसंग आणणार आहेस तूं ? नेहमींच म्हणत असतात, राजपूतमराठ्यांचं ऐक्य व्हावं. ऐक्य करण्यासाठीं भलताच कांहीं प्रकार राजांनीं करूं नये, म्हणजे बरं !

**दासी**: – भलतंच कांहींतरी ! महाराज भलतीच शंका घेऊन मनांला त्रास करून घेत आहेत. महाराज कुठं व एका लहानशा राजाची राजकन्या कुठं ! बरं आपण अशा गुणवान्, रूपवान् , घरंदाज व सुखदायी गृहिणी असतांना भलतीच शंका कशाला घ्यावयाची ? महाराज कां आपणांवर कमी प्रेम करतात ? शिवाय ते बाळराजे, छोटेराजे, वगैरे लेंकराकडं तरी पहातील कीं नाहीं ? महाराज, असली शंका घेऊन उगीच त्रास करून घेऊं नका ! तसं होणं केव्हांही शक्य नाहीं. आपल्यासारख्या शहाण्या, समंजस व धोरणी मालकांना आम्ही नोकरांनीं काय समजावून सांगावं ?

**म० मैनाबाई**:—तसं नव्हे ग. सध्यां स्वारींच्या डोक्यांत तें राजपूतमराठ्यांच्या ऐक्याचं वेड भरलं आहे ना ! त्याच पध्दतीवर राजकारण त्यांनीं चालू केलं आहे म्हणे ! मलाही ही ऐक्याची कल्पना पसंत आहे. राजकारणांत सर्वच हिंदूंनीं एक होऊन मुसलमानांचा उच्छेद करावा, हें सगळं ठीक आहे. पण ह्या ऐक्याच्या वेडाच्या भरांत स्वारींनीं आणखी कांहीं भलतंच करूं नये असं माझं म्हणणं. आपला मराठा-धर्म तरी अवश्य सांभाळला पाहिजे !

**दासी**:—छे छे, तसं मुळींच व्हावयाचं नाहीं. सरकार तसे चंचलबुध्दीचे नाहींत. धर्मविरुध्द असं मुळींच ते करणार नाहींत. आपण बेफिकीर असा. उगीच जिवाला त्रास करून घेण्यांत काय अर्थ आहे ?

**म० मैनाबाई**:—तूं कांहीं म्हण. पूर्ण खुलासा झाल्यावांचून माझ्या मनाला कांहीं शांति मिळणार नाहीं. पुरुषांबद्दल एकदां शंका आली कीं मग तिचं समाधान झाल्यावांचून बरं वाटत नाहीं ! बरं तूं आतां फिरून अशीच त्यांच्याकडं जा. त्यांच्या

तैनातीस राहून बारकाईनं त्यांची माहिती खुलासेवार काढ. विशेष कांहीं घडलं तर मला कळव. जोंपर्यंत त्या पुरुष म्हणून वावरत आहेत तोंपर्यंत मला त्यांची भेट घेतां येणार नाहीं. त्यांनीं स्त्रीवेष घेतला कीं लागलीच मला कळव. मी लागलीच आपल्या वाड्यांतून त्या वाड्यांत जाणाऱ्या भुयारमार्गानं चटकन् तिथं येतें. त्या वेळीं त्यांना भेटून सर्व सविस्तर माहिती विचारीन. जा, मीही थोडी विश्रांति घेतें. जीव अगदीं थकून गेला आहे.

दासीः—चलावं महाराज. ( दोघी जातात ).

---

## अंक तिसरा.

### प्रवेश दुसरा.

[उज्जैन—महाराजवाडा. दिवाणखान्यांतील आंतील बाजूस राजकुमारी (स्त्रीवेषांत) व उत्तमा (पुरुषवेषांत) बोलत बसल्या आहेत].

राजकुमारीः—उत्तमे, आपण मोठ्या पेंचांत पडलों आहोंत. बाबाजी म्हणाले तेंच खरं झालं. राजे तर तडक दक्षिणेंत निघून गेले. त्यांची कांहीं दिवस भेट होणं मुष्कील आहे. आतां आपण मुख्य ठिकाणावर तर पोहोंचलों पण पुरुषवेषांत वावरत असल्यानं मोठी अडचण पडत आहे. बाकी व्यवस्था फारच चांगली आहे. राणीसाहेबांची अद्याप भेट नाहीं. पण कारभाऱ्याकरवीं त्या आम्हाला कांहीं उणं पडूं देत नाहींत. आम्हालाच मात्र कसं कोंडल्यासारखं व सुनं सुनं वाटत आहे. मला वाटतं राणीसाहेबांची भेट होतांच त्यांना खरी हकीकत सांगून पुरुषवेष सोडावा. म्हणजे जरा मोकळं तरी वाटेल !

उत्तमाः—सरकार, वेष सोडला कीं मग मात्र पडद्यांत रहावं लागेल. अद्याप राणीसाहेब भेटल्या नाहींत याचं कारण पडदाच असला पाहिजे. पहा, पूर्ण विचार करा. मला वाटतं राजांची भेट होईपर्यंत पुरुषवेष टाकूं नये. पुरुषवेष असल्यानं संकटं कमी येतात. लोकांना आम्ही स्त्रिया आहोंत अशी शंका येत असेलच पण त्यांना तसं विचारण्याचं धैर्य मात्र होत नाहीं. हा काय कमी फायदा आहे ? पुरुषाचं सोंग दुष्ट माणसांना चार पावलं दूर ठेवण्यास बरंच उपयोगी आहे. स्त्रीवेष घेतला कीं अबला म्हणून दुष्टांचा ससेमिरा लागलाच पाठीशीं, असं समजा !

राजकुमारीः—खरंच बाई. एवढा फायदा आहे खरा या पुरुषवेषाचा ! पण उलट तरुण स्त्रियांकडून त्रास सुरू होतो. बाहेर निघालं कीं, तरुणी असे कटाक्ष फेकूं

लागतात कीं त्या आपल्या नयनबाणांनीं ताडन करतात कीं काय असं वाटावयास लागतं. तूं कांहीं म्हण पुरुषवेष असो कीं स्त्रीवेष असो, आमच्या पाठीमागचा लोकांचा त्रास कांहीं कमी होत नाहीं.

**उत्तमाः**—सरकार, याचं खरं कारण म्हणजे आपण जात्याच सुंदर आहांत. कालिदासानं म्हटलं आहे कीं, "जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें." आम्ही कुरूप असल्यानं कुठल्याही वेषांत असलों तरी कुत्रंदेखील आम्हांला विचारीत नाहीं. मग माणसं त्रास देण्याचं नांवच नको ! ज्याचं त्याचं भाग्य असतं, सरकार !

( म० मैनाबाई व दासी एका बाजूस येऊन स्वस्थ ऐकत उभ्या रहातात. )

**राजकुमारीः**—उत्तमे, तें जाऊं दे. तूं आहेस स्तुतिपाठक. पाहिलीस इथं कशी सुव्यवस्था आहे ती ! राजे इथं नाहींत, तरी आहे कां कशाची उणीव ? याला म्हणतात शिस्त ! पाहिलंस राजे किती थोर पुरुष आहेत ते ! सर्व प्रजा राजांचा सदोदित जयजयकार करून रात्रंदिवस त्यांना दुवा देत आहे. राजांच्या पाठीमागें सध्यां राणीसाहेब स्वतः व्यवस्था पहात असल्यानं कसलीच गडबड नाहीं. सर्वांवर जरब असून सर्व कार्यं कशीं यंत्राप्रमाणं बिनबोभाट होत आहेत.

**म० मैनाबाईः**—(एकीकडे) राजकन्या किती चौकस आहेत ? त्यांनीं सर्व कारभाराची मार्मिकपणं पहाणी केलेली दिसते. किती सुंदर आहेत या ? मला वाटतं सौंदर्याप्रमाणंच राजकन्येच्या अंगीं उत्तम गुणही वास करीत असावेत.

**उत्तमा**—सरकार, शिंदेरावांची शिस्त तर कडक दिसते. त्यामुळं मुख्य कर्त्या पुरुषाच्या धोरणानंच सर्व कार्यं चालत असतात.

**राजकुमारीः**—राजांचे एक एक गुण आठवून मी अतिशयच बेचैन होतें. उत्तमे, त्यांच्या भेटीसाठीं मी किती किती उत्सुक आहे ! पण काय करावं ? दैव सारखं आड येत आहे. त्यांना भेटल्यावांचून माझ्या मनिषेचा सोक्षमोक्ष होणार नाहीं.

**उत्तमाः**—सरकार, आतां येथील परिस्थिति तर आपणांस कळून चुकलीच आहे. शिंदेराव विवाहित असून त्यांना तीन मुलगेही आहेत. ते मोठे कर्तबगार पुरुष आहेत. त्यांच्यावर छत्रपतींची व पेशव्यांची बहाल मर्जी आहे, माळव्यांतील एकंदर राज्यव्यवस्था पाहून आमच्या बुंदेले राजांनीं मानच खालीं घातली पाहिजे.

**राजकुमारीः**—उत्तमे, तूं म्हणतेस त्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. राजांचा दर्जा अनेक महाराजांहून अधिक आहे हें निर्विवाद आहे. त्यांच्यासारखीं गुणी माणसं मिळणं खरोखरच दुर्मीळ व त्याचमुळं मला त्यांच्याबद्दल आदर वाटत आहे.

म० मैनाबाईः—(एकीकडे) नुसता आदरच वाटतो ना? मग कांहीं वावगं नाहीं, बाकी मीच वेडी! अशा सुंदर व गुणवान् मुलीबद्दल उगीचच संशय घेत बसलें. दासी, पुढं हो व मी येतें आहे म्हणून पुकार.

दासीः— (चटकन पुढं येऊन) आमच्या राणीसाहेब भेटीस आल्या आहेत.

राजकुमारीः—(घाबरून) अगबाई, मी तर स्त्रीवेषांत उत्तमे, आतां कसं करावं? फसलं कीं सगळं! (घाईनें जाऊं लागते.)

म० मैनाबाईः—बाई राजकन्ये, आपण कशाला निघून जातां! आमच्याबरोबर कोणी पुरुषमाणूस नाहीं. आपला स्त्रीवेषच आम्हाला सुंदर वाटतो व आवडतोही. या, अशा आमच्याजवळ आम्ही आपल्या मोठ्या बहीण आहोंत असं समजा. घाबरण्याचं मुळींच कारण नाहीं.

राजकुमारीः— (जवळ जाऊन नमस्कार करते व लाजून उभी राहते.) राणी-साहेब, मला माफी द्या. आजपर्यंत आम्ही पुरुषवेषांत महाराज छत्रसाल व दतिया येथील सरदार असं भासविलं. आपल्यासारख्या थोर व सज्जन महाराणींची एकप्रकारें फसवणूक केली. मी दतियाच्या महाराजांची मुलगी असून ही माझी सखी, उत्तमा आहे.

म० मैनाबाईः--बाई. तुम्ही माफी मागण्यासारखं कोणतं काम केलं आहे? या काळांत वेष पालटून पुष्कळ वेळां मोठमोठीं राजकारणं साधावयाचीं असतात, म्हणून तें पाप नसून तुम्हाला तें भूषणावह आहे. अशा वेषांत तुम्ही शेकडों मैल इकडं आलात यांतच तुमचं कौशल्य आहे. या धामधुमीच्या काळांत अनेक भानगडी कराव्या लागतात. तुमच्या उदाहरणावरून जगाला पटेल कीं बायकाही पुरुषाप्रमाणंच पराक्रमी व धीट असूं शकतात! आपली सर्व माहिती आम्हांला कळली आहे. त्यामुळं आपल्याबद्दल आम्हांला फार आदर वाटूं लागला आहे. राजे परत येईपर्यंत आपण इथं आनंदानं रहावं. आम्ही आपणांस कांहींदेखील उणं पडूं देणार नाहीं. जं लागेल तें अगदीं मोकळ्या मनानं मागून घेत जा.

राजकुमारीः—राणीसाहेब, आमच्यासारख्या मुलींवर आपण कृपादृष्टि ठेवतां ह्याबद्दल आम्हांला धन्यता वाटते. आमच्या वेषांतराच्या अपराधाबद्दल शासना-ऐवजीं कौतुक केलंत ह्यामध्यें आपल्या हृदयाचा केवढा मायाळूपणा व थोरपणा दिसून आला! जगांत वावरतांना स्त्रीवेष असणं म्हणजे दुष्ट लोकांना वात्रटपणा करण्यास मोकळीक, असा अनुभव आहे! शिवाय आमच्या राजधानींत जेव्हां आम्हीं शिकार करण्यास जातों तेव्हां पुरुषवेषांतच असतों. त्यामुळं तिथं आम्हाला

पुरुषवेषाची नेहमींच जरूरी लागते त्यामुळं त्या पोषाखाची आम्हांस संवयच झाली आहे. आतां आपली भेट झालीच आहे. म्हणून अंतःपुरांत आम्ही स्त्रीवेषांत राहूं; बाहेर जाणं झाल्यास पुरुषवेषांत राहूं. आपली तर कांहीं हरकत नाहीं ना ?

**म० मैनाबाईः**—आमची मुळींच हरकत नाहीं. आपणाला जसं राहावंसं वाटेल तसं आपण खुशाल रहावं. सरकार येईपर्यंत आपला उत्तम रीतीनं पाहुणचार करणं हें आमचं कर्तव्य आहे ! आपल्या मर्जीनुरूप आम्हीं वागूं. मग तर झालं ना !

**राजकुमारीः**—तसं नव्हे राणीसाहेब, आपल्यासारख्या वडील माणसांच्या आज्ञेप्रमाणंच आम्हीं लहानांनीं वागलं पाहिजे ! राजांच्याइतक्याच आपण आम्हाला वंदनीय व पूज्य आहांत. (लाजत) आपणांस पाहून आम्हांला आमच्या मातेची आठवण होत आहे. असं वाटतं कीं आपण आमच्या वडील भगिनी आहांत !

**म० मैनाबाईः**—राजकुमारी, तुम्हांला पाहून आम्हलांही असंच वाटूं लागलं आहे. समजा कीं आम्ही आजपासूनच आपल्या भगिनी झालों आहोंत ! आतां अगदीं मोकळ्या मनानं रहावयाचं व या वडील बहिणीकडून कोणतीही गोष्ट आग्रहानं मागून घ्यावयाची. केव्हांही संकोच मानावयाचा नाहीं.

**राजकुमारीः**—आपल्यासारख्या सज्जन व मायाळू भगिनीबरोबर रहात असल्यावर कोणती मुलगी संकोच बाळगील बरं ? उत्तमा, पाहिलंस महाराणीसाहेबांचा स्वभाव किती दिलदार व प्रेमळ आहे तो ! मी प्रथमच म्हणत होतें कीं राजांच्या स्वभावाप्रमाणंच राणीसाहेबांचाही स्वभाव उमदा असेल म्हणून. आतांतरी राजे येईपर्यंत इथं राहण्यास हरकत नाहीं ना ? नाहींतर परत बुंदेलखंडांत जाण्याचा फिरून आग्रह करशील.

**उत्तमाः**—सरकार, माझं म्हणणं तुम्ही थोडंच ऐकणार आहांत ! मी वाटेल तितका आग्रह केला, तरी तुम्ही थोड्याच परतणार होतां ? जिथं तुम्ही आमचे महाराज, मातोश्री व महाराज छत्रसालबाबाजी ह्यांचं ऐकलं नाहीं, तिथं माझं थोडंच ऐकणार आहांत ! आणि आतां तर काय ? एक मोठ्या बहीणही आधारास मिळाल्या ! मग तुम्ही राजे भेटल्यावांचून थोड्याच बुंदेलखंडाकडं परत येणार! आमचं काय, जिथं आपण तिथं आम्ही ! जो आपला हुकूम तो आम्हांला मान्य !

**राजकुमारीः**—राणीसाहेब, राजांची स्वारी परत केव्हां येईल याची कांहीं कल्पना आपणांस आहे कां ? पुष्कळ दिवस लागणार असतील तर इथं थांबावयास नको. मग आम्ही परत जातों. ते लवकर परत येणार असतील तर आम्ही इथं थांबतों.

**म० मैनाबाईः**—स्वारी दसऱ्यानंतर इकडं यावयास निघेल. छत्रपतींशीं पूर्ण जाबसाल झाल्यावांचून इकडं परत येणार नाहींत, असं जातांना सांगून गेले आहेत. शिवाय जातांना जनान्या स्वाऱ्यांनीं थोडे दिवस इथं राहून लागलीच दक्षिणेंत यावं, त्यांनीं माहेरच्या मंडळींस भेटावं, व परत येऊन भुसावळ मुक्कामीं काकासाहेब जहागीरदार यांच्याकडं मुक्काम ठेवावा, अशी आज्ञा झाली आहे. सातारा, पुणें व नाशिक करून सरकार भुसावळेस येऊन आम्हास मिळणार, व तेथून उत्तरेच्या मोहिमेवर जाणार ! स्वारींच्या आज्ञेप्रमाणं आतां आम्हांसही दक्षिणेंत जावं लागेल.

**राजकुमारीः**—आपणही दक्षिणेंत जाणार ? अगबाई, मग आम्ही कोणाजवळ राहणार ? उत्तमे पाहिलंस हें दुसरं संकट आलं. आम्हांला वाटत होतं कीं आपल्या सहवासांत हे चारसहा महिने सहज निघून जातील व राजांच्या भेटीचं कार्य इथंच उरकून घेतां येईल ! पण दुर्दैवानं आपणही जात आहांत. तेव्हां इथं राहणं आम्हांला बरं वाटणार नाहीं !

**उत्तमाः**—मग असं करूं सरकार; आपणही परत लवाजम्यासह परत दतियास जाऊं. राजे तिकडे येणार आहेतच. पहा छत्रसालबाबाजींनीं सांगितलं त्या वेळीं तुम्ही ऐकलं नाहीं. आतां परत जाण्याचा केवढा त्रास आहे बरं !

**राजकुमारीः**—उत्तमे, कांहीं म्हण पण परत जाण्याचं मात्र नांव काढूं नकोस ! तूं परत जाण्याची गोष्ट काढलीस कीं, काळजांत कसं धस्स होतं ! काय तीं वाटेंतील संकटं, काय ते पर्वत, काय त्या नद्या, काय तीं जंगलं, काय ते हिंस्र पशू ! नुसती आठवण झाली कीं अंगावर कसा कांटा उभा राहतो !

**म० मैनाबाईः**— भगिनी, इतकं संकट कसलं वाटत आहे तुम्हाला. अहो आम्ही दक्षिणेंत गेलों तरी आमचे कारभारी इथं आपली सर्व व्यवस्था अगदीं उत्तम ठेवतील. त्यांना आम्ही तशी आज्ञा देऊन जाऊं परत जाण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. दुसरं असं कीं, राजांच्या मागं आम्हीच राज्यकारभार पहातों. राजांशीं जें बोलणं करावयाचं असेल तें आपण आमच्याशींही करूं शकतां. म्हणजे कारभाऱ्यांचा सल्ला घेऊन आम्हीं योग्य तो फैसला करूं; मुळींच अंतर होणार नाहीं ! तरी कृपा करून आपलं मनोगत आम्हांस कळवा. म्हणजे आम्हांस हुकूम देण्यास बरं पडेल.

**राजकुमारी**—दतियाच्या महाराजांनीं राजांच्याबरोबर नुकताच मैत्रीचा तह केला. खंडणीच्या रकमाही ठरल्या. पण त्यामध्यें थोडा फेरबदल करावयाचा आहे. कांहीं नवीन करारमदार करावयाचे आहेत. सर्व गोष्टी मनाप्रमाणं होण्यास राजांच्या

भेटीचीच आवश्यकता आहे. आमच्या महाराजांचं व राजांचं बोलणं झालेलं आहे. आपणांस त्या बाबतींत मध्यें कसं पडावं म्हणून संकोच वाटतो. माफ करा. आपण सर्वकांहीं आमच्यासाठीं कराल याची खात्री आहे. पण ही बाब राजांच्याशिवाय उलगडण्यासारखी नाहीं.

**म० मैनाबाईः**—राजकुमारी, त्याबद्दल आपण खात्री बाळगा. आम्ही दिलेल्या निवाड्यास राजे केव्हांही दखल देणार नाहींत ! आमची कदर इतकी त्यांनीं सांभाळली आहे. म्हणून उघड चर्चा करण्यास हरकत नाहीं.

**राजकुमारीः**—राणीसाहेब, आमचे महाराज व राजे यांच्यामध्यें खंडणी देण्याचा ठराव झाला आहे; ( विचार करीत ) आमच्या राज्याच्या वसूलाच्या मानानं ती फार जबर आहे. तरी ती शक्य तितकी कमी व्हावी अशी इच्छा आहे. दुसरा प्रश्न असा कीं आम्ही मांडलीक कोणाचे ? महाराज छत्रसालबाबांचे कीं मराठ्यांचे ? जर महाराज छत्रसालांचे मांडलीक आम्ही समजलों जाऊं तर पुनः खंडणीची माग त्यांच्याकडूनही होईल. अशी दुहेरी खंडणी देण्याची ताकद आमच्या राज्याची नाहीं ! तिसरी गोष्ट दतियाच्या संरक्षणाकरितां मराठी फौज कायम तिथं ठेविली जाणार आहे काय ? आणखी असेच कांहीं किरकोळ प्रश्न आहेत.

**म० मैनाबाईः**—ह्या तर अगदींच सोप्या बाबी आहेत. आम्हीं हुकूम देतों कीं तुमची जितकी ऐपत असेल तेवढीच खंडणी द्या, सार्वभौमत्व मराठ्यांचं राहील. महाराज छत्रसालांना खंडणी देण्याचं कांहींच कारण नाहीं. त्यांची रियासत मराठ्यांशीं सख्यत्व करून एक प्रकारें मांडलीक आहे. हिंदुपदपातशाहीच्या दृष्टीनं आपलीं सगळीं संस्थानं छत्रपतींचीं मांडलीक आहेत. महाराज छत्रसाल स्वराज्यप्रेमी व राजकारणी समजूतदार पुरुष आहेत. ते दुहेरी खंडणी घेणार नाहींत. तुम्हीं म्हणाल तर त्यांना आम्ही मुद्रांकित विनंति लिहून देऊं. बाकी दुसरीं किरकोळ कामं असतील तीं राजे बुंदेलखंडांत आल्यावर उरकून घ्या. बुंदेलखंडास आपण खुशाल परत जाऊं शकतां. वाटेंत भीतीचा कांहीं संभव असल्यास संरक्षणाकरितां थोडी मराठी फौजही देतां येईल. शिवाय आपला लवाजमा बरोबर आहेच ! जशी आपली इच्छा असेल त्याप्रमाणं आम्हांला कळवा. म्हणजे त्याप्रमाणं निवाडे देऊन व्यवस्था करूं. बरं आतां आम्ही येतों. आपण पुरुषवेषांत होता म्हणून आपणांस आम्हास इतके दिवस उघड भेटतां आलं नाहीं, म्हणून माफ करा. उद्यां पुनः आपल्या समाचारास आम्ही येऊं.

**राजकुमारीः**—ठीक आहे महाराणीसाहेब. या आपल्या भगिनीवर प्रेमाची पांखर असूं द्या ! जशी आपली आज्ञा होईल तशा आम्ही वागूं. आम्हांला इथं थोडं करमत नाहीं. बाळराजेवगैरे मुलांना वरचेवर इकडं पाठवीत जा. म्हणजे त्यांच्याशीं बोलण्यांत व खेळण्यांत आमचा वेळ आनंदांत जाईल. महाराणीसाहेब, या आतां. ( आदरपूर्वक नमस्कार करते. )

**म० मैनाबाईः**—(उठवीत) कल्याण होवो मुली. तुमच्या सर्व मनःकामना पूर्ण होवोत ! बाळराजांनीं आपणांलाही वेड लावलं तर ? तेही आपणाबद्दल फार तारीफ करीत होते. दासी, दत्ताजीबाबास सांग कीं बाळराजांना वरचेवर राजकन्येकडे आणीत जा म्हणून. तूंही इथं सेवेला राहून व्यवस्थेंत कांहींदेखील उणं पडूं देऊं नकोस !

**दासीः**—आज्ञा महाराज. हुकुमाप्रमाणं मी सर्व व्यवस्था ठेवितें. ( मैनाबाई व दासी आलेल्या मार्गानें परत जातात. )

**राजकुमारीः**—उत्तमे, किती सज्जन आहेत माणसं ही ! अशांच्या सहवासांत काय कमी पडणार आहे ? बरं झालं राणीसाहेबांनीं भगिनी म्हणून आम्हांला स्वीकृत केलं. आरंभ तरी शुभ आहे ! शेंवटही गोड होईल यांत संशय नाहीं !

**उत्तमाः**—होय सरकार. शेंवट खात्रीनं समाधानकारक होईल ! मात्र थोडा धीर धरला पाहिजे.

**राजकुमारीः**—उत्तमे, माझ्या मनाला आतां नवीन हुरूप आला आहे ! या प्रसंगीं कण्वमुनींनीं शकुंतलेला पतिगृहीं जातांना केलेल्या उपदेशाची आठवण होते !

**उत्तमाः**—सरकार आपणही तंतोतंत तोच उपदेश ध्यानांत घेऊन वागत आहांत असं दिसतं. ( हंसत ) "कुरु प्रीतिम् सपत्नी जने." सवतीबद्दल आपण आतांपासूनच प्रेम बाळगूं लागला हें स्तुत्य आहे.

**राजकुमारीः**—बरं बाई, थट्टा करावयाला तुला चांगलीच संधि मिळाली. मात्र कुणाच्या देखत असा विनोद करूं नको हं. नाहींतर सर्वच काम बिघडेल !

**उत्तमाः**—देवा, माझ्या सरकारांच्या मनाप्रमाणं लवकर होवो. सर्व अगदीं आनंदी आनंद होवो !

**राजकुमारी**—( हंसत ) होईल बरं, आजीबाई. तुझ्या प्रेमाशीर्वादाप्रमाणंच होईल !

( हंसत हंसत जातात. )

## अंक तिसरा

### प्रवेश तिसरा.

(उज्जैन--महाराणी मैनाबाईसाहेबांचा राजवाडा महाराणी मैनाबाई दिवाणखान्यांत विचार करीत बसल्या आहेत.)

**म० मैनाबाईः**—(स्वगत) या राजकन्येला पाहून भगिनीभाव उत्पन्न झाला आहे. तिचं रूप व गुण पाहून ती थोर व कुलीन आहे असं स्पष्ट दिसतं! पण....पण, राजे व राजकुमारी यांचं खरं काम कोणतं? यांत काय राजकारण आहे कांहीं समजत नाहीं. मन अतिशय संशयग्रस्त झालं आहे खास! राजे परत येईपर्यंत माझ्यावर मोठी जबाबदारी आहे. ती कशी पार पडेल कळत नाहीं. एका मनाला वाटतं राजे परत येण्याच्या आंतच राजकन्येला परत बुंदेलखंडांत पाठवावं. मी तसं विचारलं पण तिची इच्छा परत जाण्याची दिसत नाहीं. बरं राजांची आज्ञा दक्षिणेंत येण्यासंबंधीं असल्यानं राजकुमारीस बरोबर न्यावं कीं इथं ठेवावं हाही प्रश्नच आहे. अशा अनेक दृष्टीनं विचार आल्यामुळं डोकं अगदीं भंडावून गेलं आहे. ( इतक्यांत मामासाहेब निंबाळकर येतात. ). (उघड) दादा, दक्षिणेंत जाण्याचा बेत केव्हां ठरला. आपणांला आतां लवकरच निघालं पाहिजे. कारण बाबासाहेबांकडून माणूस आला आहे. राजांचाही हुकूम लवकर येण्याबद्दल आहे.

**मामासाहेबः**—होय ताई, मीही त्याच तयारींत आहे. लवकरच आपण निघूं. पण ताई, आज इतकी उदास व चिंताग्रस्त कां दिसतेस? कांहीं कमीजास्त आहे का?

**म० मैनाबाईः**—तसं कांहीं नाहीं. पण बुंदेलखंडांतून जे पाहुणे आले आहेत त्यांच्यासंबंधीं सारखे मनांत विचार येत आहेत व मग कांहीं चैन पडत नाहीं.

**मामासाहेबः**—अस्सं! एकूण तुलाही त्या पाहुण्यांनीं संशयांत टाकलें तर? असें उदास होण्यासारखें त्यांत काय आहे? राजांच्या राजकारणाच्या अनेक प्रकारच्या उलाढाली चालणारच. म्हणून अशा पाहुण्यांमुळें बेचैन होण्याचें कांहींच कारण नाहीं. तसें कांहीं विशेष कारण असलें तर मला कळूं दे म्हणजे मला उपाय योजण्यास ठीक होईल.

**म० मैनाबाईः**—दादा, एरवींचे पाहुणे असते तर मला कांहीं चिंता नव्हती. पण तुला त्या पाहुण्यांमध्यें विशेष कांहींच दिसलें नाहीं कां? त्यांच्याकडे तूं कधीं न्याहाळून पाहिलंस कां?

**मामासाहेबः**—(हंसत) पाहुणे अतिशय रूपवान् व नाजुक आहेत. मी त्याबद्दल त्यांची थट्टा करावयास गेलों तर सरदारसाहेब खूप रागावले. तेव्हांपासून मी थट्टा करावयाचें सोडून दिलें; व त्यांच्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं.

**म० मैनाबाईः**—दादा, ते पुरुष नसून स्त्रिया आहेत व त्यांतील एक दतियाची राजकन्या आहे. राजांच्याबद्दल तिचा आदरभाव दिसून येतो. स्त्रीस्वभावाप्रमाणं माझं मन शंकित झालं आहे व त्यामुळं मनाला अधिकच उदासवाणं वाटत आहे.

**मामासाहेबः**—काय, त्या स्त्रिया आहेत हें आपणांस आतां कळलें? त्यांतील एक राजकन्याही आहे? मग तर पेंच मोठा जबरदस्त दिसतो! राजांचें हें प्रेमप्रकरण असावें अशी शंका येऊन उदास वाटणें अगदीं साहजिक आहे. मन नेहमींच पापशंकी असतें! म्हणून ही शंका प्रथम दूर करणें बरें. ताई, तूं निश्चिंत रहा. मी सर्व व्यवस्था करतों, व ही मध्यें लुडबुडणारी भानगड जिकडची तिकडे पोहोंचती करतों.

**म० मैनाबाईः**—दादा, पहा बरं, दोन शहाणपणाच्या गोष्टींनं प्रकरण जमलं तर. उगीच राजकुमारीचं मन दुखविण्यासारखं कांहीं करावयाचं नाहीं बरं!

**मामासाहेबः**—ताई, असें करूं या. तूं व मी भुयारांतून महाराजवाड्यांत जाऊं. तूं थोडी आड उभी रहा, मी तिची समजूत घालतों. वळली तर पाहूं. चल, लागलीच तिकडे जाऊं (चालूं लागतात).

**म० मैनाबाईः**—चल दादा. पण ध्यानांत ठेव तिच्यावर मुळींच सक्ती करावयाची नाहीं बरं! कारण नुसत्या संशयानं एखाद्यास त्रास देणं बरं नाहीं. जर सहज रीतीनं साधलं तर पहा. नाहींतर राजे आल्यावर त्याचा विचार करतां येईल.

**मामासाहेबः**—ताई, मी इतका निर्दय व हलक्या मनाचा कां आहे? एखाद्यावर नाहक जुलूम करणें मला मुळींच आवडत नाहीं. मी अगदीं गोडीगुलाबीनें सर्व प्रकरण मिटवितों. चल आंता. ( दोघेही पडद्यांत जातात. लागलीच दुसरा पडदा उघडतो. राजकुमारी स्त्रीवेषांत असून आपणाशींच विचार करीत बसली आहे. )

**राजकुमारीः**—काय असेल ते असो, मनाची हुरहुर मात्र नाहींशी होत नाहीं आईबाबांना सोडून इतक्या दूर आलें, पण ज्यांच्यासाठीं सर्व संकटं पत-करलीं तेही दक्षिणेंत निघून गेले! विरहानलानं मनाची कशी तळमळ होत आहे. राजांची व माझी केव्हां एकदां भेट होईल व माझ्या मनाप्रमाणं कधीं होईल असं मला झालं आहे. ( मामासाहेब व महाराणी मैनाबाई एका बाजूस प्रवेश करतात. महाराणी मैनाबाई मागें थांबून आड उभ्या राहतात. )

**मामासाहेब**:—ताई, कुशल आहे ना ? आपण फार विचारांत दिसतां. कसला चालला आहे एवढा विचार ? आपल्या या मानीव बंधूला कळलें तर बरें होईल ? पण आज आपण स्त्रीवेषांत कशा ? इतर वेळीं पुरुषवेषांत असतां हें काय गूढ आहे ?

**राजकुमारी**:—( बुरखा घेऊन ) अगबाई, आपण कोण ? इथं कसे आलां ? हा जनाना आहे ? भाझ्याशीं आपण इतक्या सलगीनं कसे बोलतां ! या भुयारांतून बाहेर आलात वाटतं ? त्या दिवशीं राणीसाहेबही तेथूनच आल्या होत्या ! एकूण आपण राणीसाहेबांकडून आलेले दिसतां ! प्रथम आपण कोण हें सांगा. म्हणजे आपणांशीं बोलण्यास मला ठीक पडेल.

**मामासाहेब**:—ताई, मी महाराणीसाहेबांचा बंधु मामासाहेब निंबाळकर ! मी त्यांच्याकडूनच आपलें कुशल विचारण्याकरितां आलों आहे. त्या जशा आपल्या भगिनी तसाच मीही आपला बंधु असें समजा. पडदावगैरे करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. बंधूशीं बोलतांना अगदीं मोकळ्या मनानें बोलावें !

**राजकुमारी**:—अस्सं, एकूण आपण आमचे दादासाहेब ! मी प्रथम ओळखलं नाहीं याची माफी करा ! बरं कृपा करून आपण कां आलां व अशा चोरवाटेनं कां आलांत हें सांगा ?

**मामासाहेब**:—मी उघडपणें आलों असतों तर आपण स्पष्टपणें व खुल्या दिलानें बोलला नसतां व उगीच बभ्राही झाला असता ! राणीसाहेबांची इच्छा आहे कीं सर्व गोष्टी गुप्तपणें व्हाव्या. आपलें पुरुषवेषाचें गूढ कायम रहावें ! आतां आपण इकडे कशा आलां ?

**राजकुमारी**:—दतियाच्या स्वारीची हकीकत तुम्ही जाणतांच ! त्या बाबतींत अपुरी राहिलेली वाटाघाट पुरी करण्यासाठीं मी व माझी सखी उत्तमा इकडं आलों आहों !

**मामासाहेब**:—ताई, ताकाला जाऊन भांडें लपविण्यासारखें तुम्ही करीत आहांत ! वाटाघाटीची इतकी घाई नव्हती, राजे तिकडे परत आल्यावरही ती होऊं शकली असती. बरं तेवढीच बाब असेल तर मी आतां राणीसाहेबांकडून सर्व प्रकरण मिटवितों. तुम्ही म्हणाल त्या अटी आम्हांला मंजूर ! बोला काय सवलती पाहिजेत ! सर्व शिक्कामोर्तबासह मी त्या देववितों !

**राजकुमारी**:—दादा, ज्या गोष्टींची वाटाघाट राजांच्याबरोबरच करावयाची, ती मला तुमच्याबरोबर किंवा इतर कोणाला कशी करतां येईल ? राजकारणाचीं गुप्त खलबतंही त्यांत असणारच ! म्हणून ही गोष्ट शक्य नाहीं. मी आपली राजे येईपर्यंत वाट पहाणार !



राजकुमारी.--(एकदम) राजे येईपर्यंत मी इथंच राहतें. तुम्हीं आपले खुशाल दक्षिणेंत जाऊन या.

**मामासाहेबः**—तुझ्या बोलण्याचें हंसूही येतें व आश्चर्यही वाटतें. राणीसाहेब स्वतां रोज शेंकडों राजकारणें उलगडीत असून फैसले भराभर देत आहेत. मग खंडणीची बाब अगदींच क्षुद्र! ज्या अर्थी ती काय आहे हें सांगत नाहींस त्या अर्थी ती पोकळ आहे.

**राजकुमारीः**—तसं नव्हे दादा! ज्याचे हातीं काम असतं त्याशीं चार शब्द बोलणं ठीक असतं. राणीसाहेबांना किंवा इतरांना त्याबद्दल त्रास देणं मी योग्य समजत नाहीं. जाऊं द्या तो विषय. राजे परत येईपर्यंत मी आपली इथं राहणार. राणीसाहेबांना जर तें आवडत नसेल तर मात्र बाई पंचाईत!

**मामासाहेबः**—आवडीनावडीचा प्रश्न नाहीं. तो राजकारणाचाच प्रश्न आहे. उद्यां आम्ही सर्व दक्षिणेंत जाणार. मग इथें तुमची गैरसोय होईल. राजे परत येण्यास अजून कित्येक महिने लागतील. तोंपर्यंत तुम्ही इथें राहण्यानें आपल्या वडील-मातोश्रीस विनाकारण अधिक काळजींत ठेवण्यासारखें आहे. आपण सध्यां बुंदेल-खंडांत परत जा. खंडणीचा प्रश्न आहे, तर तो सध्यां राणीसाहेब तहकूब करीत आहेत!

**राजकुमारीः**—(एकदम) फक्त खंडणीचाच प्रश्न नसून राजपूतमराठ्यांच्या ऐक्याचा नाजुक व जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. त्याची चर्चा राजांच्याबरोबर न झाली तर ऐक्य लांबणीवर पडेल. तुम्ही किंवा राणीसाहेब तो प्रश्न कसा सोडवाल? राजे येईपर्यंत मी इथंच राहतें. तुम्ही आपले खुशाल दक्षिणेंत जाऊन या.

**मामासाहेबः**—ताई, तुम्ही राणीसाहेबांना सामान्य स्त्री समजतां काय? छे छे, अशी घोडचूक करूं नका. जयपूर, जोधपूर, उदेपूर, निजाम व मोंगल सुभेदार वगैरे अनेक सत्ताधाऱ्यांशीं अनेक राजकारणें त्यांच्या समक्ष घडत आहेत. त्यामुळें राजकारणांत त्या पूर्ण वाकबगार आहेत. ऐक्याचे नाजुक प्रश्नही धडाक्यानें सोड-विण्याचें धैर्य त्यांच्या ठायीं आहे! संकोच न करतां तसलेही प्रश्न स्पष्ट मांडावे. मीही आपणांस मदतच करीन! एक वेळ मोकळ्या मनानें सांगून टाका. उगीच कालापव्यय नको.

**राजकुमारीः**—दादा, भाऊराया, केवढा अट्टाहास हा! असे आपल्या ताईला आडवतां कां? खंडणीचा प्रश्न असो, राजपूतमराठाऐक्याचा प्रश्न असो, त्या बाबतींत राजांच्याशिवाय मला कोणाशींच बोलतां येणार नाहीं. उगीच आग्रह कां? तुम्ही परत येईपर्यंत मी व उत्तमा आपल्या महाराजवाड्यांत राहूं.

**मामासाहेबः**—असा हट्ट करणें म्हणजे राणीसाहेबांचा अपमान करणें आहे! पर्यायानें तो त्यांच्या बंधूचा, मामासाहेब निंबाळकराचाही अपमान आहे! कारणें

उघड करून सांगा किंवा सरळ बुंदेलखंडाचा रस्ता सुधारा! गुण्यागोविंदानें सर्व सांगून टाकलें तर त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास बरें पडेल.

**राजकुमारीः**—दादा, एखाद्या माणसाचीं कांहीं खासगी कामं असलीं तर तीं उघड करून सांगण्याचा हट्ट तुम्हीं किंवा राणीसाहेबांनीं कां धरावा हें मला समजत नाहीं. मला खंडणीसंबंधींचं बोलणं करावयाचं आहे व तें राजांच्याबरोबरच करावयाच आहे! तुम्हां लोकांना आमचा कंटाळाच आला असेल तर आम्हीं हा राजवाडा सोडून बाहेर एखाद्या झोंपडींत राहूं. किंवा येथपर्यंत जसे आलों तसे दक्षिणेंत जाऊं. राजांची भेट घेणं हा आमचा कृतनिश्चय आहे. जसा आपला मनोदय तसाच राणीसाहेबांचा आहे काय? ठीक आहे. आम्हीं उद्यां इथं न रहातां दुसरीकडं जाऊन राहूं. तेंही पसंत नसल्यास आम्ही दक्षिणच्या मार्गास लागूं. (म० मैनाबाई पुढें येतात.)

**म० मैनाबाईः**—थांबा राजकुमारी शिंदेरावांची मंडळी असा पाहुणेमंडळीस मुळींच त्रास देणार नाहींत. राजवाडा आपला आहे. वाटेल तितके दिवस येथील पाहुणचार आपण घ्या. दादा, तुम्हीं आमच्या भगिनीवर अशी इतराजी दाखवूं नका. त्या राजकन्या आहेत. त्यांचा थोडासुध्दां अपमान होतां कामा नये. उद्यांच दक्षिणेंत जावयाची तयारी करा. भगिनी, आपली इच्छा असेल तर इथं राजवाड्यांत रहा किंवा आमच्याबरोबर आमच्या माहेरीं चला. घर आपलं आहे. परकेपणा बाळगूं नका.

**राजकुमारीः**—राणीसाहेब, आपण फार दयाळू आहांत. मी आपले उपकार किती मानावेत! बरं झालं आपण वेळेवर आलात. नाहींतर दादा आम्हाला बुंदेलखंडांत पाठवीत होते. काय रागांत आली होती स्वारी! दादा, जा ना आतां दक्षिणेंत जाण्याची तयारी करा. मीही आपल्याबरोबरच येणार आहे. राणीसाहेब, मला आपण भगिनी मानूं लागला, सार्थक झालं माझ्या जिवाचं! आतां मला खात्री वाटूं लागली कीं आपण नेहमीं माझ्या पाठीशीं उभ्या रहाल. येवढा आधार असल्यावर मला मुळींच चिंता वाटणार नाहीं. असाच कृपालोभ मजवर असूं द्या. हं दादासाहेब जा लवकर व उद्यांची निघण्याची तयारी करा.

**मामासाहेबः**—(हंसत) ठीक आहे ताईसाहेब. राणीसाहेबांचीच आज्ञा झाल्यावर आमचें काय?

**म० मैनाबाईः**—खरंच दादा, राजकन्याही आमच्याबरोबर दक्षिणेंत येतील. इथं त्यांना मागं ठेवणं आपणांस शोभणार नाहीं. इथं त्यांची अव्यवस्थाही होण्याचा संभव! शिवाय दक्षिणची सफर त्यांना फार आवडेल; कारण तिकडील मुलूख पहाण्याची संधि येत आहे.

**मामासाहेबः**—बरं तर ताई मी .जातों व तयारीस लागतों. उद्यां मोठ्या पहाटेसच मार्गास लागूं. ( मुजरा करून जातात ).

**म० मैनाबाईः**—(स्वगत) काय करावं ? जितका पुढील विचार येतो तितका जीव अधिक कासावीस होतो ! त्यांच्या दृढ निश्चयावरून इतर कामाच्या महत्त्वापेक्षां भेटीची उतावळी अधिक दिसते ! म्हणून शंका येते कीं यांचें एकमेकांवर प्रेम तर जडलं नाहीं ? आज थोडं स्पष्टच विचारावं म्हणजे निकाल लागेल. ( उघड ) ताई, मी वडील बहीण या नात्यानं विचारते, राजांच्याबरोबर तुमचं कसलं काम आहे ? अगदीं नाजुकांतील नाजुक काम असलं तरी मी कांहीं रागावणार नाहीं व दोषही देणार नाहीं. जें काय असेल तें खरं सांगा.

**राजकुमारीः**—( लाजून ) राणीसाहेब, मला नाजुक राजकारणं कळत नाहींत. राजांना भेटावं व त्यांना डोळे भरून पहावं, असं अगदीं मनापासून वाटतं. काय तें शौर्य ! काय तें धिप्पाड शरीर ! काय तो गोड स्वभाव ! राजांच्या सर्वच गोष्टी मला अगदीं अतिशय आवडतात. जगांतल्या कोणत्याही व्यक्तिपेक्षां मला राजे आतां जवळचे आप्त वाटतात !

**म० मैनाबाईः**—समजलें. एकूण तुम्हीं राजांच्या विशेष लोकांतील आहांत ! बरं त्यांची कांहीं खूण आपल्याजवळ आहे कां ? ती असल्यास कृपा करून दाखवाल कां ?

**राजकुमारीः**—त्यांची राजपूतमराठ्यांच्या मधु-मीलनाची कल्पना मला फार आवडते. राजपूतमराठ्यांमध्यें रोटीव्यवहार व बेटीव्यवहार चालू झाल्याशिवाय हें मधु-मीलन दृढ होणार नाहीं. राजेही ह्या गोष्टीला जर संमति देतील तर सर्वकांहीं मनासारखं होईल ( लाजून खालीं पहाते ).

**म० मैनाबाईः**—आम्ही समजून गेलों आपलं सर्व भाषण. आम्हाला फक्त राजांची खूण पहावयाची आहे. दुसरें कांहीं नाहीं.

**राजकुमारीः**—( मुद्रिका दाखविते ) राजांनीं तहाच्या अटी ठरविल्या त्या वेळीं ही मुद्रिका माझ्याजवळ दिली व सांगितलं कीं ही अतिशय सांभाळा.

**म० मैनाबाईः**—(आश्चर्यानें) काय राजांची मुद्रिका ! आणि त्यांनीं ती तुम्हाला दिली ! आश्चर्य आहे. राजांनीं हें काय मांडलं आहे ! असलं कसलं हें राजकारण ! तरवारीच्या बळावर सर्व गोष्टी करावयाच्या सोडून रोटीबेटीव्यवहारानं मधु-मीलन साध्य करावयाचं, अशी चमत्कारिक कल्पना त्यांना कोणी दिली ? ताई, खूण तर मला पटली प्रत्यक्ष राजांचीच मुद्रिका ही ! त्यामुळं तुमच्या बाबतींत संरक्षणादिक

सर्व जबाबदारी आमच्यावर आली. आपण आतां कांहीं काळजी करूं नका. ( स्वगत ) मनानं जी शंका घेतली ती जवळ जवळ खरी ठरते, असं वाटतं. थोडी शंका राहिली ती दूर करावी. ( उघड ) ही प्रेममुद्रिका कीं रक्षकमुद्रिका ?

**राजकुमारीः**—तिनं दोन्हीं प्रकारचं कार्य केलं आहे. यापेक्षां अधिक मी आपणांस काय सांगू ? माझा कांहीं अपराध असला तर कृपा करून तो पोटांत घाला. मायेची पांखर मात्र या दुःखी जीवावर सतत ठेवा. मी आपणास शरण आहे. (नमस्कार करते.)

**म० मैनाबाईः**—(गहिंवरून) उठ ताई ! तुम्हाला सर्व गोष्टींची क्षमा असून अभय आहे. जेथें राजांनीं आपली बहुमोल मुद्रिका आपणास दिली; तर मग यापेक्षां अधिक काय पाहिजे ! तुम्हांला सर्व दृष्टीनं अभय असून तुम्ही आमच्याबरोबर आनंदानं रहावं. मग पुढील गोष्टी पुढं पाहूं. मात्र मजसंबंधीं व दादासंबंधीं गैरसमज होऊं देऊं नका व राजांना ह्या गोष्टीची ओळख देऊं नका. कारण ते आमच्यावर खात्रीनं रागावतील. बरं तुम्ही आपल्या माणसांना आज्ञा द्या कीं उद्यां पहाटेच दक्षिणेंत जावयाचं आहे. त्यापूर्वीं सर्वांनीं तयार रहावं. मी आतां जातें.

**राजकुमारीः**—राणीसाहेब, प्रणाम. आपल्या आज्ञेप्रमाणं सर्व तयारी करतें. (नमस्कार करते. मैनाबाई उलट नमस्कार करून आल्या वाटेनें परत जाते.) काय करावं ? यांनीं माझं सर्व मनोगत ओळखलं. मलाही माझं मन उघडं करावं लागलं. काय करावं मी तरी ? हें कुठवर गुप्त रहाणार ? मी तर प्रेमवेडी बनलें आहे. भगवान् कृष्णावर मीराबाईची जशी भक्ति होती तशीच राजांच्यावर माझी भक्ति आहे. कुणी कांहीं म्हणो. जगाची लाज सोडली आहे. कुणाचीच पर्वा करावयाची नाहीं. राजांचे चरणकमल घट्ट धरून हा संसारसागर तरून जावयाचा हाच आतां कायमचा निश्चय ! मन किती अस्वस्थ झालं आहे ? थोडं भजन केल्यावांचून शांतता वाटणार नाहीं.

## पद ९.

( भजन—मीराबाई ).

हरि तुम हरो जन की पीर ।
द्रौपदी की लाज राखी, तुम बढ़ायो चीर ॥
भक्त कारन रूप नरहरि धरयो आप सरीर ।
हिरण्यकासिपु मारि लीन्हों धरयो नाहिन धीर ॥
डूबते गजराज राख्यो, कियो बाहर नीर ।
दासि 'मीरा' लाल गिरधर दुःख जहां तहं पीर ॥




राजकुमारी.—(विनोदानें) सुकलेल्या वेलीला पाणी घालतांच जशी टवटवी येते त्याप्रमाणं स्वारी आज येणार हें कळतांच मन कसं प्रफुल्लित झालं आहे!

## अंक तिसरा.

### प्रवेश चवथा.

( खानदेश—भुसावळ येथील निंबाळकर जहागीरदारांच्या वाड्यास लागून असलेला बाग. उत्तमा बसून फुलांचा हार गुंफीत आहे )

**उत्तमाः**—

पद १०

( चाल—प्राणनाथ की प्राण से पूजा—संतसखू )

मोगरा, गुलाब फुलला साचा ।
जाई, जुई, चंपक उद्यानीचा ॥
सुगंध पसारा भाव-भक्तीचा ।
हार मनोहर कीर्ति-सुमांचा ॥

आज शिंदेराव येणार म्हणून सरकार किती उत्सुक झाल्या आहेत. सर्व प्रकारं नीटनेटका पोषाख करून सारख्या त्यांची वाट पहात उभ्या आहेत. आतुरतेनं बेचैन होऊन सारख्या बागेच्या फाटकाकडं जात आहेत. त्यांनीं आपला हार केव्हांच गुंफला. मीच बाई आळशी ! बरं पण, शिंदेरावांच्याबरोबर आमचे मुशाफिर येणार किंवा नाहीं? भारी बाई विनोदी स्वभाव ! मला बाई भारी आवडतो ! ( राजकुमारी प्रवेश करते .)

**राजकुमारीः**—(विनोदानें) खरंच अगदीं समसमा संयोग ! दोघेही विनोदी, मग काय पहावयाचं ? उत्तमा, आतांपर्यंत सर्व दिवस मोठे संकटाचे गेले. राजे आज येणार ही बातमी कळल्यापासून मनाला अतिशय हुरूप आल्यासारखा झाला आहे. सुकलेल्या वेलीला पाणी घालतांच जशी टवटवी येते त्याप्रमाणं स्वारी आज येणार हें कळतांच मन कसं प्रफुल्लित झालं आहे. उत्तमे, राजे माझ्या विनंतीला मान देतील कां ? त्यांनीं जर ही गोष्ट पसंत केली नाहीं तर मग मात्र जीवन व्यर्थ होईल.

**उत्तमाः**—सरकार, अशा अधीर होऊं नका. राजांचं प्रेम तुमच्यावर आहे यांत बिलकुल शंका नाहीं. उगीच कांहींतरी शंका घेऊन पुनः मन अस्वस्थ करून घेणं योग्य नाहीं. आज सकाळपासून तुमचं मन अधिक विचारग्रस्त झालं आहे ! तुम्हाला मुळींच चैन नाहीं. सारखं रस्त्याकडं ध्यान लागलं आहे ! जासूदाच्या निरोपावरून राजे आज खास येतील. सर्वकांहीं मनासारखं होईल काळजी करूं नका !

**राजकुमारीः**—येण्याची वेळ हीच, म्हणूनच मार्गप्रतीक्षेसाठीं इकडं आलें ! वाड्यांत अगदींच उदासवाणं व कोंडल्यासारखं झालं होतं. बाग रस्त्याच्या कडेला

असल्यानं राजे येतांच त्यांचं प्रथम दर्शन होईल, म्हणून मी इकडं आहे. उत्कंठा अधिकच वाढत आहे. उत्तमा, पहा बरं रस्त्याला मोठा धुळीचा लोट दिसत आहे. (न्याहाळून पाहून) अग, कांहीं घोडेस्वार दौडत येत आहेत. कदाचित् राजे त्यांतच असण्याचा संभव आहे. राजे त्यांत असतील तर त्यांचं लक्ष आपल्याकडं कसं लागेल ? हं, गडे कांहींतरी युक्ति काढ.

**उत्तमा**:—राजांना बागेंतच भेटण्याचा आपला हेतु आहे वाटतं ! पण आपण दोघीही स्त्रीवेषांत आहोंत. सैनिकही बरोबर बरेच असतील. तेव्हां हें साधावं कसं ? सरकार, मला तर कांहीं सुचत नाहीं.

**राजकुमारी**:—मी सांगतें तुला युक्ति. मी इथं जवळच आड उभी राहतें. तूं राजांना ओळखतेसच. रस्त्याच्या अगदीं कडेच्या झाडाआड तूं उभी रहा. राजे पथकाच्या अघाडीवरच असणार ! राजे जवळ येतांच त्यांना हाक मार व मजकडे त्यांना घेऊन ये. जा, जा लवकर, घोडेस्वार जवळ येत चालले.

**उत्तमा**—(हंसत) हं आज्ञा सरकार. राजांच्या भेटीकरितां किती उतावळी झाली आहे ? (पडद्यांत जाते.)

**राजकुमारी**:—हृदया, थांब असा अधीर होऊं नको ! भेटीकरितां बाहु स्फुरण पावत आहेत. उजवा डोळाही लवतो आहे. शकुन तर चांगले आहेत प्रेमानं वेडावलेल्या माणसांची काय बिकट स्थिति होते याचा अनुभव मला क्षणोक्षणीं येत आहे.

अगबाई, उत्तमा व कुणीतरी बोलत इकडंच येत आहेत. (पाहून आनंदानें) राजेच कीं, आतां काय करावं ? माझी स्थिति कशी बावरल्यासारखी झाली आहे ! हा त्यांच्यासाठीं गुंफलेला हार त्यांच्या गळ्यांत घालावा असं वाटतं. पण धीर होत नाहीं. उद्धट म्हणून धिक्कार केला तर ? काय करावं ? करूं कां धैर्य ? बाई बाई, थोडा-सुद्धां विचार करावयास वेळ राहिला नाहीं ! छे मला कांहीं धीर होत नाहीं. (हार तसाच हातांत घेऊन लाजून बुरखा घेऊन उभी राहते. मधून मधून बुरख्यांतून पहात रहाते. उत्तमा व राजे राणोजीराव बोलत येतात.)

**राजे राणोजीराव**:—अस्सं. एकूण राजकुमारींनीं आमच्याकरितां इतकीं संकटें सोसलीं तर. खरें प्रेम आहे त्यांचें आमच्यावर ! राजपूतमराठ्यांच्या ऐक्याच्या दृष्टीनें ही गोष्ट आम्हासही पसंत आहे. राजकुमारी, अशा लाजून उभ्या कां ? स्त्रीवेषांत असलें कीं, असेंच लाजून उभें रहावें लागतें वाटतें ? आतां असा संकोच नको !



राजे राणोजीराव.—राजपूत मराठ्यांच्या ऐक्याच्या दृष्टीनें ही गोष्ट आम्हांस हीं पसंत आहे. राजकुमारी, अशा लाजून उभ्या कां? स्त्री वेषांत असलं कीं, असेंच लाजून उभें रहावें लागतें वाटते?

**उत्तमाः**—सरकार हें काय ? राजांचं स्वागत करावयाचं सोडून अशा लाजून कां उभ्या राहिलात ? हं व्हा पुढं आणि राजांचं स्वागत करा ! ( लाजत लाजत राजकुमारी राजांच्या गळयांत हार घालते. उत्तमा दुसरा हार आणून राजांच्या हातांत देते. ) राजे, हा हार आपण सरकारना घाला, म्हणजे स्वयंवर पुरतं होईल !

**राजे राणोजीरावः**—राजकुमारी, जसें माझें स्वागत आपण केलें, तसेंच मीही आजच्या शुभ मुहूर्तानें आपलें अभिनंदन करून आपणांस मी आपला जीवन-साथी बनवितों. ( हार गळ्यांत घालून ) आपण दोघेही ईश्वरास साक्ष ठेवून एकमेक पतिपत्नी म्हणून राहूं. ( इतक्यांत पहिले बाजीराव व पिलाजीराव जाधव येतात. राणोजीराव त्यांना मुजरा करतात. राजकुमारी व उत्तमा बुरखे घेतात व नमस्कार करतात.)

**पहिले बाजीरावः**—(आनंदानें) तथास्तु ! असा गोड प्रसंग पहाण्याचें भाग्य आम्हांला लाभलें. जाधवराव तुमच्यामुळें हा स्वयंवर पहाण्याचा योग साधला. शिंदेरावांनीं कांहीं आम्हांला कळूं दिलें नव्हतें ! राज्याच्या उलाढालींबरोबरच प्रेमाचीही लयलूट करतां वाटतें ? चांगली मुलुखगिरी साधते तुम्हांला ! आपल्या सवंगडी तरुण पेशव्याला त्याचा बिलकुल मागमूस लागूं दिला नाहीं ! पण आतां आम्ही आपणांस अगदीं मुद्देमालासह पकडलें आहे. खरें कीं नाहीं जाधवराव ?

**राजे राणोजीरावः**—रावसाहेब आपणापासून लपवून ठेवण्याचा हेतु नव्हता ? राजकुमारी इकडे आल्याचें मलाही माहीत नव्हतें. पण वाटेंतच त्यांच्या या सखीनें मला थांबविलें व इकडे बागेंत आणिलें.

**पिलाजीरावः**—शिंदेराव, रावसाहेब व मी तुमच्या मागोमाग येत होतों . तुम्हीं घोड्यावरून उतरून त्यांच्याबरोबर बागेंत शिरला. बारगीर घोड्याजवळ होताच. माझ्या ताबडतोब ध्यानांत आलें कीं राजांचें कांहीं तरी प्रेमप्रकरण आहे. मी रावसाहेबांना आपली सर्व प्रेमकथा निवेदन केली आहे. रावसाहेबांना ती फार आवडली. माफ करा आपल्या एकांताचा आम्ही भंग केला. मी आपला खराखुरा अपराधी आहे. शिंदेराव, तुम्ही याबद्दल जी शिक्षा कराल ती भोगण्यास हा आपला बंदा दोस्त तयार आहे.

**पहिले बाजीरावः**—ठीक आहे. या तुमच्या अपराधाबद्दल आम्ही तुम्हांला शिक्षा करतों. आपला मुक्काम इथेंच कांहीं दिवस ठेवावयाचा व जहागीरदारांच्या

मदतीनें शिंदेरावांच्या लग्नाची सर्व तयारी करावयाची. त्यांत कसलेंही न्यून पडतां उपयोगी नाहीं. नुकत्याच झालेल्या लढाईतील यशाबद्दल — उत्तरेकडील मोहिमांबद्दल— आम्ही अतिशय खूष आहोंत. जाधवराव, लागेल तो खर्च आम्ही सरकारी खजीन्यांतून मंजूर केला आहे.

**राजे राणोजीराव**:—(हंसत) पिलाजीराव शिक्षा करण्याचें काम आम्हीं उत्तमेकडे सोंपविलें आहे. रावसाहेब, आपले इच्छेबाहेर आम्ही जाणार नाहीं. आपला आमच्यावर फार लोभ आहे. राजपूतमराठ्यांच्या दृष्टीनें अशा मधु-मीलनाची आवश्यकता फार आहे. आपणही संमति दिली आहे. समाजमताच्या विरुद्ध जाऊनही या विवाहास आम्ही तयार आहों.

**पहिले बाजीराव**:—शिंदेराव, त्याच तत्त्वावर मी आपणांस आग्रहपूर्वक असें मधु-मीलन होऊं द्या असें सांगत आहे. महाराज छत्रसाल; जयपूर, जोधपूर व उदेपूर येथील महाराणे ही गोष्ट खात्रीनें पसंत करतील. कारण यामध्यें सर्व भारतवर्षाचें कल्याण होणार आहे ! आतां मराठा मंडळीस ही गोष्ट अगदीं नवीन असल्यानें आवडणार नाहीं. ते तात्पुरता विरोधही करतील. म्हणूनच आम्हीं स्वतः या विवाहांत पुढाकार घेऊन उपाध्येपण करणार आहोंत. छत्रपतींना राजकारणांतील ही नवीन कल्पना फारच पटेल ! पूर्वेतिहासास अनुसरून अशीच राजपूतमराठ्यांची दिलजमाई होत गेली तर या दोन्ही विक्रमशाली क्षत्रियांमध्यें थोडाही भेदभाव उरणार नाहीं. जाधवराव, शिंदेराव किती धोरणी आहेत व केवढें राष्ट्रकार्य साधीत आहेत पहा !

**पिलाजीराव**:—( हंसत ) राजपूतमराठा ऐक्याच्या दृष्टीनें उत्तमेची शिक्षा आम्हांला मंजूर आहे. तसेंच रावसाहेबांचें म्हणणें योग्य आहे. राजकारणाची जुळवा-जुळव करण्यांत शिंदेरावांचा हात कोणीही धरणार नाहीं. मारवाड, माळवा, बुंदेलखंड यांत त्यांनीं किती लवकर जमवाजमव केली हें आपण जाणतांच ! हिंदूंची केवढी प्रबळ शक्ति आज निर्माण होत आहे, हें अनुभवास येत आहे.

**पहिले बाजीराव**:—जाधवराव, शिंदेरावांना आम्ही बाळपणापासून पहात आहोंत. हे आमच्या वडिलांचें वेळचे ! आम्हाला त्यांची केवढी मदत झाली आहे ! बारामती-पाटसच्या युद्धांत वडिलांची बाजू सांवरून ऐन संकटाच्या वेळीं त्यांनीं मदत केली म्हणून आमच्या घराण्यानें ही स्थिती पाहिली. आज मराठेशाहीची भरभराट उत्तरेकडे होत आहे हें सर्व श्रेय शिंदेरावांना आहे. शिंदेरावांनीं स्वतः आज नवीन राजकारणाला सुरुवात केली आहे. याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडें आहे.

**राजे राणोजीरावः**—रावसाहेब, आपण आमच्यासारख्या आपल्या सवंगड्यांना प्रोत्साहन देतां, आमच्या कामगिरीचें कौतुक करतां, त्यामुळें आमच्या हांतून दौलतीची सेवा योग्य प्रकारें होत आहे. छत्रपतींची कृपा व आपला अकृत्रिम स्नेह आम्हांला प्रत्येक कामगिरींत नव्या उमेदीनें प्रोत्साहित करीत आहे. याचें सर्व श्रेय आपणा उभयतांसच दिलें पाहिजे.

**पहिले बाजीरावः**—शिंदेराव, आपण आम्हांला इतकें मानतां हा आपला थोरपणा आहे. आपण वडील माणसें. आमची इच्छा इतकीच कीं आपल्या अंगच्या पराक्रमानें व मुत्सद्दीपणानें हिंदवी स्वराज्याची जोपासना होऊन इतिहासांत आपलें नांव अजरामर व्हावें. राजकुमारींचें अभिनंदन तर प्रथम करावयास पाहिजे. त्यांच्या मनोधैर्यास सीमाच नाहीं. राजपूत असून अनेक पिढ्या संबंध तुटलेल्या मराठा घराण्याशीं संबंध करण्यास तयार होणें ही गोष्ट सामान्य नव्हे. आईबाप, नातेवाईक, जातिबांधव, वगैरेंची पर्वा न करतां ध्येयासाठीं अनेक संकटें सोसून आत्मदान करणें ही गोष्ट साधी किंवा सोपी नाहीं. अलौकिक मनोधैर्याचींच माणसें हें कार्य करूं शकतात. शिंदेरावांच्यापेक्षांही राजकुमारींचें कौतुक आम्हीं अधिक करतों व त्यांचें अभीष्ट चिंतितों.

**राजकुमारीः**—(अगदीं हलक्या स्वरांत) मी आपणा सर्वांची आभारी आहे. आनंदानं कंठ दाटून आल्यानं मला अधिक बोलवत नाहीं! उचित शब्दांत आभार मानले नाहींत म्हणून सर्वांनीं मला क्षमा करावी.

**राजे राणोजीरावः**—रावसाहेब, मीही आपला फार आभारी आहे. हें लग्न आपण ठरविल्यानें व शेंवटास नेल्यानें पुढें कोणी आम्हांस किंवा आमच्या मुलाबाळांस त्रास देणार नाहींत. तसेंच जातिप्रकरणेंही निर्माण होणार नाहींत. छत्रपतींचीही समजूत योग्य रीतीनें आपण करून घालच.

**पहिले बाजीरावः**—बरें जाधवराव, मी सांगितलेली लग्नाची व्यवस्था तावडतोब करा. आपली छावणी कांहीं दिवस लग्नोत्सवाकरितां येथेंच पडेल. जहागीरदारांना सांगा कीं समारंभ फारच थाटानें झाला पाहिजे.

**पिलाजीरावः**—मी सर्व व्यवस्था चोख करतों. आपण अगदीं निष्काळजी असा. आपण छावणींत चला. दौड बरीच झाली आहे. सर्वांनाच विश्रांतीची आवश्यकता आहे. शिवाय नूतन परिणत जोडप्याला थोडा एकांत लाभूं दिला पाहिजे.

**पहिले बाजीरावः**—खरंच जाधवराव, चला. शिंदेराव, राजकुमारी, तुम्हां उभयतांचे सदा कल्याण होवो व तुमच्या पोटीं हिंदुपदपातशाही यशस्वी करून दाखविणारा पुत्र निर्माण होवो. ( एकमेकांस नमस्कार करून पहिले बाजीराव जातात. )

**पिलाजीरावः**—हो आलोंच रावसाहेब. ( हळूच उत्तमेस ) चला ना. तुम्ही इथं थांबून काय करणार ? (पहात पहात जातात).

**उत्तमाः**—( पिलाजीरावांच्याकडे पहात ) सरकार, मीही वाड्यांत जातें. ही आनंदाची बातमी मैनाबाई महाराणीसाहेबांना निवेदन करतें.

**राजे राणोजीरावः**—अस्सं ! म्हणजे त्यांना ही गोष्ट कळली तर !

**राजकुमारीः**—(हंसत) पण इतकी घाई कां ? उत्तमा, असं मला इथं एकटीला सोडून तूं जाणार ? बरीच आहेस कीं तूं. थांब मीही येतें. महाराणीसाहेब मजवर रागावतील.

**उत्तमाः**—सरकार, आतां आम्हां कोणाची जरूरी आपणांस नाहीं. जन्माचा सोबती मिळाल्यावर तात्पुरत्या मैत्रिणीची काय आवश्यकता आहे ? आतां महाराणीसाहेबांची भीति बाळगण्याचं कारण नाहीं. आतां धाकट्या राणीसाहेबांचाही सर्वांनाच धाक वाटूं लागेल. बरं जातें मी (हंसत उत्तमा हळुहळु जाते. )

**राजकुमारीः**—तुलाही आतां मैत्रिणीची गरज कशाला हवी ? थोडी थांब ना, मीही येतें. मी इथं एकटी कशी थांबूं ? मला बाई लाज वाटते. काय थट्टेखोर आहे ! गेलीच कीं निघून. (बुरखा दूर करून) हें सगळं झालं पण आईबाबा काय म्हणतील ? कारण त्यांना ही गोष्ट मुळींच आवडणार नाहीं. त्यांची समजूत घालण्याची कांहींतरी व्यवस्था झाली पाहिजे. त्यांनाही मूलबाळ नाहीं. बिचारे माझ्यामुळं फार दुःखी झाले असतील. हो, बरी आठवण झाली. महाराज छत्रसालबाबांनीं आपणाकरितां एक पत्र दिलं आहे. (पत्र देते.)

**राजे राणोजीरावः**—(पत्रास वंदन करून वाचतात. राजकुमारी मधून मधून त्यांचेकडे पहाते.) महाराजांनीं आपणा दोघांच्या इच्छेस पूर्ण संमति दिली आहे. मोठीच अडचण दूर झाली. मला वाटतें छत्रसाल महाराजच आपल्या वडिलांची समजूत घालतील. आपणही त्यांची समजूत करूं. पुराण व धर्मशास्त्रें यांतील अनेक

उदाहरणें दाखवून हा विवाह धर्मशास्त्रविरुद्ध नाहीं, योग्य आहे, ही खात्री त्यांना पटवून देऊं. आमच्याकडे रावसाहेब व तुमच्याकडे महाराज छत्रसाल ही बडी मंडळी साहाय्यास असल्यावर काळजीचें कांहींच कारण नाहीं. आमचे छत्रपतीही आम्हांला अनुकूल होतील. आमचें ध्येय फार उदात्त आहे. कोणीही शहाणा या ध्येयास विरोध करणार नाहीं.

**राजकुमारीः**—आपल्या कर्तबगारीनं आपण सर्वकांहीं घडवून आणाल. सर्व बाबतींत आपणच माझं सर्वस्व आम्हांत ! मी अधिक काय बोलूं ? आपण माझा स्वीकार केला, धन्य झालें मी ! माझा आनंद गगनांत मावत नाहीं. भगवान् एकलिंगजींनीं सर्व संकटं वारून हे दिवस दाखविले !

**राजे राणोजीरावः**—आपल्या अंगच्या एक एक गुणानें मला मोहून टाकलें आहे. आज माझें मन प्रसन्न झालें आहे. बरें आपण आतां वाड्यांत चला. आम्ही छावणींत जाऊन लवकरच वाड्यांत येतों. रावसाहेब व जाधवराव आमचा विनोद करून आम्हांला खूप चिडवतील. बाळराजेवगैरे सर्व मुलेंमाणसें कुशल आहेत ना ?

**राजकुमारीः**—होय, सर्व कुशल आहेत. आनंदाची बातमी ही कीं मोठ्या राणी-साहेबांनीं मला भगिनी मानून अतिशय मायाळूपणानं वागविलं. माझी प्रेमकथा त्यांना सर्व कळली आहे. आपल्या लग्नास त्यांच्याकडून विरोध होणार नाहीं. त्या म्हणतात, "मी फार चांगली आहे. अशी भगिनी मला लाभली हें फार चांगलं झालं". सर्व मुलं मावशी म्हणून माझ्यावर प्रेम करूं लागलीं आहेत. मी एक कुटुंबांतीलच आहे असं सर्वजण समजतात.

**राजे राणोजीरावः**—(हंसत) मग खरं तर समजतात ते. राणीसाहेबांचा विरोध नाहीं, ही सर्वांहून उत्तम गोष्ट. सवतिमत्सर करण्याइतक्या त्या अप्रबुद्ध नाहींत हें आम्हीही जाणतों. (तिला जवळ घेऊन) प्रेमानें वेडावून बद्ध झालेले व ध्येयानें एकत्रित आलेले हे दोन जीव अशी शक्ति निर्माण करतील कीं त्यायोगें भारतवर्षाचा पांग फिटेल. (पाठ थोपटून) आम्हीं जातों आतां. (राजे राणोजीराव पहात पहात जातात.)

**राजकुमारीः**—(हात जोडून) देवानं सर्व मनाप्रमाणं घडवून आणिलं. मोठ-मोठीं माणसं सहाय्य झालीं आहेत. दादासाहेब किंवा राणीसाहेब यांचा विरोध

आतां मुळींच राहणार नाहीं. वाड्यांत जाऊन राणीसाहेबांना आनंदाची बातमी सांगावी व त्यांचा आशीर्वाद घ्यावा. सर्व आनंदी आनंद झाल्यामुळं आज मन कसं प्रफुल्लित झालं आहे ! त्याचबरोबर आतां कुंवारपण संपून संसाराचं नवीन जीवन मी अंगीकृत केलं आहे. ( उत्तमा वाईनें येते. )

**उत्तमा.**—सरकार, चला लवकर ! संपला कीं नाहीं एकांत ? अहो, तिकडं राणीसाहेब आपली सारखी आठवण करीत आहेत. मी त्यांना म्हटलं कीं आपण बागेंत सहल करीत आहांत. त्या म्हणाल्या, "जा, त्यांना लवकर घेऊन ये". हं, चला आतां लवकर. राजे गेले वाटतं ?

**राजकुमारीः**—( विनोदानें ) हो गेले बरं ! कांहीं विनोद करावयाचा विचार आहे वाटतं ? तुला आतां कारणही चागलं मिळालं आहे म्हणा ! बरं चल आपण आतां वाड्यांत जाऊं.

**उत्तमाः**—आपण कोण कमी विनोदी आहांत ? (लाजून) नेहमीं आपलं जाधवरावांचं नांव ! चलावं सरकार. ( दोघी जातात. )

---

## अंक तिसरा.

### प्रवेश पांचवा.

(दतियाचा राजवाडा—जनान्यांतील दिवाणखाना राजा व राणी बोलत बसले आहेत.)

**राजाः**—राणीसाहेब, कांहीं म्हणा मुलगा फार पराक्रमी निघेल ! राजगुरूंनीं सर्व लक्षणें पाहिलीं. चक्रवर्ति महाराजाचीं लक्षणें आहेत त्यांचीं !

**राणीः**—माझी बाळ मोठी भाग्यवान् आहे. तिचा पुत्र खात्रीनं सार्वभौमच होईल. नांव तरी किती सुंदर—'माधवराव' ! या नांवामध्यें विशेष प्रकारची मोहिनी आहे. श्रीकृष्णांनीं जन्मल्यापासून आपल्या लीलांनीं माता, पिता, नंद व यशोदा यांना आनंदित केलं तसेच बाळराजे माधवराव सर्वांना आनंदित करीत आहेत !

**राजाः**—राणीसाहेब, आम्हीं आरंभीं या विवाहाच्या विरुद्ध होतों पण आतां त्याबद्दल आम्हांला फार वाईट वाटतें. आज मंडळी पुत्रदर्शनसमारंभाकरितां येणार आहेत. स्वागताची सर्व तयारी उत्तम प्रकारें करावयास पाहिजे. नुसते जांवईच

यावयाचे नसून महाराज छत्रसाल, बाजीराव पेशवे, वगैरे थोर थोर मंडळी येणार आहेत. त्या सर्वांचा मुक्काम झांशीच्या किल्यांत आहे.

**राणीः**—महाराज, ही मंडळी झांशीला कां थांबली ? थेट इकडेच कां आली नाहींत ? सर्वांनीं आमचा पाहुणचार घ्यावयास पाहिजे होता ! झांशीला मुक्काम ठेवून फक्त पुत्रदर्शनाकरितांच इकडे येणं व फक्त भोजन करून परत जाणं हें पाहुणचाराच्या दृष्टीनं किती अपुरं आहे ! बरं, जांवई तरी मागं रहाणार कां ? कीं तेंही नाहीं ? सगळीच घाई ! मुलीचे व नातवाचे सुखसोहाळे झाले. पण जांवईबोवांचं कोड-कौतुक नको कां व्हावयाला ? आम्हां बायकांना सुखसोहळ्याशिवाय मौज वाटत नाहीं. कसंही करा व मंडळींना चार दिवस अधिक ठेवून घ्या !

**राजाः**—( हंसून ) सुखसोहाळ्याशिवाय बायकांना काय सुचतें आहे ? अहो, महाराज छत्रसालांनीं रावसाहेब पेशव्यांना पुत्र मानलें आहे ! झांशीकडील राज्याचा तिसरा हिस्सा त्यांनीं पेशव्यांना दिला. झांशी प्रांतांत त्यांनीं आतां कायमची राजसत्ता स्थापन केली आहे. सध्यां मुलुखाचा योग्य बंदोबस्त करण्याचें काम चालू असून शिंदेरावांना त्याचमुळें इथें राहण्यास अधिक सवड नाहीं. शिवाय महाराज छत्रसालांचाही मुक्काम सध्यां झांशीतच आहे. त्यांच्या सहवासामुळें शिंदेरावांना घटकेचीही फुरसत नाहीं ! ज्या वेळीं आम्ही सर्वांना या समारंभाचें निमंत्रण केलें तेव्हां सर्वांना मोठा आनंद झाला. महाराज छत्रसाल व पेशवे म्हणाले कीं, आमच्या सर्व श्रमांचें चीज झालें ! मधु-मीलनाचा सुपरिणाम सर्वांना गोड वाटला. सर्वांनीं आमचें आमंत्रण आनंदानें स्वीकारलें. आतां त्यांची येण्याची वेळ आहे. समारंभाची सर्व तयारी आहे ना ?

**राणीः**—उत्तमेला सांगून मी सर्व तयारी ठेविली आहे. (उत्तमा येते) कां ग झाली कां सर्व तयारी ? बाळराजे माधवरावांना पोषाख, जवाहीरे, वगैरे सर्व व्यवस्थित घातले आहे ना ? ते राजपुत्र शोभले पाहिजेत. बरं, बाळ तयार आहे ना ? मंडळी आतां येतच असतील.

**उत्तमाः**—राणीसाहेब, सर्व तयारी आहे. छोटे सरकारांची व बाळराजांची मी स्वतः सर्व देखरेख केली व कांहीं अव्यवस्थितपणा राहूं दिला नाहीं. आमच्या छोट्या सरकारांना काय करावं ? पतिराज येणार हें कळल्या दिवसापासून त्या अगदीं भांबाऊन गेल्या आहेत. दुसऱ्या सर्व गोष्टी सोडून सर्व दिवसभर बाळ माधवरावांशीं

गोष्टी करीत बसतात. त्यांना बाळराजांच्या पराक्रमाचीं स्वप्नें आतांपासूनच पडूं लागलीं आहेत !

**राणीः**—राजपुत्रांच्या भावी पराक्रमाचीं स्वप्नं तिला पडणारच. ज्या ध्येया-प्रीत्यर्थ विवाहाचं एवढं मोठं धाडस तिनं केलं तें ती कसं विसरणार ? बरं, तूं जाऊन बाळराजांसह तिला इकडे घेऊन ये. मंडळी येतांच पुत्रदर्शनदरबार होणार आहे.

**राजाः**—आज माझें मन आनंदानें प्रफुल्लित झालें आहे. पुत्रदर्शनाच्या शुभ कार्याच्या निमित्तानें आज थोर थोर मंडळी आपल्या येथें येत आहेत. शिंदेरावांच्या कृपेचेंच हें फळ होय. (भालदार येतो.)

**भालदारः**—महाराज, पाहुणेमंडळी किल्याच्या पायथ्याशीं आलीं आहेत. आतां इतक्यांत किला चढून येतील.

**राजाः**—सेनापतींना व कारभाऱ्यांना म्हणावें मंडळींना स्वागताच्या राजवाड्यांत घेऊन चला. त्यांचें स्वागत करण्यास आम्ही तिकडे येतोंच. नंतर जलपान व विश्रांति झाल्यावर निवांतपणें पुत्रदर्शनाचा दरबार मुख्य दरबारी दिवाणखान्यांत होईल. राणीसाहेब, आपण सर्वांनीं जनानी दिवाणखान्यांत बसावें. म्हणजे बाळराजांना दरबारांत घेण्यास बरें पडेल. आम्ही त्यांच्या स्वागताकरितां जातों.

**राणीः**—जशी महाराजांची आज्ञा. (राजा व भालदार जातात.) खरोखरच आज भाग्याचा दिवस उगवला. माझ्या राजकुवरनं अनेक हालअपेष्टा सोसल्या पण आपलं ध्येय गांठलं ! तिच्या भाग्यानं पुत्ररत्नही झालं. आम्ही अनेक तऱ्हेनं समजाविलं, पण तिनं आपला हेका सोडला नाहीं. तिची आपल्या ध्येयावर अढळ श्रद्धा आहे. तिच्या श्रद्धेनं तसेंच फळ आज तिला लाभलं आहे ! उत्तमे, तूंही तिला खरी सखी शोभतेस ! तिच्याबरोबर अनेक हालअपेष्टा तू सहन केल्यास. धन्य आहे तुझी !

**उत्तमाः**—महाराज, मी माझं कर्तव्य बजाविलं यापेक्षां कांहींच जास्त केलं नाहीं. सेवकांनीं आपला सेवकधर्म योग्य रीतीनं पाळला यांत धन्यता मानण्याचं कांहींच कारण नाहीं. चला, आतां वेळ बरीच झाली. आपण अगोदरच जाऊन दरबारांत बसलं पाहिजे. महाराज व पाहुणेमंडळी तिथं लवकरच येतील.

**राणीः**—होय बाई, लवकर गेलं पाहिजे. पाहुण्यांच्या स्वागतांत मुळींच उणं पडतां कामा नये. काळजी वाटते ती ही कीं जर स्वागतांत कांहीं कमी पडलं तर

जांवई रुसतील बरं ! सर्व थोर थोर मंडळींच्या मानाप्रमाणं सर्व व्यवस्था झाली पाहिजे. आमच्या राजवाड्यांत अगदीं थोडंही न्यून राहूं नये.

**उत्तमाः**—महाराज, कांहीं एक उणं पडावयाचं नाहीं. आपण अगदीं निष्काळजी रहा.

**राणीः**—बरं तर चल. आपणही तयारीस लागूं.

**उत्तमाः**—चलावं महाराज. (दोघी जातात.)

---

## अंक तिसरा

### प्रवेश सहावा

(दतिया किल्यांतील राजवाडा—पुत्रदर्शनदरबार. महाराज छत्रसाल, पहिले बाजीराव, राजे राणोजीराव, पिलाजीराव जाधव, राजा, राणी, राणी चिमणाबाई, (राजकुमारी) उत्तमा बाळराजे माधवराव, भालदार व दासी दरबारी पद्धतीनें बसले आहेत. स्त्रीमंडळी पडद्यांत असून बाळराजांना सिंहासनावर निजविलें आहे. त्यांच्यावर हिंदुपदपातशाहीचीं छत्रचामरें धरिलीं आहेत.)

**महाराज छत्रसालः**—शिंदेराव, तुम्ही आमच्या विनंतीस मान देऊन राजकुवरशीं लग्न केलेंत म्हणून आजची ही सोन्यासारखी शुभ वेळा आम्हांला पहावयास मिळाली. राजे, आतां पुढें या व पुत्रदर्शन करा. आमचा तुम्हांस व तुमच्या बाळास शुभाशीर्वाद आहे.

**राजे राणोजीरावः**—महाराज, आपल्यासारख्या वयोवृद्ध, तपस्वी राजर्षींच्या कृपाप्रसादानें व आशीर्वादानें सर्व मंगलच घडावयाचें. (बाळराजांजवळ जाऊन दर्शन करतात व त्यांच्या गळ्यांत हिऱ्यामोत्यांचे कंठे घालतात.) बाळराजे, तुम्ही या सर्व मंडळींना मुजरा करा व त्यांचे पुण्यकारक आशीर्वाद मागा.

**पहिले बाजीरावः**—शिंदेराव, राजपुत्राचीं लक्षणें विशेष प्रकारचीं दिसतात ! हे हिंदुपदपातशहा खास होणार ! शिवाय आज दरबारांत सर्व राजचिन्हें सार्वभौम बादशहाचीं आहेत. ध्येयवादी मातेनें हे सोहाळे पहावेत अशीच योजना दिसते. राजे, आम्हीं सर्वांनीं राजपुत्रांना सार्वभौम हिंदुपदपातशहाचाच मान दिला पाहिजे. आम्हांला असें वाटतें कीं महाराज छत्रसालांनीं मुजरा करून बाळराजांवर छत्र धरावें.

आम्ही मुजरा करून चवरी फिरवावी. बाकीच्यांनीं बाळराजे माधवराव यांना बादशाही मुजरे करावेत.

**महाराज छत्रसालः**—रावसाहेब खरं म्हणत आहेत. बुंदेलखंडांतील सार्वभौम राजे या नात्यानें हिंदुपदपातशहांना आम्ही मान देतों व हिंदवी स्वराज्याचा जयजयकार करतों. (महाराज छत्रसाल मुजरा करून बाळराजांवर छत्र धरतात.)

**पहिले बाजीरावः**—महाराज छत्रसालांनीं छत्र धरल्यावर आमचा मान चवरी वारण्याचा आहे. (मुजरा करून चवरी वारूं लागतात.) हिंदुपदपातशहाचा जयजयकार असो !

**राजे राणोजीरावः**—(काकुळतीनें) महाराज, रावसाहेब, हें काय आरंभिलें आहे आपण ? बाळराजांवर छत्रचामरें धरून केवढा त्यांचा व आमच्या घराण्याचा गौरव केलांत आपण ! आम्हीं या मानाला पात्र तरी आहोंत कां ? आपलं सौजन्य फार मोठें आहे. ह्या गौरवाबद्दल मी आपले उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं ! महाराज, रावसाहेब, आपल्या या सौजन्यानें व आशीर्वादानें बाळराजांची कीर्ति दिगंत पसरेल व माझ्या कुळाचा उद्धार खास होईल यांत संशय नाहीं .रावसाहेब, महाराजांनीं अपत्यप्रेमानें एवढा मान दिला तर तें एकवेळ शोभेल. पण आपण, साताऱ्च्या छत्रपतींच्या पेशव्यांनीं या राजपुत्राला असा मान देणें थोडें अधिक होतें. श्रीशाहूछत्रपति—आमचे खरे हिंदुपदपातशहा—यांना अवमानिल्यासारखें नाहीं कां होत ? कृपा करा. आपण आपल्या सवंगड्याचे इतकें कौतुक केलें हें पुरें झालें. छत्र व चामर परत द्या व या आपल्या सवंगड्याचा प्रेमाचा मुजरा घ्या.

**पहिले बाजीरावः**--शिंदेराव, तुमच्या काय या भलत्याच कल्पना. अहो बाळराजांना आम्ही शिंदेराव म्हणून मान दिला नाहीं. आम्ही आमच्या हिंदुपदपातशाहीचें स्वप्न खरं करून दाखविणाऱ्या भावी राष्ट्रपुरुषाला हा मान देत आहोंत ! यामध्यें छत्रपतींचा किंवा महाराज छत्रसालांचा अवमान नाहीं. राजपूतमराठ्यांचें मधु-मीलन व्हावें, असे सुंदर हिरे निर्माण व्हावें व त्यांनीं हिंदवी स्वराज्य पूर्णत्वास न्यावें या शुभ कामना आम्हांला हा मान देण्यास प्रवृत्त करीत आहेत ! हिंदवी स्वराज्याच्या अभिमानानें प्रेरित होऊन बाळराजांच्या सेवेस आम्हीं उभें राहिलों यांत कोणाचाच मानापमान नाहीं !

**महाराज छत्रसालः**—रावसाहेब अगदीं खरें म्हणतात. शिवछत्रपतींपासून या हिंदवी स्वराज्यजोपासनेकरितां अनेक राष्ट्रपुरुषांनीं तपश्चर्या केलेली आहे.

कालानुसार अनेक आघातप्रत्याघात होत गेले. आजपर्यंतचे सर्व उन्हाळेपावसाळे आम्ही पाहिले. आज स्वराज्यनौका मध्यावर येऊन ठेपली आहे. तुम्हीआम्ही आज माळवा, बुंदेलखंड, वगैरे भागांत तिला विहार करूं देत आहोंत. पण आमच्यानंतर सिंधूचे पर तीर गांठण्याचें भाग्य तिला बाळराजे माधवरावांच्या वेळींच लाभणार आहे ही मनोमय साक्ष पटल्यामुळेंच आम्हीही छत्राला हात घातला. आमच्या सर्व आयुष्यांत मानापमानाच्या भिरभिरीनें आम्ही अनेक संकटें आमच्यावर ओढवून घेतलीं. आम्ही बुंदेला राजपूततेज केव्हांच लुप्त होऊं दिलें नाहीं. म्हणून आज हा तेजस्वी सूर्य निर्माण झाला आहे, यांत कोणासही आनंदच होईल. विषाद मुळींच वाटणार नाहीं !

**राजे राणोजीराव**:—आपण दोघेही अत्यंत थोर मनाचे श्रेष्ठ पुरुष आहांत. आपल्या आशीर्वादाप्रमाणें हिंदवी स्वराज्य पूर्णत्वास आणण्याचें काम हे बाळराजे करतील असें माझें हृदय ग्वाही देत आहे ! धाकट्या राणीसाहेब, पडद्यांतून बाहेर या, एक वार सर्वांना नमस्कार करा आणि आशीर्वाद मागा. वडील मंडळींच्या आशीर्वादानें आपल्या सर्व मनःकामना पूर्ण होतील. (चिमणाबाईसाहेब बुरखा घेऊन बाहेर येतात. सर्वांना नमस्कार करून लाजून एका बाजूस उभ्या राहतात. त्यांच्याबरोबर उत्तमा व राणीही बुरखा घेऊन, येऊन उभ्या राहतात.)

**राजा**:—शिंदेराव, मी आपणा उभयतां पतिपत्नींचें अभिनंदन करतों. आम्ही खुद्द विरुद्ध असतां, सर्व रूढी, समाज, वगैरे विरुद्ध असतां, तुम्ही जें मनोधैर्य दाखविलें हें अलौकिक कृत्य झालें आहे.

**राणी**:—खरंच. असं धैर्य कोणाही सामान्य माणसांत पहावयास सांपडत नाहीं. राजपुतांच्या दृष्टीनं राजपूत विरुद्ध होते. मराठ्यांच्या दृष्टीनं मराठे विरुद्ध होते. पण सर्वांच्या समजुती घालून तुम्हीं आपलं ध्येय कडेला नेलं आहे.

**महाराज छत्रसाल**:—जीं राजकारणी अथवा मुत्सद्दी माणसें असतात तीं बरोबर अशींच वागतात !

**पहिले बाजीराव**:—त्यामुळेंच जगांत अमर कीर्ति मिळवितात. दोन ध्येयवादी माणसांचें मधु-मीलन हें राष्ट्रांतील सर्व दिव्य शक्तींची जोपासनाच म्हटलीं पाहिजे.

**पिलाजीराव**:—अशा मधु-मीलनांतूनच अष्टपैलु हिरे निर्माण होतात !

उत्तमाः—(हंसत) यासाठीं समाजसुधार व्हावयास पाहिजे. हिंदूंतील अनेक जाती नाहींशा होऊन हिंदु तेवढा एक असं संघटन व्हावयास पाहिजे.

राणी चिमणाबाईः—हिंदुसमाजांतील जातिबंधनं नाहींशी होऊन समाज सुधारणेच्या मार्गास लागो,असा आपला वडील मंडळींचा आशीर्वाद असावा.

सर्वजणः—तथास्तु !

भरतवाक्य.

( सर्वजण एकत्र उभे राहून म्हणतात. )

(चाल—आओ आओ हे करुणाकर—संतसखू.)

ज्योतिर्लिंगा तूं करुणा कर ।
शेषावलयांकित तूं भास्कर ।
आशीर्वचना देई सत्वर ।
शिंदेकुल हें अमित कीर्तिकर ।
पराक्रमाचें केवळ आगर ।
जीवाजीराव विजयाराणी ।
ज्यांच्या हृदयिं जनता शिराणी ।
राष्ट्रभक्तिचा जीवन-सागर ।
पसरे भुवनीं नित्य निरंतर ।
भाव भक्तिनें गाऊं सत्वर ।
तव चरणाचा हा नत शाहिर ।

अंक तिसरा समाप्त.

( इत्यलम् । )

